# देशगौरव सुभाषचंद्र बोस

संपादक
डॉ. वि. स. जोग (निमंत्रक)
प्रा. राम शेवाळकर
प्रा. शेषराव मोरे

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई

# सुभाषबाबू : जाज्वल्य स्वातंत्र्याकांक्षी नेता

नेताजी सुभाषचंद्र बोस हे थोर भारतीय देशभक्तांच्या परंपरेत शोभून दिसणारे एक अद्वितीय नेते होते. त्यांचे व्यक्तिमत्त्व जसे आकर्षक होते, तशीच त्यांची स्वातंत्र्यप्रीतीही जाज्वल्य होती. गांधीजींच्या नेतृत्वानुसार चालणाऱ्या काँग्रेसचे कार्यकर्ते आणि नेते म्हणून त्यांनी अनेक वर्षे स्वातंत्र्य लढ्यात भाग घेतला. काँग्रेसचे ते अध्यक्षही झाले. पण गांधीजींच्या विचारांशी मतभेद झाल्यामुळे हळूहळू ते काँग्रेसशी दुरावत गेले. भारताच्या स्वातंत्र्यासाठी आवश्यक तर सशस्त्रही लढा दिला पाहिजे, या विचाराशी ते सहमत होत गेले. ' अहिंसेने हृदय परिवर्तन ' या गांधीजींच्या तत्त्वज्ञानाबद्दल ते म्हणत, ' व्यक्तीला हृदय असते त्याचे परिवर्तन होऊ शकेल पण राष्ट्राला हृदय नसते.

काँग्रेसमधून बाहेर पडल्यानंतर सुभाषबाबूंनी फॉर्वर्ड ब्लॉक या नावाची एक संघटना स्थापन केली. याच काळात दुसरे महायुद्ध सुरू झाले होते. या महायुद्धाच्या ज्वाळा दिवसेंदिवस भडकत भडकत हळूहळू युरोपमधून त्या आशियाखंडापर्यंत येऊन पोचल्या होत्या. जर्मनी आणि इटली यांच्या बरोबरीने जपान सारखे राष्ट्रही या युद्धात अमेरिका - इंग्लंड फ्रान्सच्या विरुद्ध उतरले होते. याच काळात नेताजी मुंबईत आले असताना त्यांची आणि स्वातंत्र्यवीर सावरकर यांची भेट झाली. या भेटीचा वृत्तांत अज्ञात असला तरी सुभाष बाबूंच्या गुप्त पलायनाच्या पाठीमागे या भेटीची प्रेरणा असावी असे मानण्यास जागा आहे.

जर्मनी आणि जपान यांचे सहकार्य लाभले असले तरी सुभाष बाबूंनी भारताच्या स्वातंत्र्यासाठी जी आझाद हिंद सेना स्थापन केली आणि तिचे सामर्थ्य वाढवले ते स्वतःच्या प्रभावी व्यक्तिमत्वाच्या बळावरच ! " तुम मुझे खून दो मैं तुम्हे आझादी दूँगा " हे त्यांचे वाक्य प्रसिद्ध आहे. ' १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध ' या वीर सावरकरांच्या तेजस्वी पुस्तकाचे त्यांनी या काळात पुनर्मुद्रण करून ती क्रांतिकारकांची गीता सर्व सैनिकांना उपलब्ध करून दिली. ही आझाद हिंद सेना ब्रह्मदेशात इंफाळपर्यंत आली होती. दैव अनुकूल असते तर याच सुभाषबाबूंच्या सेनेने कदाचित भारत स्वतंत्र करण्याचे श्रेय घेतले असते. परंतु तो योग नव्हता.

१९४५ मध्ये ॲटम बॉम्बचा शोध लागला आणि हिरोशीमा आणि नागासाकी ही शहरे बेचिराख झाली जपानने ताबडतोब शरणागती पत्करली. जर्मनीचा तर या आधीच पराभव झाला होता. दुर्दैवाने सुभाषबाबूंना अपघाती मरण आले. त्यांच्या स्वातंत्र्य लढ्याला यश आले नाही. मिळालेले स्वातंत्र्य पाहण्यासाठी ते राहिले नाहीत. पण काही झाले तरी त्यांचे जीवनचरित्र देशाला सदैवच स्फूर्तिप्रद ठरेल यात शंका नाही.

साहित्य संस्कृती मंडळाच्या वतीने सुभाषबाबूंच्या कार्याचा गौरव करणारा आणि त्यांच्या व्यक्तिमत्वातील विविध पैलूंचा वेध घेणारा हा ग्रंथ दिनांक १ ऑगस्टला प्रसिद्ध होत आहे. याचा आनंद वाटतो. डॉ. वि.स. जोग यांनी यासाठी केलेल्या परिश्रमाबद्दल मंडळ त्यांचे मनःपूर्वक आभारी आहे.

२३ जुलै १९९८

**द. मा. मिरासदार**

अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# संपादकीय निवेदन

महाराष्ट्र शासनाने, श्री. विद्याधर गोखले यांच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची पुनर्रचना केल्यानंतर डिसेंबर १९९५ मध्ये मंडळाच्या पहिल्याच बैठकीत मी, नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या जन्मशताब्दीनिमित्त सुभाष अभिवादन ग्रंथाची कल्पना मांडली. अध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांनी लगेच ती उचलून धरली. मंडळाच्या सर्व सदस्यांचा या योजनेला मनःपूर्वक पाठिंबा मिळाला. मंडळाचे कर्तव्यदक्ष सचिव श्री. चंद्रकांत वडे यांच्या तत्पर सहकार्याने योजनेची अंमलबजावणी सुरू झाली.

म. गांधी, स्वा. सावरकर, पं. नेहरू, नेताजी सुभाषचंद्र बोस हे भारतीय स्वातंत्र्याचे शिखर नेते. अहिंसात्मक सत्याग्रह आणि सशस्त्र संघर्ष या दोन्ही प्रयत्नांनी देश स्वतंत्र झाला. नेताजींचे वैशिष्ट्य म्हणजे या दोन्ही आंदोलनात ते सहभागी होते. आपल्या राजकीय कारकीर्दीच्या पूर्वभागात ते कॉंग्रेसच्या नेतृत्वाखालील स्वातंत्र्य चळवळीत सक्रीय होते. उत्तरायुष्यात ते सशस्त्र स्वातंत्र्यसेनेचे सरसेनापती झाले. जनआंदोलन आणि रणांगण या दोन्ही मार्गांचे ते झुंजार पथिक होते. त्यामुळे कोटीकोटी भारतवासीयांच्या मनात त्यांच्याविषयी आदर होता. महाराष्ट्र त्याला अपवाद नाही. मात्र सुभाषबाबूंना स्वतंत्र भारततही राजमान्यता मिळायला उशीर झाला. महाराष्ट्रात सुद्धा युती शासन आल्यावरच सत्तेच्या व्यासपीठांवरून सुभाषबाबूंचे कृतज्ञतापूर्वक स्मरण सुरू झाले. त्या कृतज्ञ अभिवादनाचा एक आविष्कार म्हणजे प्रस्तुतचा, 'देशगौरव सुभाषचंद्र बोस' हा ग्रंथ.

मराठीत सुभाषबाबूंवर ललित आणि ललितेतर लेखन पुष्कळ झाले. या ग्रंथाच्या शेवटी दिलेल्या सुभाषग्रंथसूचीवरून ते लक्षात यावे. त्यामुळे उपलब्ध प्रकाशित साहित्यापेक्षा वेगळे काही देता आले तर पहावे असे मंडळाचे धोरण ठरले. अभिवादन, संशोधन आणि मूल्यांकन या तीन कसोट्या डोळ्यांसमोर ठेवून ग्रंथाची रचना करावी असे ठरविले. एका व्यक्तीकडून सलग सुभाषचरित्र लिहवून घेण्यापेक्षा अनेक लेखकांनी आपापल्या अभ्यासातून सुभाषबाबूंवर लिहिले तर ग्रंथाला विशेष संदर्भमूल्य प्राप्त होईल या हेतूने अनेक विचारवंतांकडून लेख विनंतीपूर्वक आमंत्रित केले. सर्व लेखकांनी तत्परतेने प्रतिसाद दिला. त्यामुळे बावीस विविध विषयांवरील बावीस लेखकांच्या भारदस्त लेखांचा समावेश या ग्रंथात समावेश करता आला. या सर्व लेखकांचा मी ऋणी आहे.

या ग्रंथात नेताजींच्या जागतिक कीर्तीच्या सहकारिणी कॅ. लक्ष्मी सहगल यांचा लेख आहे. वृद्धापकाळामुळे त्यांना प्रत्यक्ष लेखन, ते सुद्धा मराठीत करणे शक्य नव्हते. म्हणून नेताजी सुभाष जन्मशताब्दीच्या आरंभदिवशी २३/१/१९९७ ला दूरदर्शन राष्ट्रीय वाहिनीवर त्यांची झालेली मुलाखत मी स्वतः शब्दबद्ध केली. श्री. अर्धेन्दुभूषण बर्धन यांनी स्वतः दिल्लीहून कानपूरला कॅ. सहगल यांचेशी संपर्क साधून ते शब्दांकन त्यांना सादर केले. कॅ. लक्ष्मी सहगल यांनी तात्काळ ते प्रसिद्ध करण्याची अनुमती दिली. त्यांची ही स्वीकृती आणि लेखनकृती या ग्रंथाला मोठा आशीर्वाद आहे हे मी मानतो. स्वतः कॉ. बर्धन यांनीही त्यांच्या अत्यंत व्यस्त कार्यक्रमात स्वतःचा वैशिष्ट्यपूर्ण लेखही तत्परतेने पाठविला. ज्या कम्युनिस्ट पक्षाने एकेकाळी नेताजींचे मूल्यमापन करताना जरा निराळी भूमिका घेतली त्याच पक्षाच्या अखिल भारतीय कीर्तीच्या सर्वोच्च पदाधिकाऱ्याने नेताजींचे एक नवे मूल्यांकन केले. ते प्रसिद्ध करण्याचा मराठीत पहिला मान प्रस्तुत ग्रंथाला मिळतोय ही देखील अत्यंत समाधानाची बाब आहे.

महाराष्ट्राचे थोर राजकीय कादंबरीकार, पत्रकार कै. गजानन त्र्यंबक माडखोलकर यांचा ' सुभाषवाद ' हा दीर्घ लेख या ग्रंथात पुनर्मुद्रित केला आहे. संपादक मंडळातील माझे ज्येष्ठ आदरणीय सहकारी प्राचार्य राम शेवाळकर यांच्या सूचनेवरून आणि भाऊराव माडखोलकरांच्या स्नुषा श्रीमती उमा चंद्रशेखर माडखोलकर यांच्या अनुमतीने हा लेख समाविष्ट करता आला याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. बावन्न वर्षांपूर्वी माडखोलकरांनी या लेखात व्यक्त केलेले विचार आजही टवटवीत आणि उपयुक्त वाटतात. प्राचार्य श्री. राम शेवाळकरा यांच्याप्रमाणेच संपादकमंडळाचे दुसरे सदस्य श्री. शेषराव मोरे यांचेही मला सहकार्य लाभले.

डॉ. य. दि. फडके, श्री. वि. स. वाळिंबे, कर्नल पु. ना. ओक यांच्यासारखे नेताजींवरील भाष्यकार या ग्रंथाला लेखक म्हणून लाभले याचा अभिमान वाटतो. मंडळाच्या धडाडीच्या उपाध्यक्षा श्रीमती नीलाताई उपाध्ये या, संकल्पापासून सिद्धीपर्यंत माझ्या पाठीशी भक्कमपणे उभ्या राहिल्या. डॉ. य. दि. फडके यांच्या, नेताजी आणि कामगार चळवळीसंबंधी लेखाच्या पुनर्मुद्रणाची अनुमती नीलाताईंनीच मिळवून दिली. त्याबद्दल नीलाताईंना धन्यवाद देणे हे माझे कर्तव्य आहे.

सुभाषबाबूंच्या व्यक्तिमत्त्वाचा सहसा कोणताही पैलू सुटणार नाही याची काळजी ग्रंथातील विषय निवडताना घेतली. त्यामुळे गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकुर आणि क्रांतिकारक वीणा दास यांनी केलेल्या सुभाषगौरवापासून आझाद हिंद सेनेतील कॅ. किरडे, न्या. तारे, कै. डॉ. श्रीज्ञ जोशी या नेताजींच्या सहकाऱ्यांनी कथन केलेल्या चक्षुर्वैसत्यं आठवणींपर्यंत अंगभूत गुणवत्ता युक्त मजकूर ग्रंथात आला. बंगाली मजकुराचा अनुवाद करणाऱ्या डॉ. वीणा आलासे आणि न्या. तारे व बर्धन यांच्या मूळ इंग्लिश लेखनाचा अनुवाद करणारे डॉ. श्री. प्र. कुळकर्णी यांचे यासंदर्भात मनःपूर्वक आभार मानतो.

कॅ. किरडे आणि न्या. मू. तारे हे सुभाषबाबूंचे दोन्ही सहकारी आज नव्वदीच्या घरात आहेत. त्यामुळे त्यांच्या सहकार्याचे मोल अधिकच वाढते.

या ग्रंथातील निमंत्रित लेखकांना पूर्ण स्वातंत्र्य होते. त्यांनी औचित्यभंग होऊ न देता ते स्वातंत्र्य उपभोगले. त्यामुळे त्यांच्यापैकी काही लेखकांच्या तर्कामध्ये थोडा फरक असल्याचेही वाचकांना जाणवेल. अर्थात सर्वच लेखकांच्या सर्वच मतांशी संपादक मंडळ किंवा म. रा. साहित्यसंस्कृती मंडळ सहमत असेलच असे नाही.

आमच्या सी. पी. ॲन्ड बेरार महाविद्यालयाचे प्राचार्य आणि संपादक मंडळाचे एक निमंत्रित सदस्य प्राचार्य अमलकुमार डे यांचेही ग्रंथसिद्धीसाठी भरीव सहकार्य मला लाभले. मंडळाच्या अनुमतीने आणि डे बाबूंच्या संगतीने मी कलकत्त्याला सुभाषबाबूंसंबंधी काही मूळ छायाचित्रे आणि मजकूर मिळवण्यासाठी गेलो. डे बाबू बरोबर असल्यामुळे भाषेची अडचण नव्हतीच. कलकत्ता येथील नेताजी अनुसंधान केंद्राने (नेताजी रिसर्च ब्यूरो) आमच्यासाठी नेताजीसाहित्याचा समग्र साठा मोकळा केला. केंद्रप्रमुख, सुभाषबाबूंचे पुतणे डॉ. शिशिरकुमार बोस हे त्यावेळेस तेथे नव्हते. पण आपल्या अनुपस्थितीत आम्हाला कुठलीही अडचण पडू नये याची व्यवस्था त्यांनी केली. त्यानुसार संस्थेचे सचिव श्री. कार्तिक चक्रवर्ती यांनी आम्हाला छायाचित्रे, ध्वनिफिती इ. देखील उपलब्ध करून दिल्या. नेताजींचे एक दुर्लभ छायाचित्र या ग्रंथातील एक लेखक श्री. जालंदर सोनूने तर आणखी काही दुर्मिळ छायाचित्रे या ग्रंथातील दुसरे एक लेखक डॉ. राजेन्द्र पटोरीया यांनी दिली. श्री. पटोरिया यांच्या संपादनाखाली हिंदी भाषेत प्रसिद्ध झालेला 'खनन भारती' या नियतकालिकाचा प्रसिद्ध झालेला सुभाष विशेषांक हा एक आदर्श विशेषांक आहे. त्या विशेषांकाचाही उपयोग या ग्रंथाच्या सिद्धतेसाठी झाला.

'मराठी साहित्यातील सुभाषदर्शन' आणि 'बंगाली साहित्यातील सुभाषदर्शन' असे दोन वैशिष्ट्यपूर्ण लेख या संग्रहात आहेत. त्यातील माहिती ही दिशादर्शक आहे. या लेखांपासून प्रेरणा घेऊन मराठीत किंवा बंगालीत पीएच. डी.चे प्रबंध होऊ शकतात. 'बंगाली साहित्यातील सुभाषदर्शन' या मूळ बंगाली लेखाचा अनुवाद प्रा. डे यांनीच केला. त्याबद्दलही मी त्यांचा आभारी आहे.

या ग्रंथसिद्धीच्या प्रवासातील दोन वंद्य मार्गदर्शकांची सोबत सुटली या जाणिवेने मन गलबलून जाते. सप्टेंबर१९९७ मध्ये श्री. विद्याधर गोखले यांचा आकस्मिक मृत्यु झाला. माननीय सांस्कृतिक मंत्री श्री. प्रमोद नवलकर यांच्यासह सगळे मंडळ जणू अवाक झाले. कै. अण्णांच्या मृत्युमुळे माझा स्वतःचा उत्साहही थोडा कमी झाला.

मात्र डॉ. मधुकर आष्टीकर यांनी अध्यक्षपदाची सूत्रे हाती घेतल्यानंतर प्रस्तुत ग्रंथाच्या निर्मितीत पहिल्या दिवसापासून लक्ष घातले. मुंबईच्या 'धर्मभास्कर' या नियतकालिकाने काढलेला नेताजी विशेषांक भाऊसाहेबांना इतका आवडला की त्यांनी

तो तातडीने माझ्याकडे पाठवून आदेश दिला की याचा उपयोग करा. उपयुक्त असाच तो मौलिक अंक आहे. आष्टीकरांनी या ग्रंथाच्या मुद्रणाचा आणि प्रकाशनाचा कालबद्ध कार्यक्रमही मला आखून दिला. पण ग्रंथाचा प्रकाशन सोहोळा पाहण्याचे त्यांच्या नशिबात नव्हते. २२ मे १९९८ ला डॉ. मधुकर आष्टीकरांचा अकस्मात मृत्यु झाला. मंडळ तर शोकाकूल झालेच पण मी नुसता भांबावून गेलो. या भांबावलेपणातून मला बाहेर काढले ते मंडळाचे चोख सचिव श्री. चंद्रकांत वडे यांनी. डॉ. आष्टीकरांच्या आकस्मिक निधनामुळे ग्रंथनिर्मितीत काही व्यावहारिक अडचणी निर्माण झाल्या होत्या. श्री. चंद्रकांत वडे आणि श्रीमती नीलाताई उपाध्ये यांनी त्या अडचणींचे निवारण केले. श्री. वडे तर मला सातत्याने ग्रंथपूर्तीचा आग्रह करीत होते.

त्या त्यांच्या आग्रहाला आज यश प्राप्त होत आहे. त्या यशाला शुभेच्छा मिळत आहेत मंडळाचे नवनियुक्त अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या. प्रा. मिरासदार हे राष्ट्रवादी बाण्याचे देशभक्त साहित्यिक म्हणून विख्यात आहेत. सध्या तर 'सावरकर' चित्रपटाच्या पटकथालेखनामुळे ते सावरकर-सुभाषमय झाले असावेत. त्यामुळे या ग्रंथाला लाभणारे त्यांचे दोन शब्दही माझ्यासारख्या संपादकाला श्रमसाफल्याचे समाधान देतील.

देशगौरव नेताजी सुभाषचंद्रांच्या कौटुंबिक जीवनापासून त्यांच्या अज्ञाताच्या प्रवासापर्यंतचा सर्व तपशील या ग्रंथात आहे. सुभाष, सावरकर आणि गांधीजी यांचे तौलनिक दर्शन या ग्रंथातून होईल. जागतिक राजकारणातील सुभाषबाबूंचे स्थान निश्चित करण्याचा प्रयत्न तसेच मार्क्सवाद आणि सुभाषवाद यांची तुलना हे देखील या ग्रंथाचे विशेष आहेत. काही लेखात औचित्य सांभाळण्यासाठी शैलीतील किरकोळ बदल केले आहेत.

या ग्रंथाचे सुरेख मुद्रण व बहिरंग स्पेक्ट्रा स्क्रीन्स ॲण्ड ग्राफिक्सचे मधुसूदन, बाळासाहेब, भूषण, मंदार या बनहट्टी परिवाराने साकार केले, त्यांचे मुखपृष्ठकार श्री. विवेक रानडे यांचे आणि सर्व संबंधितांचे मी आभार मानतो.

दि. १० जुलै १९९८
आषाढ कृष्ण प्रतिपदा

**डॉ. वि. स. जोग**
प्लॉट क्र. ६६, मांडवी भवन,
हिंदुस्थान कॉलनी, वर्धा मार्ग,
नागपूर ४४००१५

* ग्रंथसूचीच्या वेळेस उपलब्ध न झालेला पण नंतर प्राप्त झालेला एक महत्त्वाचा तपशील : निर्माल्य - ना. सी. फडके, सरिता प्रकाशन, पुणे, १९६१

# अनुक्रमणिका

**************************

# नेताजींचे कौटुंबिक जीवन

**प्रा. अमलकुमार डे**

**************************

नेताजी सुभाषचंद्र बोस यांचा जन्म बंगालमधील एका सुविख्यात कायस्थ कुटुंबात २३ जानेवारी १८९७ रोजी झाला. त्या काळच्या परंपरेनुसार कायस्थ ही एक उच्चवर्णीय जात गणल्या जात असे. 'बोस' हा शब्द संस्कृत 'बसू' या शब्दाचा अपभ्रंश आहे. बंगाली भाषेत बसू शब्दाचे बोस मध्ये रूपांतर झाले.

या बसू परिवारातील सत्ताविसाव्या पिढीमध्ये सुभाषबाबूंचा जन्म झाला. बाराव्या शतकात या परिवाराचे स्थानांतरण दक्षिण बंगालमध्ये झाले. सुभाषबाबूंच्या पूर्वजांपैकी मुक्तिराम बसू, महिपती बसू, गोपीनाथ बसू या पुरुषांनी विशेष प्रसिद्धी मिळवली. मुक्तिराम बसू हे त्यांच्या गावातील म्हणजे माहिनगरातील हिंदू जमातीचे मोठे नेते होते. महिपती बसू हे बुद्धिमान, कर्तबगार होते. बंगालच्या त्या वेळच्या सुलतानाने त्यांना आपला अर्थ आणि युद्धमंत्री नेमले होते. त्यांनी त्यांना सुबुद्धिखाँ अशी पदवी दिली. महिपती बसू यांचे नातू गोपीनाथ बसू यांना देखील राजवैभव आणि मान-सन्मान प्राप्त झाला. त्या वेळचा राजा सुलतान हुसेन खाँ यांनी त्यांना अर्थमंत्री आणि नाविकदलाचा प्रमुख म्हणून नियुक्त केले तसेच त्यांना 'पुरंदर खाँ' ही पदवी दिली.

सुभाषबाबूंचे आजोबा हरनाथ बसू यांना चार मुले होती. यदुनाथ, केदारनाथ, देवेन्द्रनाथ आणि जानकीनाथ. सुभाषचंद्रांचे वडील जानकीनाथ यांना आठ मुले आणि चार मुली होत्या. सुभाषबाबू हे त्यांच्या आईवडिलांचे नववे अपत्य होते. मुलांची नावे सतीश, शरद, सुरेश, सुधीर, सुनील, सुभाष, शैलेश आणि संतोष. मुलींची नावे प्रमिला, सरला, तरुबाला, मालिना, प्रतिभा आणि कनकलता अशी होती.

सुभाषचंद्रांची आई प्रभावतीदेवी ही हाटखोला गावातील दत्त घराण्यातील होती. प्रभावतीदेवींचे आजोबा काशीनाथ दत्त हे सुशिक्षित, प्रतिष्ठित आणि विद्वान व्यक्तिमत्व होते. त्यांचे एक जावई सर रमेशचंद्र मित्र हे कलकत्ता न्यायालयाचे पहिले भारतीय मुख्य न्यायाधीश होते. प्रभावतीदेवींचे वडील गंगानारायण दत्त यांना नऊ मुले आणि सहा मुली होत्या. पुत्रांची नावे सुरेंद्र, ज्योतिन्द्र, भूपेन्द्र, योगीन्द्र, गिरीन्द्र, बिरेन्द्र, अरुणेन्द्र, सत्येन्द्र आणि रणेन्द्र. मुलींची नावे प्रभावती, सत्यवती, रूपवती, गुणवती, कलावती आणि निशावती अशी होती. प्रभावती हे आपल्या आईवडिलांचे पहिले आणि लाडके अपत्य होते.

जानकीनाथ यांचा त्यांच्या वयाच्या विसाव्या वर्षी १८८० मध्ये प्रभावतीदेवींशी विवाह झाला.

जानकीनाथांनी कलकत्ता विद्यापीठातून बी. ए. ची पदवी प्राप्त केली. ते कलकत्त्याहून व्यवसायासाठी कटकला आले. पुष्कळ वर्षेपर्यंत त्यांनी आवश्यकतेनुसार सरकारी वकिलाचे काम केले. जानकीनाथ देशभक्त, चारित्र्यवान, शिस्तप्रिय आणि परोपकारी होते. ते आपल्या अपत्यांचे पालनपोषण करीत. सर्व मुलांनी कटक येथील शाळेमधून आणि कलकत्ता येथील महाविद्यालयातून शिक्षण घेतले. बहुतेक सर्व मुलांनी इंग्लंडमध्ये जाऊन आपले शिक्षण पूर्ण केले. पुत्रांमध्ये दोघे बॅरिस्टर, एकजण उपन्यायाधीश, दोघे इंजिनिअर व एकजण डॉक्टर होता.

त्यापैकी शरदचंद्र बसू यांना बॅरिस्टर आणि नेता म्हणून मोठी कीर्ती प्राप्त झाली. सुभाषचंद्रांचे एक बंधू शैलेश यांनी गांधीजींच्या असहयोग आंदोलनात भाग घेतला. तुरुंगवास भोगला. सुभाषचंद्रांनी आपल्या घरातील परंपरा मोडून आय. सी. एस. ची परीक्षा उत्तीर्ण केली. पुढे त्यांनीही स्वातंत्र्य आंदोलनात सहभाग घेऊन आपल्या पदवीचा आणि उपाधीचा त्याग केला.

सुभाषबाबूंचे बहुतेक सर्व भाऊ उंच, गोरे आणि विद्वान होते. सर्व भाऊ गुणवान होते. जानकीनाथ बसू हे प्रत्यक्षात सक्रीय राजकारणात किंवा स्वाधीनता आंदोलनात सहभागी झाले नसले तरी त्या आंदोलनाचे मनोमन समर्थक होते. त्यांचा आंदोलनाला पाठिंबा होता. काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनात ते दरवर्षी हजेरी लावत, सहभागी होत. असहयोग आंदोलनांतर्गत काँग्रेसच्या विधायक कार्याशी त्यांचा संबंध होता. ते स्वदेशीचे खंदे पुरस्कर्ते होते. विदेशी

वस्तूंवर बहिष्कार टाकण्यात ते आघाडीवर होते. ते देशभक्त आणि राष्ट्रवादी होते. १९१७ मध्ये न्यायाधीशांशी मतभेद झाल्यानंतर त्यांनी सरकारी वकीलपदाचा राजीनामा दिला. १९३० मध्ये सरकारी दमनचक्राचा निषेध म्हणून त्यांनी रायबहादूर या पदवीचा त्याग केला. त्यांच्या मुलांनी जेव्हा काँग्रेस आंदोलनात उडी घेतली तेव्हा त्यांच्या या कृत्याला जानकीनाथ बसूंचा पाठिंबा होता. जेव्हा स्वातंत्र्यसंग्रामात सुभाषबाबू पहिल्यांदा तुरुंगात गेले तेव्हा जानकीनाथ अभिमानाने म्हणाले, " I am proud of Subhas. " अशा देशभक्त पित्याचा तितकाच देशभक्त पुत्र निर्माण झाला यात आश्चर्य ते कोणते ?

जानकीनाथ हे निरलस समाजसेवक आणि गोरगरिबांचे कैवारी होते. शाळा महाविद्यालयातील अनेक विद्यार्थ्यांना ते आर्थिक सहाय्य करीत. अनेक गोरगरीब विद्यार्थी त्यांचे आश्रित होते. कटकमधील अनेक गोरगरीब नातेवाईकांना त्यांच्या संकटकाळात त्यांनी आर्थिक सहाय्य केले. प्रतिवर्षी दुर्गापूजा उत्सवात ते आपले जन्मगाव कोवाली येथे जात आणि दुर्गापूजा उत्सवात उत्साहाने सहभागी होत. दुर्गापूजा उत्सवासाठी आपल्या आईवडिलांकडे सुभाषबाबूही कोवाली गावात जात होते. या गावातल्या वातावरणाने सुभाषला प्रभावित केले. आपल्या आत्मचरित्रात एके ठिकाणी सुभाषबाबू आपल्या वडिलांविषयी सांगतात. 'माझे वडील जानकीनाथ हे एक स्वाभिमानी पुरुष होते. त्यांनी केवळ स्वतःच्या कर्तृत्वावर स्वतःच्या कुटुंबाची उभारणी केली. त्यांची इच्छा होती की त्यांची मुलेही आपल्यासारखी निघावीत. त्यांनी आपल्या मुलांना सर्वप्रकारे स्वातंत्र्य दिले. त्यांच्या स्वातंत्र्यात कधीही ढवळाढवळ केली नाही. ते विशाल अंतःकरणाचे होते. दीनदुबळ्यांसाठी त्यांच्या मनात करुणा होती. ते मुक्तहस्ताने दानधर्म करीत. पण आपल्या दानधर्माचा त्यांनी कधी गाजावाजा केला नाही. ते आदर्श पिता, आदर्श पती, आदर्श कुटुंबप्रमुख आणि आदर्श नागरिक होते. सत्याला धर्म मानत. त्यांनी जे आयुष्य व्यतीत केले ते अनुकरणीय होते.'

सुभाषचंद्र हे एका विशाल परिवाराचे घटक होते.सुभाषबाबूंचे आईवडील, भाऊ बहिणी, काका, मामा, याशिवाय जवळचे आणि दूरचे नातेवाईक मिळून अनेक जण त्या मोठया परिवारात गुण्यागोविंदाने राहत. म्हणून आईवडिलांना केवळ सुभाषवर एकट्यावरच लक्ष केंद्रित करणे शक्य नव्हते. त्यांच्या बालपणी त्यांचे संगोपन आईवडिलांशिवाय इतर कुटुंबियांनी देखील आत्मीयतेने केले.

सुभाषबाबूंना तीन मोठ्या बहिणी होत्या. प्रमिला, सरला, तरुबाला. सुभाषच्या जन्मापूर्वीच प्रमिला आणि सरला यांचा विवाह झाला. तरुबाला सुभाषपेक्षा पाच वर्षांनी मोठी होती. सुभाषबाबूंना मोठ्या बहिणींचे प्रेम, कौतुक, सहवास सुख मिळाले. त्यांच्या पेक्षा पाच भाऊ मोठे होते. सतीश, शरद, सुरेश, सुधीर, सुनील. हे सर्व भाऊ गंभीर प्रवृत्तीचे होते. स्वतःमध्येच गर्क असत. त्यांचे सुभाषवर खूप प्रेम होते. तरीही त्यांना सुभाषचं कोडकौतुक करण्यासाठी पुरेसा वेळ मिळणे कठीण होते. जानकीनाथ हे स्वतः तर अत्यंत कामात असायचेच. आपल्या मुलांना जितका वेळ देणे आवश्यक होते तितका वेळ त्यांना मिळत नसे. परंतु सुभाष स्वतः अत्यंत लोभस असल्यामुळे इतरांचे लक्ष तो आकृष्ट करीत असे.

सुभाषचंद्रांनी आपल्या अपूर्ण आत्मचरित्रात एका ठिकाणी लिहिले आहे की, ' बालपणाच्या ज्या आठवणी मला येतात त्या म्हणजे मी एक जणू उपेक्षित घटक होतो. आम्ही आमच्या आईवडिलांना अत्यंत आदर देत असू. साधारणतः आमचे वडील अत्यंत गंभीर वृत्तीचे होते. ते आम्हा मुलांपासून अंतर राखून वागत. त्यांना समाजसेवा आणि आपला व्यवसाय यापलिकडे आपल्या परिवाराकडे बघायला वेळ मिळत नसे. जितका वेळ मिळायचा तितका ते पुरवून पुरवून कुटुंबासाठी काढीत. मुलांमध्ये जो सगळ्यात लहान होता त्याला जास्त प्रेम मिळायचे पण जास्त काळ नाही. कारण नवीन मुलाचा जन्म झाला की मग सगळे लक्ष त्याच्यावर केंद्रित व्हायचे. वडिलांच्या मनात काहीही असो ते इतके निरपेक्ष होते की कोणावर त्यांचे जास्त प्रेम आहे हे देखील कळत नसे. आणि आई ? ती जरी अनेक बाळंतपणामुळे थकली दुबळी झाली होती तरी तीही आपल्या मुलांवर अतिशय प्रेम करत असे. या विषयी अजिबात संशय नाही, ती कुटुंबाची खऱ्या अर्थाने प्रमुख होती. लहानपणापासून आपल्या आईवडिलांशी संबंध अधिक घनिष्ठ व्हावेत अशी माझी लहानपणापासून इच्छा होती. ज्या मुलांना आपल्या आईवडिलांचे अधिकाधिक प्रेम मिळायचे त्यांचा मला द्वेष वाटायचा. माझ्या अतिशय भावुक मनःस्थितीमुळे कदाचित मला इतर मुलांविषयी जास्त द्वेष वाटायचा. ' ( आत्मकथा पृ. २)

आईवडिलांचे प्रेम जरी त्यांना मिळाले नाही तरी आईवडिलांचे अनेक गुण वंशपरंपरेने त्यांच्या ठिकाणी उतरले. आईवडिलांप्रमाणेच ते उदार, पवित्र, तेजस्वी आणि सात्विक झाले.

बसू परिवारात अनेक नोकरचाकर होते त्यात काहीजण मुसलमानही होते.

सुभाषचे आईवडील त्यांच्या घरातील नोकरांना आपल्या कुटुंबातील एक घटक मानत. त्यांचा ते कधीही अपमान करीत नसत. चाकर आणि मालक यांच्यात ते कधीही अंतर ठेवत नसत. या नोकरांशी सुभाष आणि त्यांच्या आईवडिलांचा संपर्क अतिशय घनिष्ठ होता. भविष्यात सुभाषबाबूंचे ठिकाणी जो मनमिळाऊपणा, सगळ्यांशी आपलेपणाने वागण्याची वृत्ती आणि प्रेम हे गुण आले ते सुभाषबाबूंचे ठिकाणी या लहानपणाच्या संस्कारांमुळे निर्माण झाले.

सुभाषच्या ठिकाणी लहानपणी आणखी एक गुण होता. त्यांच्या लक्षात आले की, कोणतीही गोष्ट घरात आली की त्यांची सारखी वाटणी करावी. कोणत्याही गोष्टीसाठी भांडणतंटा कधीही होत नसे. सुभाषचा संपूर्ण परिवार द्वेष, स्वार्थीपणा यातून मुक्त असायचा.

सुभाषबाबूंची आई जानकीदेवी ही अतिशय सत्शील आणि धर्मपरायण साध्वी होती. त्यांच्या धार्मिकपणाचा सुभाषच्या मनावर मोठा परिणाम झाला. सुभाष लहानपणापासूनच धार्मिक होता. भविष्यात सुभाषबाबूत त्याग आणि बलिदानाची भावना जागृत झाली, ती सुभाषवरच्या धार्मिक संस्कारामुळेच.

सुभाषबाबूंनी लिहिलेल्या पत्रातून सुभाषबाबूंच्या धर्मप्रीतीचा प्रत्यय येतो. १९१२ मध्ये कटकमध्ये त्यांनी आईला लिहिलेल्या पत्रात असे म्हटले आहे की ‘आज नवमी म्हणून तू आज दुर्गादेवीच्या आराधनेत मग्न असशील. कदाचित या वर्षी पूजा खूप थाटामाटात संपन्न होत असेल. परंतु आई! इतक्या वैभवाचे प्रयोजन काय? ज्या पूजेत आम्ही भक्तीरूपी चंदन आणि प्रेमरूपी पुष्प यांचा उपयोग करतो तीच पूजा सर्वश्रेष्ठ समजावी. वैभवाच्या प्रदर्शनामुळे भक्ती लुप्त होते. यावर्षी एक दुःख राहिले ते जे दुःख आहे ते मोठे दुःख आहे, साधारण दुःख नाही. यावर्षी मी गावात नसल्याने त्रैलोक्य पूजा मी करू शकलो नाही. सर्वदुःख-हारिणी महिषासुरमर्दिनी, दुर्गादेवीच्या ज्योतिर्मयी मूर्तीचे दर्शन घेऊन डोळ्यांचे सार्थक करू शकलो नाही.’ (पत्र क्र.१)

आईला लिहिलेल्या एका पत्रात त्यांच्या आस्तिक्यबुद्धीचा आणि प्रगाढ देशभक्तीचा आविष्कार दिसतो. ते म्हणतात, ‘भारत ही ईश्वराची प्रिय भूमी आहे. परमेश्वराने या महान देशात लोकांच्या उद्धारासाठी पुनःपुन्हा अवतार घेतले. पापी लोकांना पापापासून मुक्त केले. प्रत्येक देशवासीयाच्या अंतःकरणात धर्मभावना आणि सत्य यांचे बीजारोपण केले.’

हे विचार एका किशोराचे आहेत.

पुढे मंडालेच्या तुरुंगातून वहिनी विभावतीदेवी हिला लिहिलेल्या पत्रात सुभाषबाबू लिहितात, 'एक वर्षापासून देशाच्या दूर राहिल्यानंतर आज जाणवते की आपली मातृभूमी किती सुंदर, प्रिय आहे! वियोगामुळे आज मातृभूमीविषयीचे प्रेम अधिकच उफाळून आले. स्वर्गापेक्षाही प्रिय वाटणाऱ्या या मातृभूमीसाठी हालअपेष्टा सहन करण्यातही आनंद आहे.' (पत्र क्र. ११५ मंडाले : १६-१२-१९२५)

देशबंधू चित्तरंजनदास यांच्या पत्नी वासंतीदेवी यांना लिहिलेल्या पत्रातून सुभाषबाबूंची हीच भावना प्रगट होते. (पत्र क्र. १०८ मंडाले : २५-१-१९२५)

सुभाषबाबूंनी आपल्या परिवारजनांना लिहिलेल्या अनेक घरगुती पत्रातूनही आपल्याला त्यांच्या ईश्वरनिष्ठेचे नि देशभक्तीचे प्रत्यंतर मिळते. कौटुंबिक संस्कार, धर्मप्रीती आणि देशभक्ती असा हा भावनिक प्रवास आहे. पारिवारिक वातावरणामुळेच परमेश्वरपूजेचा पर्याय म्हणून देशसेवा त्यांच्या मनात अंकुरित झाली. अंतिमतः त्यांनी विराट स्वातंत्र्यसंग्रामात स्वतःला झोकून दिले. सुभाषच्या व्यक्तिमत्वाच्या जडणघडणीत यांच्या भावाबहिणींचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष वाटा होता. अर्थात तरीही एकजण दुसऱ्यापेक्षा वेगळा होता. प्रत्येकजण आग्रही होता. कोणीही कोणाच्या दडपणाखाली येत नव्हता.

सुभाषबाबूंच्या जणू परिवारातीलच एक व्यक्ती म्हणजे त्यांचे लहानपणचे शिक्षक श्री. बेणीमाधवदास. बेणीमाधवदासांचे चारित्र्यशुद्ध वर्तन सुभाषच्या मनात नैतिकतेची भर घालण्यास कारण ठरले. बेणीमाधवदासांनी त्यांना निसर्गप्रीतीचे पाठ दिले. त्यांच्या उपदेशानेच सुभाष नदीच्या काठावर, टेकडीच्या पठारावर किंवा सागराच्या किनाऱ्यावर तासन्तास ध्यानसाधना करीत असे. या काळात ध्यानयोगाने ते इतके प्रभावित झाले होते की आपल्या आजीशीही ते याच विषयावर बोलत.

किशोरावस्थेतून यौवनावस्थेत पदार्पण करताना त्यांच्या मनात दुसरा एक संघर्ष सुरू झाला. एका बाजूला अध्यात्माचे आकर्षण तर दुसऱ्या बाजूला तारुण्यसुलभ भावनांची ओढ असे या संघर्षाचे स्वरूप होते. तारुण्यसुलभ वासनांना स्वतःची शारीरिक, मानसिक दुर्बलता समजून त्या विरुद्ध त्यांनी आंतरिक संघर्ष सुरू केला. त्या संघर्षात त्यांना एक आदर्श साह्यभूत झाला. ते आदर्श होता स्वामी विवेकानंद साहित्याचा. सुभाष स्मरण देतात की, 'एक दिवस अचानक एक गोष्ट मला सापडली. त्या गोष्टीने माझ्या आंतरि

संघर्षातून मला सोडवले. आमचे एक आप्त आमच्या शेजारी राहायला आले. निरोपाबिरोपासाठी त्यांच्या घरी मला नेहमी जावे लागे. त्यांच्या खाजगी ग्रंथालयातील पुस्तके चाळताचाळता माझे लक्ष विवेकानंदांच्या एका पुस्तकाकडे गेले. त्या पुस्तकाची दोनचार पाने वाचल्यावर माझ्या लक्षात आले की अरे, आपण ज्याच्या शोधार्थ आहोत नेमकी तीच गोष्ट आपल्याला सापडली. मी ते पुस्तक वाचायला घरी आणले. पुस्तक वाचता वाचता मी रोमांचित झालो. तत्पूर्वी माझ्या शिक्षकांनी माझ्या मनात नैतिकता आणि दृष्टीत सौंदर्यभावना निर्माण केली होती. विवेकानंद साहित्यांने मला त्याहून आणखी काही शिकवले. एक नवा आदर्श मला दिला.

त्यानंतर दिवसच्या दिवस, आठवडेच्या आठवडे, महिनेच्या महिने मी विवेकानंद साहित्याचे वाचन-पारायण-चिंतन केले. कोलंबो, अल्मोडा या विविध ठिकाणची त्यांची भाषणे, पत्रे, उपदेश हे सर्व मी नीट अभ्यासिले. विवेकानंदांच्या शिकवणुकीचे जणू सारसर्वस्व मला प्राप्त झाले ते म्हणजे जीवनाचे ध्येय-मानवसेवा. '(सुभाषचंद्र बसू समस्त रचनावली, प्रथम खंड पृ. २० )

सुभाषबाबूंच्या आयुष्यात विवेकानंद साहित्याचे आगमन झाले तेव्हा त्यांचे वय केवळ पंधरा वर्षांचे होते. विवेकानंदांप्रमाणेच रामकृष्ण परमहंसांच्या विचारांकडेही विवेकानंद आकृष्ट झाले. त्यांचे अनेक तरुण सोबतीही त्या विचारांनी भारले होते. शाळेत, शाळेच्या बाहेर रामकृष्ण यांच्याशिवाय दुसरा विषय या मित्रमंडळींत नसायचा. ही सर्व झपाटलेली मंडळी मग विवेकानंदांच्या विचारांप्रमाणे आचार करू लागली. आसपासच्या खेड्यात जाऊन खेडूतांमध्ये ग्रामसुधारणेचे कार्य करू लागली. अभ्यासाकडे त्यामुळे काहीसे दुर्लक्ष होत चाललेले पाहून त्यांच्या आईवडिलांना त्यांची काळजी वाटू लागली. परंतु तीक्ष्ण बुद्धीचा सुभाष त्याही परिस्थितीत मॅट्रीकच्या परीक्षेत दुसरा आला.

वडिलांनी, जानकीनाथांनी त्यांना कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजात उच्चशिक्षणासाठी पाठविले. तिथेही त्यांना विवेकानंदांच्या शिकवणीने भारलेले मित्र मिळाले. त्यांच्या जीवनाचा उद्देशच मुळी जागरूक राहून देशसेवा करण्याचा होता. आध्यात्मिक जीवनाविषयीचे त्यांचे आकर्षण वाढत गेले. त्यांनी निर्धार केला की आपण संन्यासी बनू. त्यासाठी ते एका गुरूच्या शोधात निघाले. गुरूच्या शोधासाठी त्यांनी अनेक तीर्थस्थळांना भेटी दिल्या परंतु त्यांना हवा होता तसा गुरू मिळाला नाही. त्यामुळे ते पूर्ववत आपल्या अध्ययनाकडे लक्ष देऊ लागले.

त्यामुळे त्यांचे आईवडील निश्चिंत झाले. परंतु ही त्यांची निश्चिंतता फार काळ टिकली नाही. या त्यांच्या आयुष्यक्रमातच ती प्रसिद्ध घटना घडली. एका युरोपियन प्राध्यापकाशी त्यांचा संघर्ष उडाला. त्यामुळे काहीकाळ त्यांच्या शिक्षणात खंड पडला पण त्यावेळेचे कलकत्ता विद्यापीठाचे कुलगुरू अशुतोष मुखर्जी यांच्यामुळे त्यांना पुन्हा महाविद्यालयात प्रवेश मिळाला. त्यांच्या आईवडिलांची काळजी दूर झाली.

या काळातील आध्यात्मिक मानसिकतेचे प्रतिबिंब कटकहून आईला लिहिलेल्या एका पत्रातून मिळते. ते म्हणतात, ' परमेश्वराची असीम कृपा. आपण जर विचार केला तर या जगातल्या प्रत्येक वस्तूत त्याच्या कृपेचा आशीर्वाद बघायला मिळतो. परंतु आम्ही आंधळे आहोत. आम्ही नास्तिक आहोत. परमेश्वराच्या या कृपेची आम्हाला जाणीवच होत नाही आणि जाणीव व्हावी तरी कशी ? केवळ संकटाच्या प्रसंगातच आम्ही देवाचा धावा करतो परंतु जेव्हा आमच्या दुःखाचे निवारण होते तेव्हा लगेच आम्ही परमेश्वरास विसरतो. (पत्र क्र. ४)

देशात स्वातंत्र्य चळवळीने जोर पकडला. या चळवळीचे वारे सुभाषच्या कानात शिरू नये म्हणून त्यांच्या वडिलांनी त्यांना केंब्रीज विद्यापीठात आय. सी. एस. च्या शिक्षणासाठी पाठविले. त्यावेळेस त्यांनी आय. सी. एस. ची परीक्षा गंभीरपणे घेतली नाही. आपण ही परीक्षा उत्तीर्ण होणार नाही असे त्यांना वाटत होते. प्रत्यक्षात त्यांना या परीक्षेत चौथा क्रमांक प्राप्त झाला. त्यावेळेस नोकरी की स्वातंत्र्य आंदोलन या संघर्षात सापडलेल्या सुभाषबाबूंनी शरदबाबूंना पत्र लिहिले की, ' सिव्हिल सर्व्हिसमध्ये राहून देखील देशसेवा करता येईल असे वडिलांनी कळविले आहे त्यासाठी कै. रमेशचंद्र दत्तांचे उदाहरण देखील कळविले आहे. मला स्वतःला अरविंद घोषांचा कर्ममार्ग प्रेरणा देतो. तो मार्ग संकटाने भरलेला आहे तरीही जास्त उपयुक्त आहे.'

उत्तराला शरदबाबूंनी लिहिले की, ' पहिल्यांदा तुम्ही नोकरी स्वीकारा. नंतर वाटले तर नोकरी सोडून द्या.'

परंतु त्यावेळेस सुरू असलेल्या असहकार आंदोलनात सहभागी होण्यासाठी सुभाषबाबू अतिशय आतुर होते. त्यांनी स्वातंत्र्य आंदोलनात उडी घेतली.

त्यानंतर सुभाषच्या आयुष्याचा असहयोग आंदोलन ते आझाद हिंद फौज असा तेजाळ कालखंड सुरू झाला. पण तो प्रस्तुत लेखाचा विषय नाही.

आमच्या देशातील अनेकांची समजूत अशी आहे की सुभाषबाबूंना गृहस्थाश्रमासंबंधी आकर्षण नव्हते. अशी समजूत होती की देशसेवेसाठी सुभाषबाबू अविवाहित राहतील. पण ही समजूत चुकीची आहे. ही गोष्ट खरी आहे की सुरुवातीच्या काळात त्यांना संन्यासी जीवनाचे आकर्षण होते पण प्रत्यक्षात संन्यासात मिसळल्यानंतर तेथील भेदाभेद पाहून त्यांचा भ्रमनिरास झाला.

त्यांनी आपल्या अपूर्ण आत्मकथेत एके ठिकाणी लिहिले आहे की, 'रामकृष्ण आणि विवेकानंद यांच्या प्रभावांनी मी कामजीवन दडपण्याचा प्रयत्न केला. पण त्यात मला यश आले नाही.' देशासाठी अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा त्यांनी कधीच केली नव्हती. त्यांना मातेसमान असणाऱ्या वासंतीदेवी चित्तरंजन दास यांनी आठवण दिली आहे की, 'मी विवाह करणार नाही,' असे सुभाष कधीच म्हणत नसे.

त्यांचा ठरविलेल्या विवाहावर कधीच विश्वास नव्हता. त्यांना अनेक मुली सांगून आल्या. पण त्यांनी एकही मुलगी पाहिली नाही. त्यांच्याशी विवाह करण्यास अनेक बंगाली युवती आतुर होत्या. त्यांच्या सहवासात काही सुंदर मुली आल्या देखील. पण सुभाषचे हृदय काही जिंकू शकल्या नाहीत.

वयाच्या चाळीसाव्या वर्षी त्यांनी एका विदेशी युवतीशी विवाह केला. ती होती ऑस्ट्रियाची एमिली सैंकल. त्यांचे वैवाहिक जीवन १९३७ मध्ये सुरू झाले. त्यांची एमिलीशी पहिली भेट १९३४ मध्ये विएन्ना येथे झाली. एक वर्ष कारावासात राहिल्यावर ते प्रकृती सुधारण्यासाठी विएन्ना येथे गेले होते. त्यावेळेस ते युरोपमध्ये काहीसे निर्वासित होते. म्हणूनच कदाचित ते आणि एमिली अधिक सहवासात आले असावे. एमिली या ऑस्ट्रियन होत्या पण त्यांचे इंग्रजी अतिशय सुंदर होते. हे त्यांचे इंग्रजी सुभाषबाबूंना उपयुक्त ठरले. सुभाषबाबूंची अनेक गुप्त कागदपत्रे त्या टंकलिखित करायच्या. सुभाषबाबूंचे आत्मचरित्र लिहायला देखील एमिली बाईंची खूप मदत झाली. १९३४ मध्ये झालेल्या परिचयाचे रूपांतर प्रेमात नंतर विवाहात झाले. हा विवाह त्यांनी गुप्तपणे केला. १९४२ मध्ये त्यांना एक मुलगी झाली. तीचे नांव त्यांनी अनिता असे ठेवले. आपले लग्न त्यांनी अनेक दिवस आपल्या कुटुंबियांपासून आणि देशवासियांपासून गुप्त ठेवले. त्याचे कारण एमिलीला सांगितले की, "माझे पहिले प्रेम माझ्या देशवासीयांवर आहे ही गोष्ट माझ्या लोकांना माहित आहे.

अशावेळेस उगाच त्यांच्या मनात तर्ककुतर्क आत्ताच निर्माण होण्यापेक्षा काह
काळ ही गोष्ट गुप्त राहिलेली बरी."

आपल्या लग्नाची पहिली वाच्यता कुटुंबियांपैकी शरदबाबूंजवळ १९४
मध्ये पत्र लिहून केली. जर्मनीमधून जपानला पाणबुडीतून जात असतान
त्यांनी शरदबाबूंना लिहिले, 'परमपूज्य मेजदादा, आज मी पुन्हा एकद
धोकादायक प्रवास करीत आहे. परंतु आता जपानमार्गे घरी चाललो आहे
कदाचित या मार्गाचा शेवट पाहण्याचे माझ्या नशीबात नसेलही. अशी काह
दुर्घटना झाली तर माझी काहीच वार्ता तुम्हांला कळणार नाही. म्हणूनच मी एव
महत्वाची वार्ता तुम्हाला देतो. मी लग्न केले, मला एक मुलगी आहे. मी नसेन
तेव्हा माझ्या मागे माझी पत्नी आणि माझी मुलगी यांची तुम्ही काळजी घ्या. तशी
तुम्ही घ्यालच असा मला विश्वास आहे.' (बर्लिन ८.२.१९४३)

दुसरे महायुद्ध संपल्यावर शरद बोस विएन्ना मध्ये गेले. त्यांनी एमिल
आणि अनिता यांचा आपल्या कुटुंबात सन्मानाने स्वीकार केला.

श्रीमती एमिली दिसायला सुंदर होत्या. स्वभावाने उत्तम होत्या. भारती
स्त्रियांप्रमाणे परंपरावादी होत्या. पण स्वतंत्र व्यक्तिमत्वाच्या, स्पष्टवक्त्या, आणि
निर्भय होत्या. भरताच्या स्वातंत्र्य संग्रामाविषयी त्यांना सहानभूती होती. त्य
प्रसिद्धिपराङ्मुख होत्या. सुभाषचंद्रांची पत्नी म्हणून त्यांनी कधीही अहंका
मिरवला नाही. आपले दांपत्य जीवन सार्वजनिक करायला त्या उत्सुक नव्हत्या
सुभाषबाबूंनी त्यांना लिहिलेली पत्रे त्यांनी पुष्कळ वर्ष प्रसिद्ध करू दिली नाहीत
सुभाषबाबू पत्राद्वारे नेहमी त्यांच्या संपर्कात असत. काँग्रेसच्या कार्यात व्यस्त
असताना देखील ते एमिलीला पत्रे लिहीत. गांधीजींशी मतभेद झाले
त्याहीवेळेस त्यांनी आपली मनःस्थिती पत्राद्वारे एमिलीला कळविली होती. ह
सर्व पत्रे वाचली असता लक्षात येते की एमिलीने त्यांचे भावजीवन किती व्यापले
आहे. १९४१ मध्ये कलकत्त्याहून भूमिगत मार्गाने ते बर्लिनला आले. त्यावेळेस
हिटलरशी भेट हे तर त्यांचे राजकीय उद्दिष्ट होतेच पण प्रिय पत्नीशी भेट घेण
हाही उद्देश होता. बर्लिनमध्ये जेव्हा त्यांना कळले की हिटलर आपल्याल
बिनशर्त समर्थन देत नाही त्यावेळेस ते एकदम निराश झाले त्या त्यांच्या
निराशाग्रस्त अवस्थेत एमिलीने सावरले.

नंतर रासबिहारी बोस यांनी सुभाषबाबूंना आझाद हिंद सेनेचे नेतृत्व
करण्यास आमंत्रित केले. तत्पूर्वी दोन वर्ष त्यांना सुखी कौटुंबिक जीवन लाभले

पुढे आपली पत्नी आणि मुलगी यांना सोडून पूर्व आशियात ते पाणबुडीने निघून गेले. आझाद हिंद सेनेचा कार्यभार सांभाळल्यावर देखील त्यांनी कौटुंबिक जीवनात कुचराई केली नाही. त्यांनी एमिलीला लिहिलेली पत्रे ब्रिटिश हेर खात्याने जप्त केली.

जपानचा आणि आझाद हिंद सेनेचा पराभव झाला त्यावेळेस रशियात जाण्याची त्यांची इच्छा होती. तेथून पुन्हा स्वातंत्र्यसंग्राम नव्याने सुरू करावा ही इच्छा होती. रशियात जाण्याचे एक कारण एमिलीशी भेट हे होते. अज्ञाताच्या प्रवासाला निघण्यापूर्वी त्यांनी आझाद हिंद फौजेतील राणी लक्ष्मी पथकातील कॅप्टन लक्ष्मी सहगल यांना आपल्या मुलीचा व पत्नीचा ठावठिकाणा सांगितला आणि स्वतःच्या माघारी त्यांची काळजी घेण्यास सांगितली.

जितके काही कौटुंबिक जीवन सुभाषबाबूंना लाभले ते त्यांनी सुखाने व्यतीत केले. त्यांच्या पत्नी दोन वर्षापूर्वी वारल्या. कन्या ऑस्ट्रियात प्राध्यापक असून सुखी वैवाहिक जीवन व्यतीत करीत आहे.

● ●

************************

# सुभाषचंद्र बोसांचे अद्वितीय व्यक्तिमत्व

पु. ना. ओक

************************

बहुसंख्य समकालीन जनांनी एक नामांकित काँग्रेसी पुढारी एवढ्या एकाच भूमिकेत सुभाषचंद्रांना पाहिलेले असल्याने महात्मा गांधींच्या नेतृत्वात सहभागी झालेल्या दुय्यम पुढाऱ्यांत सुभाषचंद्र बोस हेही एक होते असेच सामान्य जनांचे सुभाषचंद्रांसंबंधीचे मूल्यांकन होणे स्वाभाविक होते. माझेही तसेच होते.

पण पुढे दैवयोगाने सुभाषचंद्रांच्या अंतिम सुमारे सव्वादोन वर्षांच्या स्वबळावर गाजवलेल्या दैदिप्यमान कर्तृत्वाच्या काळात त्यांच्या हजारो अनुयायांत मीही एक असल्याने त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्वाचे मला जे दर्शन घडले ते कसे अद्वितीय होते हे जाणून घेणे सर्वांनाच बोधप्रद, स्फूर्तिदायी व प्रेरक ठरू शकेल.

तत्कालीन काँग्रेसी पुढाऱ्यांत महात्मा गांधींच्या तंत्राने वागणाऱ्या नेत्यांत जवाहरलाल नेहरू, सरदार पटेल, मौलाना आझाद, जे. बी. कृपलानी, सुभाषचंद्र बोस आदि व्यक्तींना काँग्रेसी चळवळीतील एक घटक असेच लोक ओळखीत. त्यांच्यात क्वचित काही तुरळक मतभेदही होत. तशाच अवस्थेत सुभाषचंद्रांनी (FORWARD BLOCK) फॉर्वर्ड ब्लॉक नावाची स्वतःची एक शाखा सुरू केली होती. कधी निःशस्त्र सत्याग्रह, कधी इंग्रजांशी वाटाघाटी अशा उपायांनी स्वातंत्र्य कसे, केव्हा मिळेल याबद्दल सुभाषचंद्रांची वैयक्तिक चिंता वाढीस लागली होती. म्हणून काँग्रेसी चळवळीतील प्रखरता व तत्परता तीव्र करण्याच्या दृष्टीने त्यांनी फॉर्वर्ड ब्लॉकचा फाटा फोडला होता, तरी मुख्य प्रभाव महात्मा गांधींचाच सर्वत्र असल्याने फॉर्वर्ड ब्लॉक काही विशेष करू शकेल असे कोणालाच वाटत नव्हते.

सन १९३९ साली मी पुण्यात एम्. ए., एल्एल्. बी. चा अभ्यास करीत असता नव्याने स्थापन केलेल्या फॉर्वर्ड ब्लॉक शाखेचा जनतेस परिचय करून देण्याच्या उद्देशाने सुभाषचंद्र पुण्यास आले असता टिळक स्मारक मंदिराच्या परिसरातील उघड्या आवारात त्यांचे प्रभावी भाषण झाले. श्रोते बहुसंख्य होते. तरी काँग्रेसचे धोरण व कार्यपद्धती याहून वेगळे असे हे काय करणार असाच सार्वजनिक समज होता. जयप्रकाश नारायण, राम मनोहर लोहिया इत्यादींच्या थोड्या वेगळ्या फाट्याप्रमाणेच फॉर्वर्ड ब्लॉक हाही एक फाटा आहे असाच त्या काळी सार्वजनिक समज होता. यासंबंधात तत्कालीन स्वराज्य पार्टी नावाच्या एका दुय्यम पक्षाचे एक नेते जमनादास मेहता हे विनोदाने म्हणायचे की, "काँग्रेसच्या या विविध शाखा फॉर्वर्ड ब्लॉक, बॅकवर्ड ब्लॉक (Backward Block), इतरांचा Awkward Block) ऑक्वर्ड ब्लॉक इत्यादींचे अध्वर्यू हे सारे ब्लॉकहेडस् (Block heads)" म्हणजे बिनडोक व्यक्ती.

म्हणून फॉर्वर्ड ब्लॉक स्थापन करण्यात सुभाषचंद्रांचा नेमका काय उद्देश होता हे त्यांच्या अंतिम स्वातंत्र्यसंग्रामाच्या संदर्भानेच स्पष्ट होणार होते. पण त्यासाठी बालपणापासूनच्या त्यांच्या जीवनाचा व विचारप्रणालीचा आढावा घेणे आवश्यक आहे.

सुभाषचंद्रांचे पिता जानकीनाथ बोस हे कटक नगरी वकीली करीत. त्यांच्या सात पुत्रात सुभाषचंद्र हे सहावे. जन्मतारीख २३ जानेवारी १८९७ दुपारी १२॥ चा जन्म. शालेय जीवनापासून सुभाषचंद्र खूप हुशार म्हणून नावाजले. वार्षिक बक्षिस समारंभात पारितोषिक वितरण प्रसंगी "सुभाषचंद्र बोस.... सुभाषचंद्र बोस" हेच नाव प्रेक्षकांना वारंवार ऐकू येई.

अशा या सुभाषचंद्रांच्या मनात शिक्षणातून आपला देश आंग्लांच्या अंमलाखाली असल्याचे तीव्र शल्य रुतले. त्या टोचणीने बेचैन होऊन सुभाषचंद्र व त्यांच्या आठदहा साथीदारांनी "देश स्वतंत्र केल्याशिवाय आपण विवाह करणार नाही." अशी शपथ घेतली. पुढे मॅट्रिक झाल्यावर सुभाषचंद्र बोस कलकत्त्यास प्रेसिडन्सी कॉलेजात शिकू लागले. तेथे एका आंग्ल प्राध्यापकाने वर्गात हिंदुस्थानी जनतेबद्दल काही निंदायुक्त उद्‌गार काढले. त्याबरोबर युवा सुभाषचंद्रांनी उभे राहून त्या प्राध्यापकाचा निषेध केला. म्हणून सुभाषचंद्रास कॉलेजातून कादून टाकण्यात आले. बी. ए.ची परीक्षा काही महिन्यांवरच येऊन ठेपली होती. त्यामुळे या होतकरू विद्यार्थ्याच्या साऱ्या थोरल्या हितचिंतकांची

धावपळ सुरू झाली. शिस्तभंगाच्या आरोपाखाली प्रेसिडेन्सी कॉलेजमधून काढून टाकलेल्या या हुशार विद्यार्थ्यास शेवटी स्थानिक इसाई कॉलेजात प्रवेश मिळून बी. ए. च्या परीक्षेला बसता आले व त्यात तो नेहमीप्रमाणे पहिल्या श्रेणीत उत्तीर्णही झाला.

साहजिकच हा गुणी, हुषार विद्यार्थी I.C.S. परीक्षेतही उत्तीर्ण होऊन हिंदुस्थानातील आंग्ल सत्तेचा मोठा अधिकारी म्हणून जीवन कंठू शकेल अशी स्वप्ने त्याचे पिता व कुटुंबातील अन्य वडिलधारी माणसे पाहू लागली.

पण सुभाषचंद्रांच्या मनात अगदी विपरीत बेत घर करीत होता. इंग्रजांच्या हातून हिंदुस्थान स्वतंत्र कसा करता येईल याचा खल सुभाषचंद्रांच्या मनात अविरत चालला होता. त्या दृष्टीने त्याने अन्य परतंत्र देशांच्या नेत्यांनी परस्थांच्या कचाट्यातून स्वातंत्र्य कसे मिळवले त्याचा सखोल अभ्यास म्हणून सुभाषचंद्राने इटलीचे मॅझिनी व गॅरिबाल्डी, आयर्लंडचे यूमान डी. व्हॅलेरा इत्यादींची चरित्रे वाचून त्यावर चिंतन, मनन करण्याचा सपाटा लावला. त्यातून "रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले ?" हा निष्कर्ष त्यांच्या मनात रुजला.

भारताची (त्यावेळची) लोकसंख्या ३३ कोटी असता या देशात इंग्रज सैनिक आदि मिळून अवघे तीन चार लाख परस्थ शासक असताना एका विविक्षित क्षणी सारी जनता प्रक्षोभित होऊन उठली तर हिंदुस्थान तत्क्षणी स्वतंत्र नाही का होणार ? हा विचार सुभाषचंद्राच्या मनात थैमान घालायचा. म्हणून पुढे मी त्यांच्या तोंडून हा उद्‌गार ऐकला होता की, " आपण सगळे एकत्र एका वेळी नुसते थुंकलो तरी त्या तळ्यात सारे परस्थ आंग्ल शासक बुडून मरतील." तरी हा साधा हिशेब प्रत्यक्षात का उतरत नाही याचे सुभाषचंद्रास सखेद आश्चर्य वाटे. असे असताही सुभाषचंद्राच्या मनातील मूलभूत तळमळ वेगळीच होती. या जड जगताच्या व्यवहाराच्या मोहात न पडता आपण संन्यास घ्यावा ही त्यांच्या मनाची खरी तळमळ होती. या बाबतीत अरविंद घोष, स्वामी विवेकानंद इत्यादींचे आदर्श सुभाषचंद्रांच्या मनात ठसले होते. तो विचार एवढा प्रबल होता की वयाच्या १८ व्या वर्षीच हा तरूण भगवी लुंगी व बंडी परिधान करून एक दंड हातात घेऊन गुरूच्या शोधात हिमालयाचा फेरफटका करून आला तो योग्य मार्गदर्शक गुरू भेटला नाही म्हणून पुन्हा पारंपारिक जीवनात रुजू झाला.

तर मग युवा सुभाषचंद्राच्या मनात देश स्वातंत्र्याची ओढ होती की

संन्यस्त जीवनाची असा वाचकांना प्रश्न पडणे स्वाभाविक आहे.

त्याचे उत्तर असे आहे की संन्यास हे सुभाषचंद्रांनी अंतिम ध्येय निश्चित केले होते हे खरे पण तत्पूर्वी आपला जन्म परतंत्र देशात झाला असल्याने आपल्या देशबांधवांना पारतंत्र्यातून मुक्त करण्याचे कर्तव्य बजावून मग सर्वसंग परित्याग करून आत्मोन्नतीचा मार्ग पत्करायचा हा सुभाषचंद्राचा निर्णायक निर्धार होता. देशबांधवांच्या स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वी संन्यास घेतला तर आपण स्वतःचे आद्य कर्तव्य बजावले नाही याची रुखरुख मनाला लागून हेही नाही व तेही नाही अशी आपली अवस्था होईल असा विचार करून सुभाषचंद्रांनी देशस्वातंत्र्याची पायरी चढून मग आत्मोन्नतीस लागायचे असे ठरवले होते. पुढे सिंगापूर आदि अतिपूर्वेतील प्रदेशात त्यांनी आरंभलेल्या स्वातंत्र्यलढ्यातील सार्वजनिक भाषणातून सुभाषचंद्र वरील जोडध्येयांचा अनेक वेळा उल्लेख करीत.

तशा त्या जोड ध्येयांच्या प्राप्तीचा स्वतःचा निर्धार ढासळू नये म्हणून सुभाषचंद्र हे भगवद्‌गीतेचे आत्मीयतेने पठन करीत. कारण त्यात आप्तेष्टांच्या मरणास कारणीभूत होण्यापेक्षा आपण शस्त्रास्त्रे टाकून रण सोडून निघून जावे अशा विचाराने चित्त विचलित होणाऱ्या अर्जुनास शेवटी श्रीकृष्णाच्या उपदेशामुळे युद्धात मन लावून क्षात्रकर्तव्य बजावता आले. म्हणून स्वतःस अर्जुनाच्या भूमिकेत कल्पून सुभाषचंद्रांना श्रीकृष्णाचा उपदेश मोठा उपयुक्त व प्रेरक वाटे.

सुभाषचंद्रांच्या मनाची ती आध्यात्मिक व निगर्वी, निःस्वार्थी, केवळ कर्तव्यमग्न भूमिकेची वृत्ती होती. या दृष्टीने त्यांचे व्यक्तिमत्व अद्वितीय होते. तरी तत्कालीन भारतीय जनतेस ते कळण्यासारखे नव्हते. तत्कालीन जनतेस वाटायचे कीं जवाहरलाल नेहरू व सुभाषचंद्र यात वरिष्ठत्वाची चुरस असावी, कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाचा राजिनामा द्यावा लागल्याने महात्मा गांधींवर सुभाषचंद्रांचा रोष असावा इत्यादि. पण तसे काहीच नव्हते. इहलोकीच्या मानसन्मानाची तमा सुभाषचंद्रांना लेशभरही नसल्याने स्वातंत्र्यचळवळीतील जन काकणभर का होईना पण आपल्याच ध्येयात सहभागी आहेत असा त्यांच्याकडे पहाण्याचा सुभाषचंद्रांचा दृष्टिकोण होता. मात्र त्यात चळवळीतील धरसोड वृत्ती, शिथिलता, दिरंगाई व रेंगाळेपणा इ. दोष सुभाषचंद्रांना खुपत होते. तीव्र लढा उभा करावा ही त्यांच्या हृदयाची तळमळ होती.

म्हणून द्वितीय महायुद्ध सुरू झाल्यावर इंग्रजांच्या शत्रूंशी हात-मिळवण
करून आपण हिंदवी स्वातंत्र्य पदरात पाडून घेतलेच पाहिजे अशा निश्चयाने
घराबाहेर व देशाबाहेर पडले. ती तारीख होती १६ जानेवारी १९४१. एक
लाकडी चौकटीवर ठेवलेली एक भली मोठी भगवद्गीतेची आवृत्ती ते वाचीत
त्यात मूळ संस्कृत श्लोकांसह आंग्ल व बंगाली अनुवाद होते. घर सोडताना ज्
पृष्ठांवर भगवद्गीता उघडी होती ती तशीच त्यांची स्मृति म्हणून एल्गि
मार्गावरील त्यांच्या बंगल्यातील कक्षात उघडी जतन करून ठेवलेली आहे. तसे
खुंटीवरील कपडे व कक्षातील अन्य वस्तूही सुभाषचंद्र घर सोडून गेले तेव्हाच्
जशाच्या तशा ठेवल्या आहेत.

घर कायमचे सोडण्यापूर्वी काही दिवस सुभाषचंद्रांनी त्या प्रयाणाची गु
तयारी चालवली होती. घरातल्यांनीही कोणी त्यांना भेटायचे नाही अशी कड
ताकीद सर्वांना देण्यात आली. त्यांचे जेवणाचे ताट दारावर लावलेल्या पडद्याच्
खालून भोजन आणणाऱ्याने आत सरकवायचे व काही काळाने पडद्याबाहे
सरकवून ठेवलेले रिकामे ताट नेणाऱ्याने घेऊन जायचे अशी प्रथा पाडण्या
आली. त्या अवधीत सुभाषचंद्रांनी दाढी वाढवली व १६ जानेवारी रोज
घराबाहेर पडताना इस्लामी लाल टोपी परिधान केलेल्या पठाणाच्या वेषात
बाहेर पडले. त्या काळात ते स्थानबद्ध होते व बाहेर पोलिसांचा पहारा होता. त
वेष बदलल्याने सुभाषचंद्र बाहेर पडल्याचे पहारेकऱ्यांच्या लक्षातच आले नाह
बंगल्याच्या बाहेर पडल्यावर त्यांच्या पुतण्याने त्यांना दूरगावी बिहारमध
पोचवले व तेथून मार्ग काढीत मुक्या पठाणाचे सोंग करून ते अफगाणिस्ताना
पोचले. सप्टेंबर १ (१९३९) ला जर्मनीच्या सर्वसत्ताधारी हिटलरने इंग्रजांशी यु
पुकारले होते. म्हणून जर्मनीच्या संगनमताने हिंदुस्थानातील ब्रिटिशांचे राज
उपटून टाकता येईल का त्याचा मागोवा घेण्यास सुभाषचंद्र बोस जर्मनीत पोचल
युद्धमान परिस्थितीत आपल्याशी संगनमत करू इच्छिणाऱ्या व्यक्तीं
शत्रुराष्ट्रेही सहाय्य करतात. तसे सहाय्य सुभाषचंद्रांना मिळू
अफगाणिस्थानातील जर्मनीच्या राजदूताने सुभाषचंद्रांना जर्मनीत पोचविण्या
व्यवस्था केली होती.

जर्मनीतील भारतीय विद्यार्थी व कामधंदा करणारे विविध भारतीय यां
सुभाषचंद्रांचा कौतुकाने आदरसत्कार केला व पुढील बेतासंबंधी त्या सर्वां
खलबते सुरू झाली. वरपांगी आदर व आपुलकी दाखवून इंग्रजा

सुभाषचंद्रांच्या हालचाली गुप्तपणे कळवणारेही काही स्वार्थीजन होते. त्याला इलाज नसतो. तरी अजून शक्यतो इंग्रजांशी सशस्त्र लढा देऊन त्यांना जेरीस आणण्याची यंत्रणा सुभाषचंद्र बोस उभी करू न शकल्याने त्यांच्या जर्मनीतील उपस्थितीव्यतिरिक्त इंग्रजांना सुभाषचंद्रांविषयी कळवण्यासारखे काही नव्हते.

आफ्रिका, मेसोपोटेमिया आदि दूरदूरच्या प्रदेशात इंग्रजी सेनांशी झालेल्या जर्मनी व इटली यांच्या संयुक्त सेनांच्या झटापटीत इंग्रजांच्या बाजूने लढणारे भारतीय सैनिक सुमारे ४५०-५०० एवढेच जर्मनीत युद्धबंदी म्हणून आणले गेले होते. ते युद्धतंत्र शिकलेले हिंदुस्थानी सैनिक असल्याने त्यांचे पुढे सुभाषचंद्र बोसांची भाषणे, अधिकाऱ्यांशी वाटाघाटी इ. सुरू झाले होते. पण ती सैनिक संख्या फार तुटपुंजी होती. शिवाय जर्मनीची सैनिक यंत्रणा युरोप, आफ्रिका इ. तिकडच्या प्रदेशात इंग्रजांशी सामना करण्यात गुंतली असल्याने त्यांना सुभाषचंद्रांच्या योजनेकडे लक्ष देण्यास फुरसतच नव्हती. तेवढ्यात रशियाविरुद्धही जर्मनीने युद्ध सुरू केल्याने जर्मनीची परिस्थिती दिवसेंदिवस खचत चालली होती.

शिवाय हिटलरची वृत्ती सुभाषचंद्रांना तितकीशी अनुकूल नव्हती. जर्मन लोक हे युरोपातील व इंग्लंडमधील अन्य गोऱ्या जनतेहूनही स्वतःस श्रेष्ठ मानीत असल्याने आशिया खंडातील श्यामवर्णी हिंदुस्थानी जनतेस व सुभाषचंद्रां-सारख्या त्यांच्या नेत्यास तुच्छ लेखून वरवर गोड बोलून काही भरीव सहाय्य न देणे ही हिटलरी शासनाची वृत्ती असल्याने सुभाषचंद्रांचे जर्मनीतील वास्तव्य हे परतंत्र स्वदेशातून निघून युद्धमान आखाड्यात उतरून इंग्रजांच्या शत्रूंशी संगनमताचे पहिले पाऊल म्हणून उपयुक्त ठरले एवढेच.

अन् पुढे खरोखरच अशा काही घटना घडत गेल्या की स्वगृहातून गुप्तपणाने निःशस्त्र अवस्थेत निघालेल्या सुभाषचंद्रांना एक मोठी सेना उभारून इंग्रजांशी लढा देऊन काही काळ तरी हिंदुस्थानाच्या काही प्रदेशावर त्याकाळी स्वातंत्र्याचे प्रतिक असलेला तिरंगा ध्वज फडकवता आला. त्या त्यांच्या अंतिम, अद्वितीय कर्तृत्वाच्या काळात सुभाषचंद्रांचे जे सहकारी होते त्यात मीही एक होतो. म्हणून त्यांच्या त्या लढ्याचा इतिहास संगतवार कथन करणारा सुमारे ४५० पृष्ठांचा "हिंदुस्थानाचे दुसरे स्वातंत्र्ययुद्ध" शीर्षकाचा इतिहास व सुभाषचंद्र बोसांच्यासंबंधी काही आठवणी सांगणारे 'नेताजींचे सहवासात'

शीर्षकाचे माझे पुस्तक अशी दोन्ही १९४७ साली प्रकाशित झाली. ती, आता सुमारे पन्नास वर्षांच्या अवधीनंतर पुनर्प्रकाशित झाली.

सन १९३७ ते १९४० या तीन वर्षात मी एम्. ए. व LL. B. पदव्या मिळवून १९४० ते १९' मार्चपर्यंत फर्ग्युसन कॉलेज, पुणे येथे ट्यूटर (Tutor) होतो. त्या काळात सेनाभरती जोरात सुरू होती. "सैन्यात अवश्य शिरा अन् युद्धकलेचे शिक्षण आयते मिळतय् ते पदरात पाडून घ्या" असा स्वातंत्र्यवीर सावरकरांचा जोरात प्रचार चालू होता. एरवी कॉलेजच्या O.T.C. वा अन्य आंग्लप्रणीत संघटनातून चित्पावन ब्राह्मणांना घेऊ नये अशी सर्व वरिष्ठांना ब्रिटिश ताकीद होती. पण आता युद्धमान परिस्थितीत तो कटाक्ष शिथिल झाला.

मलाही लहानपणापासून घोड्यावर बसणे व सैनिकी शिक्षण ह्यांची फार आवड होती. म्हणून मी मार्च १९४१ मध्ये खडकीच्या लष्करी भांडारात अधिकारी हवेत ही जाहिरात वाचून तेथे गेलो तो त्यांनी माझी निवड व नेमणूक केली. अशा प्रकारे मी सेनाकार्यात रुजू झालो. सैनिकांना लागणारे जोडे, कपडेलत्तेपासून तो तोफा-बंदुकांचा हिशेब ठेवणे व विविध तुकड्यांकडून रीतसर मागणी आली की ते पुरवणे असे ते कार्य होते. त्यास Ordnance खाते म्हणतात. त्याची वरिष्ठतम कचेरी जबलपुरी होती. खडकीस त्या खात्यात जेमतेम आठ महिने काम केल्यावर लष्करी कामगिरीवर विदेशी धाडल्या जाणाऱ्यात माझे नाव होते. मात्र कोठे पाठवणार ते गुप्त ठेवले जाई. तरी थंड प्रदेशास लागू होणारा लष्करी कपडालत्ता दिला आहे की उन्हाळी प्रदेशात चालणारा पोशाख दिला आहे यावरून अटकळ बांधता येते.

लष्करी आज्ञेनुसार मी व माझे अन्य दोघे सहकारी असे मिळून आम्ही तिघे लष्करी कोठारी यांना मद्रासला जायला सांगण्यात आले. तेथून आम्ही नोव्हेंबर २३, १९४१ ला आगबोटीने निघालो. साऱ्या जहाजात विविध तुकड्यांचे, प्रदेशांचे आंग्ल साम्राज्यातलेच काही गोऱ्या, काही सावळ्या वर्णांचे सैनिक होते. नोव्हेंबर ३० ला आम्हाला सिंगापुरात उतरवण्यात आले. तो माझा पहिलाच सागरप्रवास माझ्या २४ व्या वर्षी झाला. पहिले दोनचार दिवस बोट लागली. उलट्या व्हायच्या. घेरी येत असल्यासारखे वाटायचे.

सिंगापूरहून आगगाडीने खाडीपार मलाया देशाची राजधानी जी कोलालंपूर तिच्या उत्तरेस एका गावात आम्हाला तिघा लष्करी कोठाऱ्यांना उतरवण्यात आले. 20 A.B.O.D. (Advance Bose Ordnance Depot)

म्हणजे आघाडीच्या २० क्रमांकाच्या लष्करी कोठारावर आम्हा तिघांची नेमणूक झाली होती. पण आम्ही एक सप्ताह सिंगापुरी असतानाच ८ डिसेंबर १९४१ रोजी रात्री अचानक सिंगापूरवर जपानी विमानांनी बॉंबहल्ला करूनच अतिपूर्वेकडील प्रदेशात युद्धाची नांदी वाजवली अन् मलायाच्या ईशान्येस कोटाबारू गावाजवळ एका ब्रिटिश लष्करी केंद्रावर हल्ला करण्याच्या हेतूने जपानी सेना उतरवली. असा प्रत्यक्ष हातघाईच्या युद्धासही डिसेंबर ८ (१९४१) लाच आरंभ झाला. सन १९४१ डिसेंबर दि. १२ रोजी जपान्यांच्या हाती ब्रिटिशांच्या भारतीय सैनिकांच्या तुकड्यातील जे १५-२० जण प्रथम हाती लागले त्यात कॅप्टन मोहनसिंह हे वरिष्ठतम अधिकारी होते. जपानी सेनाधिकाऱ्यांनी मोहनसिंहांचे मन वळवून त्यांना सांगितले की त्यांनी पुढाकार घेऊन उच्चध्वनिक्षेपाने वारंवार घोषणा करीत पलिकडील हिंदवी सैनिकांना सांगावे की त्यांनी "इंग्रजी साम्राज्य रक्षणासाठी प्राण विनाकारण न गमावता जपानी सेनेची सरशी होऊ द्यावी. पुढे हिंदुस्थानातून आंग्ल सत्ता उपटून टाकायला जपानी सेना आपल्याला सहाय्य करील."

अशा प्रकारे हिंदवी स्वातंत्र्यसेना उर्फ आझाद हिंद फौजेची सुरुवात झाली. अन् अवघ्या सव्वादोन महिन्यात म्हणजे फेब्रुवारी १५ (सन १९४२) पर्यंत अतिपूर्वेकडील सारा पॅसिफिक सागराभोवतालचा प्रदेश जपान्यांनी जिंकून घेतला. त्यात डच सत्तेखाली असणारा जाव्हा सुमात्रा आदि इंडोनेशियन् प्रदेश, फिलिपीन्स हा अमेरिकी सत्तेचा टापू, व्हिएटनाम, लव, कांबोडिया आदि फ्रेंच साम्राज्यातील प्रदेश व सयाम, ब्रह्मदेश आदि देश जपानी अंमलाखाली आले. सयाम नाममात्र स्वतंत्र होता. पण जपानी सेना सयाममध्येही स्व-तंत्राने वागत होती.

फेब्रुवारी १५ (१९४२) ला सिंगापुरात ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांनी शरणागती पत्करली तेव्हा सुमारे साठ सहस्त्र हिंदवी सैनिक व ३३००० ब्रिटिश, ऑस्ट्रेलियन, अमेरिकन इ. गोरे सैनिक यांनी शस्त्रास्त्रे टाकली. त्या साऱ्या गोऱ्या सैनिकांना तर जपान्यांनी सिंगापुरातील उंचकोटाच्या चांघी कारागृहातच नेले. मात्र हिंदवी सैनिक तुकड्यांना फॅरर पार्क नावाच्या मैदानात रांगेत बसवण्यात येऊन तेथे त्या मैदानाच्या एका सीमेवार जी क्रीडाकेंद्राची इमारत होती तीत वरच्या मजल्यावर जो लांबलचक छज्जा होता त्यात आंग्ल सेनापती, जपानी सेनापती व कॅप्टन मोहनसिंग ह्यांची ध्वनिक्षेपकाद्वारे भाषणे झाली.

आंग्ल सेनापतीने मैदानात रांगेने बसलेल्या हिंदवी तुकड्यांना सांगितले की "तुम्हाला सर्वांना आम्ही युद्धबंदी म्हणून जपान्यांच्या स्वाधीन करीत आहोत."

जपानी सेनापतीने सांगितले की "साऱ्या हिंदवी तुकड्यांनी त्यांच्या त्यांच्या पूर्वीच्या छावण्यातून रहावे."

कॅप्टन मोहनसिंह यांनी सर्वांना उद्देशून सांगितले की "जपानी लोक या युद्धात हिंदुस्थानातूनही आंग्लसत्ता हुसकून लावून भारतास स्वतंत्र करणार असल्याने यापुढे आपण इंग्रजांविरुद्ध जपानी सेनेस सहाय्य करावे."

अशा परिस्थितीत बऱ्याच भारतीय सैनिकांची द्विधा मनःस्थिती होती. त्यांना वाटायचे की ब्रिटिशांचे बलाढ्य साम्राज्य आहे. अंतिम सरशी जर त्यांचीच झाली तर आपणा सर्वांस फाशी जावे लागेल. अन् समजा जपान्यांच्या सहाय्याने भारत स्वतंत्र झालाच तर आपणास नागरिकत्वाचे सारे लाभ मिळतीलच. म्हणून जपान्यांशी हातमिळवणी न करता युद्धबंदी म्हणून राहण्यातच आपला अंतिम लाभ आहे.

एकूण सुमारे २०,००० भारतीय सैनिकच आझाद हिंद फौज उभारून जपान्यांच्या सहाय्याने हिंदवी स्वातंत्र्य लढ्यात भाग घेण्यास तयार झाले.

पुढे कॅप्टन मोहनसिंहासही जपान्यांच्या वचनाची शाश्वती न वाटून त्यांनीही जपान्यांशी सहकार्य करण्यास नकार दिला म्हणून जपान्यांनी मोहनसिंहांस वेगळे काढून स्थानबद्ध केले.

मग जपान्यांनी अन्य हिंदवी सैनिकांची एक समिती स्थापून त्यांच्याद्वारे आंग्लविरोधी प्रचार व सेनासंघटन इ. कार्य चालू ठेवले. मी प्रथमपासूनच ह्या स्वातंत्र्य लढ्यास अनुकूल होतो. शिक्षणाच्या दृष्टीने एम्. ए. एल्. एल्. बी. अशा उच्च पदव्या घेतलेले बहुधा त्या साऱ्या साठसहस्र युद्धबंद्यात माझ्या व्यतिरिक्त एक दोघेच असले तर असतील.

मी मात्र जपानी सहाय्याच्या या संधीने आनंदून शरण आलेल्या अनुकूल अशा भारतीय वरिष्ठ अधिकाऱ्यांची जी संघटन समिती जपान्यांनी नेमली होती तिला मी माझ्या छावणीतून पत्रद्वारे विविध सूचना धाडू लागलो. उदा. "मेजर हुद्याच्या लष्करी अधिकाऱ्याचे खांद्यावरील पितळेचे चिन्ह ब्रिटिश राजमुकुटाचे होते. ते बदलून तेथे ॐ किंवा धनुष्यबाण अथवा ढालतलवार आदि नवीन चिन्हे वापरल्यास भारतीयांच्या मनातील आंग्लदास्यता इ. निवळण्यास मदत होईल." अशा प्रकारे नवव्यवस्थेस पोषक अशी माझी पत्रे जेव्हा स्वातंत्र्यसेनासंघटक

केंद्रीय समितीस जाऊ लागली तेव्हा माझे नाव त्यांचेपुढे आले.

त्याचवेळेस हिंदवी स्वातंत्र्याच्या प्रचारार्थ जपानच्या ताब्यात आलेल्या विस्तीर्ण प्रदेशातील टोकिया, सायगाव, सिंगापूर, रंगून, बँकॉक व जाकार्ता उर्फ जयकर्ता अशी सहा नभोवाणी केंद्रे उपलब्ध झाली. त्यात मला व्हिएटनाम (इंडोचायना) प्रदेशातील मुंबईसारख्या सागरकाठच्या सायगाव शहरी धाडण्यात आहे. तेथे मी व माझ्या आधी तेथे नेमलेल्या अन्य चारपाच जण मिळून इंग्रजी, हिंदी, उर्दू इ. भाषांतून हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेखाली असलेल्या हिंदवी जनतेस उद्देशून रात्री ८ ते १० वा ९ ते ११ स्वातंत्र्य प्रचार आरंभ केला. दिवसभर इंग्रजांचा प्रचार व युद्धाच्या वार्ता इ. विविध नभोवाणी केंद्रातून प्रसारित होणारे कार्यक्रम आम्ही ऐकायचो व त्यास प्रत्युत्तर देणारी भाषणे व आमच्या सेनांची आगेकूच संबंधीच्या वार्ता प्रसारित करण्याचे आमचे मुख्य कार्य असे. शिवाय इंग्रजांच्या शरणागतीपूर्वी कोणकोण भारतीय दगावले व कोणकोण जीवित आहेत तेही भारतातील जनतेस कळावे म्हणून आम्ही ८-१० सैनिकांची नावेही सांगत असू. त्या प्रचार कार्यावर मी बरोबर एक वर्ष (जून १९४२ ते जून १९४३) होतो.

तिकडे सिंगापुरात कॅप्टन मोहनसिंहांना जपान्यांच्या अंतिम उद्देशाची खात्री वाटेना. इंग्रजांना हुसकल्यावर जपानी अंमलाखाली हिंदुस्थान आला तर आपलेच देशबांधव आपली छी थू करतील किंवा ब्रिटिशांचा जय झाला तर जपानशी संगनमत करून देशद्रोह, राजद्रोह आदि आरोपांखाली आपल्याला फाशी जावे लागेल, अशा द्विधा, विमनस्क मनःस्थितीत हिंदवी युद्धबंदींना जपानशी सहकार्य करायला सांगणाऱ्या कॅप्टन मोहनसिंहांनी स्वतः स्वातंत्र्य पक्षाच्या हिंदवी युद्धबंद्यांचे नेतृत्व सोडल्यावर जपानी लष्करी अधिकाऱ्यांनी मोहनसिंहाना स्थानबद्ध करून जाव्हा बेटावर नेले.

आता स्वातंत्र्यास अनुकूल युद्धबंद्यांचे नेतृत्व कोण करील अशा विचाराने सिंगापुरातील जपानी अधिकाऱ्यांनी युद्धबंद्यातील विविध वरिष्ठ अधिकाऱ्यांशी वाटाघाटी सुरू केल्या. त्यात सावंतवाडीचे जगन्नाथ कृष्ण भोसले हे त्यांच्या आंग्लप्रणीत हुद्यानुसार सर्वात वरिष्ठ होते. त्या काळी भारतीयांस लेफ्टनंट कर्नल पदापर्यंतच बढती मिळे. त्या पदाचा भारतीय अधिकारी अतिपूर्वेत धाडलेल्या सेनेत कोणी नव्हता. कर्नल पासून फील्डमार्शल पर्यंतची पदे अस्सल गोऱ्या आंग्ल व्यक्तींनाच मिळत. जगन्नाथराव भोसल्यांचे नशीबही असे की

शरणागतीच्या जेमतेम पाचसात दिवस आधी त्यांना लेफ्टनंट कर्नल हुद्याची बढती दिल्याचे सरकारी पत्र येऊन पोचले असल्याने ते सर्वश्रेष्ठ अधिकारी ठरले. त्यांना जपानी अधिकाऱ्यांनी विचारले की "मोहनसिंह आता राजी नाहीत तेव्हा तुम्ही नेतृत्व कराल का? इकडे बर्लिनहून सुभाषचंद्र बोसांना आम्ही सिंगापुरात येऊन स्वातंत्र्यलढ्यात सामिल होऊ इच्छिणाऱ्या भारतीय युद्धबंद्यांचे नेतृत्व करण्यास पाचारण करीत आहोत. ते आले की स्वातंत्र्यचळवळीची धुरा ते उचलतील. तोवर तुम्ही स्वातंत्र्योत्सुक भारतीय सेनेचे प्रमुखपद स्वीकारावे." भोसल्यांनी ते मान्य केल्याने सुमारे वीस सहस्त्र अनुकूल हिंदवी युद्धबंद्यांचे खडे सैन्य एकसंध राहिले.

जर्मनीमध्ये नेमलेल्या जपानी राजदूताने सुभाषचंद्र बोसांशी संपर्क करून कळवले की "सिंगापुरात सुमारे ६० सहस्त्र हिंदवी युद्धबंदी असल्याने ते अनुकूल झाले तर तुम्हाला त्या तयार सेनेनिशी आमच्या सहकार्याने हिंदुस्थान स्वतंत्र करता येईल." उत्कट इच्छा असली तर दैव कसे साथ देते त्याचे हे उत्तम उदाहरण होते.

सुभाषचंद्रांना अशी संधी हवीच होती. म्हणून ते रोमनगरी पोचून पाणबुडीने गुप्त प्रवास करीत सिंगापुरी जून १९४३ मध्ये येऊन पोचले. जर्मनीत असलेले पाचसहा सुशिक्षित भारतीय तरुण त्यांचेसह होते.

सिंगापुराहून जपानी विमानाने सुभाषचंद्र बोस तडक टोकियोस पोचले. तेथील पंतप्रधान हिडेकी टोजो यांचेशी सुभाषचंद्रांनी वाटाघाटी केल्या त्या अशा की, "आम्ही स्वतंत्र भारत सरकार स्थापन करू. आमची सेना व जपानी सेना संयुक्तपणे हिंदुस्थानाच्या सीमेकडे कूच करून तेथील ब्रिटिशसत्तेपासून हिंदुस्थान स्वतंत्र करू. हिंदुस्थानच्या सीमेपर्यंत जपानी व हिंदवी सेना एकत्र मोहीम चालवित असता जपानी व हिंदवी अधिकारी एकाच समान स्तराचे असले तरी हिंदुस्थानाच्या सीमेपर्यंत जपानी सेनाधिकाऱ्यांची आज्ञा प्रमाण मानली जाईल. पण हिंदुस्थानाच्या भूमीत दोन्ही सेना शिरल्यावर हिंदवी अधिकाऱ्यांची आज्ञा प्रमाण मानली जाईल. तसेच हिंदुस्थानात शिरताच तिरंगी ध्वजाखाली सारी मोहीम चालवली जाईल. तोवर प्रत्येक छावणीत दोघांचे ध्वज समान उंचीवर फडकतील."

वरील प्रकारचा करार करण्यात सुभाषचंद्रांची दोन उद्दिष्टे होती. एक हे की इंग्रजांच्या विरुद्ध चालवली जाणारी मोहीम ही कोणीही केव्हाही कसाही दबा

धरून इंग्रजांना मारावे अशा अंदाधुंद अतिरेकी पद्धतीची न होता ती रीतसर सरकारी नीतिनियमानुसार व्हावी. दुसरे उद्दिष्ट हे होते की, हिंदुस्थानाच्या सीमेच्या आत आपला अधिकार नाही ह्याची जाणीव जपानी सेनाधिकाऱ्यांना रहावी. वरील प्रकारचा करार करण्यात विविध देशांच्या स्वातंत्र्य लढ्यातून सुभाषचंद्रांनी कसे काटेकोर निष्कर्ष त्यांच्या स्वतःच्या मनात ठरवले व ठसवले होते हे दिसते. सन १८५७ चा ब्रिटिश सत्तेविरुद्धचा सार्वत्रिक उठाव कोलमडल्याचे एक प्रमुख कारण हे होते की तो कोण्या एका केंद्रीय निर्देशानुसार चालवला गेला नाही.

जपान्यांनी ८ डिसेंबर १९४१ रोजी जेव्हा इंग्रजांविरुद्ध युद्ध पुकारले तेव्हा त्या लढ्यात आपणास कोणाकोणाचे सहाय्य होऊ शकेल ह्याचा त्यांनी आढावा घेतला. त्यात हिंदुस्थानातील कॉंग्रेसच्या विद्यमाने चाललेल्या स्वातंत्र्यचळवळीची कल्पना त्यांना होतीच. म्हणून अतिपूर्वेतील विविध देशात स्थायिक असलेल्या भारतीयांना संघटित करण्याचे त्यांनी ठरवले. त्या उद्देशाने जपानी शासनाने त्यांच्या अंमलाखाली आलेल्या विस्तीर्ण प्रदेशात (म्हणजे सुमात्रा, जाव्हा, ब्रह्मदेश, मलाया, फिलिपीन्स, बोर्निओ, सयाम, कांबोडिया, लाओस, व्हिएटनाम, जपान इ. देशात) स्थानिक भारतीयांतील प्रतिष्ठित, लोकप्रिय व्यक्तींच्या अध्यक्षतेखाली Indian Independence League म्हणजे स्वतंत्र भारत संघटनेच्या शाखा स्थापन केल्या होत्या. त्या सर्वांचे अध्यक्ष जपानमध्ये सन १९१६-१७ च्या सुमारास स्थायिक झालेले एक वयस्कर देशभक्त रासबिहारी बोस नियुक्त झाले. सन १९१६ मध्ये रासबिहारींनी दिल्लीतील चांदणीचौकातून हत्तीवर डुलत डुलत भव्य मिरवणुकीत सामिल असलेल्या आंग्ल व्हाइसरॉय (राज्यप्रतिनिधी) लॉर्ड हार्डिंजच्या दिशेने एक हातगोळा भिरकावला. हार्डिंज बचावला पण ब्रिटिश सत्ता धास्तावली. चांदणी चौकाच्या उभय बाजूच्या बहुमजली घरांच्या खिडक्यातून व गच्चीवरून लोक दाटीवाटीने ती मिरवणूक पाहण्यात दंग असता हातगोळ्याच्या स्फोटाने सर्वत्र पळापळ सुरू झाली. त्या गोंधळात रासबिहारी बोस निसटले व पुढे कलकत्ता मार्गे बोटीने जपानला जाऊन पोचले. त्या काळी जपानवर सुद्धा ब्रिटिश दरारा असे. म्हणून बॉंबच्या कटात रासबिहारी असावेत असा सुगावा लागून "त्यांना आमच्या स्वाधीन करा" असा ब्रिटिशांनी लकडा लावला. पण "हो नाही, हो नाही" करता करता रासबिहारींचा विवाह एका जपानी महिलेशी जमवण्यात

आला. अन् मग मात्र "आता ते आमचेच नागरिक आहेत." अशा सबबीवर त्यांची इंग्रजांच्या कचाट्यातून व लकडीतून सुटका झाली. एक वरिष्ठ देशभक्त म्हणून ते त्या विस्तीर्ण प्रदेशातील हिंदवी नागरी स्वातंत्र्य संघटनेचे औपचारिक प्रमुख झाले.

पुढे ऑक्टोबर (१९४३) मध्ये सिंगापुरातील कॅथे सभागृहात भरलेल्या हिंदवी जनतेच्या सभेत रासबिहारींनी त्यांच्या गळ्यात घातलेला हार सुभाषचंद्रांच्या गळ्यात घालून "आता ह्यापुढे हेच नव्या दमाचे देशभक्त तुमचे नेतृत्व करतील." असे सांगत निवृत्ती पत्करली.

ऑक्टोबर २१ (१९४३) ला त्याच सभागृहात भरलेल्या विशाल सभेत जपानी व त्यांच्या मित्रराष्ट्रांच्या राजप्रतिनिधींच्या उपस्थितीत सुभाषचंद्रांनी आझाद हिंद सरकार स्थापन केल्याची घोषणा केली. विविध पाच सात मंत्री नियुक्त केले. जगन्नाथराव भोसले हिंदवी स्वातंत्र्य सेनेचे प्रमुख केले गेले. सुभाषचंद्र बोसांकडे नागरी संघटनेचे अध्यक्षत्व, स्वतंत्र भारताचे राष्ट्रपतीपद, प्रधानमंत्रीपद, परराष्ट्रमंत्री, युद्धमंत्री व सरसेनापतीपद असे सहा हुद्दे होते.

ह्या साऱ्या नवनियुक्त व्यक्तींचा रीतसर शपथविधी झाला व त्याच रात्री सुभाषचंद्रांनी सिंगापूर नभोवाणीवरून स्वतंत्र भारत सरकारने ब्रिटिश सरकार व त्यांचे अन्य सहाय्यकारी देश यांचेविरुद्ध युद्ध सुरू केल्याची घोषणा केली.

स्वतंत्र भारत सरकार स्थापन झाल्यावर जपान, जर्मनी, इटली, आयर्लंड आदि एकूण नऊ देशांनी त्यास मान्यता दिली. या साऱ्या संघर्ष मोहिमेचे नेते म्हणून सुभाषचंद्रांना नेताजी हे सार्वजनिक प्रेम व आदराचे संक्षिप्त उपपद चिकटले. जपानी अधिकारी सुभाषचंद्रांचा उल्लेख 'चंद्रबोस कक्का' असा करीत. 'कक्का' हे 'साहेब, महाशय, His Excellency' अशा अर्थाने जपानी भाषेत वापरतात.

दुसरे दिवशी म्हणजे २२ ऑक्टोबर १९४३ रोजी स्त्रियांच्या राणी झांशी रेजिमेंटची स्थापना झाली. कारण आगामी लढ्यात स्त्रियांनीही भाग घेतला पाहिजे अशी नेताजींची इच्छा होती. सिंगापुरातच स्थायिक असलेल्या डॉक्टर लक्ष्मी त्या महिला-तुकडीच्या प्रमुख नेमल्या गेल्या तर सत्यवती थेवर नावाच्या तेलगु महिला दुय्यम प्रमुख होत्या.

जून १९४२ ते जून १९४३ मी सायगॉन नगरी दूरदेशी, दूरगावी नभोवाणी प्रचारकार्य करीत असता मला निरोप आला की माझी नेमणूक सिंगापूरनगरी

छात्रसैनिकी वेशातील सुभाष

बोस परिवार मागच्या रांगेतील उजवीकडील पहिले बाल सुभाष

कलकत्त्यातील एका कलाप्रदर्शनाच्या उद्‌घाटनानंतर

गुरुदेव रविन्द्रनाथ ठाकुरांसमवेत 'महानायक' १९३९

मध्यप्रांत वऱ्हाडचे तत्कालीन पंतप्रधान डॉ. ना. भा. खरे यांचेसोबत कलकत्ता येथे (१९३८)

पं. जवाहरलाल नेहरू आणि आचार्य कृपलानीं सोबत (१९३८)

सरहद्द गांधीं समवेत सुभाषबाबू

चाहत्यांच्या गर्दीत

अन्य एका पदावर व्हायची असल्याने मी सिंगापुरास परतावे.

कॅप्टन मोहनसिंहांनी ह्या चळवळीतून अंग काढून घेतल्यावर जपान्यांनी स्वातंत्र्यप्रेमी अशा तीन सहस्त्र हिंदवी युद्धबंद्यांना सांधून ठेवण्याची भिस्त जगन्नाथराव भोसल्यांवर टाकली होती. सुभाषचंद्र बोस हे जर्मनीतून परतून टोकियोतील जपानी पंतप्रधान हिडेकी टोजो यांचेशी वाटाघाटी करून जेव्हा सिंगापुरी परतले तेव्हा त्यांनी ह्यापुढे हिंदुस्थानातून आंग्ल सत्तेस हुसकण्यास रीतसर स्वतंत्र भारत सरकार स्थापून नंतर प्रत्यक्ष युद्धसंचलन होणार असल्याने स्वातंत्र्य सेनेची धुरा भोसल्यांनी सांभाळावी असे सुचवले. त्यानुसार भोसले हे स्वातंत्र्यसेनेचे प्रमुख व्हायचे ठरले. म्हणून ते लेफ्टनंट A.D.C. व Private Secretary म्हणजे सेनाकार्य सहाय्यक व चिटणीस म्हणून कोणास नेमावे अशा तपासात असताना मी तरुण M.A., LL.B. असे उच्च शिक्षण घेतलेला महाराष्ट्रीय आहे असे त्यांना कळल्यावर त्यांनी मला सिंगापुरास बोलावून घेतले. म्हणून जून १९४३ ते १५ ऑगस्ट १९४५ रोजी जपानची शरणागती होऊन युद्ध संपेपर्यंत मी त्या पदावर असता नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्याशी माझा सव्वादोन वर्षे ह्या ना त्या कारणाने सतत संपर्क येत असे.

एकदा मी राणी लक्ष्मी रेजिमेंटच्या उपप्रमुख सत्यवती थेवर ह्यांना विचारले की, " तुमच्या महिला तुकडीला झाशीची राणी लक्ष्मीचे नाव दिले आहे खरे. पण ती कोण होती, तिचे वैशिष्ट्य काय हे तुम्हाला माहित आहे का ? " कारण त्या तुकडीतील महिला बव्हंशी वर्षोनवर्षे विदेशी राहिलेल्या दाक्षिणात्य तामिळ, मल्याळी, तेलगु इ. स्त्रिया होत्या. त्यावर त्या म्हणाल्या की, " आम्हाला तर त्यांच्या जीवनकार्याविषयी काहीच माहिती नाही. "

ते ऐकल्यावर झाशीची राणी लक्ष्मीबाईचे चरित्र त्यांना व्याख्यानातून सांगण्यापेक्षा लक्ष्मीबाईंच्या जीवनावर एक नाटिकाच लिहावी असा विचार करून मी एक नाटिका हिंदीत चार पाच दिवसात वेळ मिळेल तशी लिहून काढली. अन् ती इंग्रजी लिपीत मुद्रित करवून घेतली. कारण काही मुलींना देवनागरी येत नव्हती. एका कच्छी मुसलमान शिंप्याकडून विविधपात्रांना घालावयाचे दरबारी अंगरखे, पायजमे, शिंदेशाही पगडी इ. करवून मग निवडक कन्यांकडून अभिनयाच्या तालमी करवून घेतल्या. अशा प्रकारे तयारी झाल्यावर त्या नाटकाचे प्रयोग सिंगापुरातील एका नाट्यगृहात झाले. नेताजी सुभाषचंद्र एका प्रयोगास उपस्थित होते. तो प्रयोग पाहून ते म्हणाले, " अतिपूर्वेकडील ज्या

ज्या देशात भारतीय जन बहुसंख्य असतील तेथे या नाटकाचे प्रयोग करू म्हणजे जनतेस सध्याच्या युद्धमान परिस्थितीत वीरश्री व त्याग यांची स्फूर्ति मिळून जागृती होईल.'' प्रत्यक्षात तसे काही घडले नाही. कारण मग जी मोहीम सुरू झाली त्यात बहुतेक सर्वांनाच मोहिमेच्या दिशेने प्रयाण करावे लागले. मात्र सिंगापुरातील प्रयोगांनी जे हजारो डॉलर धन जमा झाले ते मी नेताजींच्या युद्धनिधीस दिले.

मोहिमेसंबंधीची अशी लष्करी संघटना उभी केल्यावर भारताच्या सरहद्दीचा काही भूभाग तरी मुक्त करून आपण केव्हा एकदा त्या स्वतंत्र भूमीवर पाय ठेवू अशी घाई सुभाषचंद्रांना झाली होती. डिसेंबर ३१ ची रात्र संपून १ जानेवारी १९४४ रोजी नववर्षारंभ होण्यास नोव्हेंबर डिसेंबर असा दोन महिन्यांचा अवधी होता. पण आमची सारी भिस्त जपान्यांवर. त्यांचे रणगाडे, ट्रक्स, त्यांचे बरेचसे सैनिक, आघाडीवर बॉंब टाकून शत्रूंच्या ठाण्याचौक्यांची दाणादाण उडविणारी विमाने इत्यादि विना मलाया, सयाम, ब्रह्मदेश आदींचा दोनतीन हजार मैलाचा टापू पार करून टम्मू, पलेल, इंफाल येथील आंग्ल सैनिक केंद्रांवर आमचे सुमारे ३० ते ५० हजार सैनिक कितीसे पुरणार! कारण संख्या एवढी दिसली तरी ती दोनतीन हजार मैलांच्या टापूत विविध रसद केंद्रांवर विभागलेली असते. शिवाय त्या संख्येत स्वयंपाकी, डॉक्टर, परिचारक, मोटारी चालवणारे, रसद पोचवणारे इ. अनेक प्रकारचे सेवक संमिलित असतात.

सुभाषचंद्र बोस जर्मनीहून सिंगापुरास जून १९४३ मध्ये येऊन पोचले तेव्हा युद्धबंद्यातील स्वातंत्र्ययुद्धात भाग घेऊ इच्छिणारे सुमारे २० सहस्त्र युद्धबंदी होते. काही जणांनी मोहनसिंह सोडून गेले म्हणून स्वातंत्र्यचळवळीतून स्वतःचे अंग काढून घेतले. सुभाषचंद्र बोस नेतृत्व करणार म्हणून काही जण युद्धबंदी छावणी सोडून स्वातंत्र्यसेनेत सामील झाले. अशी प्रसंगोपात स्वातंत्र्यसेनेची भरती-ओहोटी सतत चालू होती.

विविध युद्धबंदी छावण्यातून सुभाषचंद्रांची भाषणे आयोजित करण्यात आली होती. त्यांचा तो आवेश व देशभक्तीची तीव्र तळमळ पाहून सुमारे १० हजार युद्धबंदी स्वातंत्र्यसेनेत सामिल झाले. अशा प्रकारे ६०,००० भारतीय युद्धबंद्यातून सुमारे ३३००० स्वातंत्र्य सेनेत सामिल झाले होते. बरेच जण दोन्ही दरड्यांवर हात असावा अशा बुद्धीने शेवटपर्यंत सामिल झाले नाहीत. त्यांना वाटायचे की सुभाषचंद्रांची चळवळ यशस्वी झाली तरी भारतीय म्हणून आपण

स्वतंत्र देशाचे नागरिक म्हणवून घेऊच व ब्रिटिशांचा विजय झाला तर इंग्रजद्रोह न केल्याबद्दल आपणास शाबासकी, बढती इ. पदरात पाडून घेता येतीलच. अशा वृत्तीच्या हजारो युद्धबंद्यांच्या समोर भाषण देताना सुभाषचंद्र कधीकधी त्यांना सात्विक संतापाने म्हणायचे की, "तुम्ही जर या स्वातंत्र्यलढ्यात सामील झाला नाहीत तर, स्वतंत्र भारतात आम्ही तुम्हाला ठेवून घेणार नाही. अगदी दयाळुपणे तुमच्याशी वागण्याचे जरी आम्ही ठरवले तरी फारतर आम्ही तुम्हाला बोटीने इंग्लंडला जाण्याचे तिकिट फुकट देऊ."

वरील युद्धबंद्यातील सैनिकांव्यतिरिक्त अतिपूर्वेकडील विस्तीर्ण प्रदेशात स्थायिक असलेल्या भारतीयांच्या तरुण, तरुणींना स्वातंत्र्य सेनेच्या विविध तुकड्यांतून भरती करवून त्यांना सैनिकी शिक्षण देण्याची केंद्रे सुरू करण्यात आली होती. अशा प्रकारे सुभाषचंद्रांची एकूण सेना सुमारे पन्नास हजार होती.

सुभाषचंद्रांच्या तळमळीनुसार ३१ डिसेंबर १९४३ पर्यंत भारतातील काही भूभाग तरी आपल्या ताब्यात यावा ही सुभाषचंद्रांची आकांक्षा पूर्ण होऊ शकली नाही. याचे कारण जपानच्या जेमतेम आठ कोटी लोकसंख्येच्या देशाची सारी सैनिक शक्ती गेल्या दोन वर्षात अतिपूर्वेकडील विस्तीर्ण प्रदेशात विभागली गेल्याने त्यांनाही दूरवरच्या भारतातील आंग्ल यंत्रणेवर हल्ला करण्याइतके सैनिकदल व रणसाहित्य कमी पडू लागले.

पण दुसऱ्या एका दृष्टीने सुभाषचंद्रांची तळमळ दैवाने पूर्ण केली. ती अशी की जपान्यांनी अंदमान व निकोबार ही बेटे जिंकून ती नेताजींच्या स्वतंत्रभारत सरकारच्या ताब्यात दिली होती. तेथे तिरंगाध्वज फडकवला जाऊन डॉक्टर लोकनाथन हे स्वतंत्र भारत सरकारचे प्रतिनिधी म्हणून तेथे राहू लागले. सुभाषचंद्र बोस स्वतःही तेथे ३१ डिसेंबर (१९४३) ला होते. सागरपार असलेल्या भरतभूमीकडे ते टक लावून विमनस्क अवस्थेत 'मायदेशा प्राण तळमळला' अशा भावनेने पहात असलेला त्यांचा त्यावेळचा एक फोटोही घेतलेला आहे.

सन १९४४ चा जुलैपर्यंतचा काळ सरहद्दीपर्यंत चौक्या पहारे इ. बसवण्यातच गेला अन् मग पाऊस सुरू झाला. त्या भागात पाऊस फार असल्याने पावसाळ्यात मोहीत स्थगित ठेवावी लागली.

पावसाळ्यानंतर मात्र मोहीम सुरू होऊन आंग्ल सेनेच्या चंद्रकोरीच्या आकाराच्या १०००-१५०० मैलांच्या टापूतील आघाडीच्या केंद्रांवर जपानी

विमानांचे हल्ले व त्यांच्या आणि स्वातंत्र्य सेनेच्या तुकड्यांचे हल्ले सुरू झाले अन् सन १९४४ च्या अंताच्या सुमाराला आसामच्या सरहद्दीवरील काही भूभाग हिंदवी स्वातंत्र्यसेना व जपानी सेनांच्या ताब्यात आला. त्या हल्ल्यांमुळे इंग्रजांची पीछेहाट झाली. त्यांच्या आघाडीच्या केंद्रांतील सैनिक गाशा गुंडाळून इंफालकडे परतून गेले. इंफाल शहरात व भोवती इंग्रजी सत्तेचा खूपच मोठा तळ होता. तेथे सैन्यही भरपूर होते व युद्धसाहित्यही बरेच साठवलेले होते. त्या भल्यामोठ्या केंद्रास सगळीकडून वेढून त्यांच्या परतीचा मार्ग अडवून साऱ्या बाजूंनी नाकेबंदी करून आंग्लसेनेस युद्ध साहित्यासहित शरण येण्यास भाग पाडायचे असे जपानी व हिंदवी सेनेने ठरवले. भोवताली भिन्न केंद्रांवर पंधरा पंधरा वीस वीस मैलांवर विविध टेकड्यांवर स्वातंत्र्यसेनेचा तिरंगी ध्वज फडकताना पाहून इंफालमधील भारतीय नागरिक व बहुसंख्य ह्यांना मनातून आनंद होत होता.

सुभाषचंद्रांचा एक शेरा असा होता की "स्वातंत्र्यसेना भारताच्या वस्तीच्या भागात जसजशी प्रवेश करील तसतसे स्थानिक नागरिक व आंग्ल साम्राज्यसेनेतील हिंदवी सैनिक हेच स्वतः होऊन एवढा मोठा उठाव करतील की भारतातील आंग्ल सत्तेस एकदम खग्रास ग्रहण लागेल."

दुर्दैव असे की सुभाषचंद्रांची ती अटकळ शंभर टक्के अचूक असूनही खरी ठरली नाही. कारण भारतातील मोठ्या लष्करी तळाच्या किंवा भरपूर वस्तीच्या ठिकाणापर्यंत पोचण्यापूर्वीच जपानची लष्करी शक्ती क्षीण होत होत थंडावली. कारण तिकडे अमेरिकेचा जोर वाढू लागला. अमेरिकेच्या पश्चिमेकडील नाविक केंद्रातून अमेरिकेचे सागरी दल एक एक टापू काबीज करीत करीत जपानच्या दिशेने पुढे पुढे सरकत होते. जपानचे सैन्यदल भल्यामोठ्या प्रदेशावर विखुरले गेल्याने त्यांची शक्ती क्षीण होऊ लागली. कुमक, रसद इ. येणे बंद झाल्याने त्यांना लांबवर पसरलेल्या त्यांची विविध केंद्रे, चौक्या, पहारे इत्यादींवरील सैनिक मायभूमीच्या रक्षणासाठी परत बोलावून घ्यावे लागले. त्यामुळे इंफालमधील ब्रिटिश केंद्राला १५-१५, २०-२० मैलांवर वेढून बसलेल्या हिंदवी स्वातंत्र्यसेनेला कुमक वा रसद येणे बंद झाले. आंग्ल साम्राज्य सेनेच्या गोळीबाराच्या विरुद्ध स्वातंत्र्यसेनेच्या प्रत्युत्तरी फैरी डागणे बंद झाले व सन १९४५ च्या प्रारंभीच माघार घेणे सुरू झाले.

नेताजी, जगन्नाथराव भोसले व आम्ही त्यांचे सहकारी मिळून सुमारे ४०० जण सेनेच्या मागोमाग ब्रह्मदेशाची राजधानी रंगून नगरी पोचलो होतो.

आघाडीवरील सेना माघारी येत असल्याचे ऐकून आम्हालाही माघार घ्यावी लागली ती पायीच, कारण जी थोडीफार मोटरवाहने होती ती अवजड सामान वाहून नेण्यास तसेच रुग्ण वा जखमी व्यक्तींना नेण्यास राखून ठेवली होती. ती आम्हा पदयात्रींच्याच सान्निध्यात कधी पुढे, कधी मागे असे असत.

एवढा मोठा समुदाय परतताना शत्रूंच्या विमानांना दिसू नये म्हणून आम्ही रात्रभर चालत असू व पहाट येईल तेथे रानात तळ ठोकून वनराजीत स्वयंपाक, स्नान, भोजन, विश्रांती, झोप इ. उरकून पुन्हा अंधार पडला की आगेकूच असे सुमारे ४०० मैल अंतर आम्हाला चालावे लागले.

अशाप्रकारे आम्ही सयामची राजधानी बँकॉक येथे पोचलो. ठिकठिकाणी स्वातंत्र्यचळवळीच्या नागरी व लष्करी संघटनांची केंद्रे होतीच. त्यांचे आम्हाला सहाय्य होत असे. ऑगस्ट ६ व ९ (१९४५) रोजी एकामागून एक जपानची दोन शहरे हिरोशिमा व नागासाकी यांच्यावर अमेरिकन विमानांनी एक एक ॲटमबॉंब टाकून ती दोन्ही शहरे व त्यातील समस्त नागरिकांचे जीवन उध्वस्त व रोगजर्जर करून टाकले. हे तंत्र तोवर सर्वांनाच अज्ञात होते. त्याने जपानी राज्ययंत्रणेला धडकीच भरली. अशा प्रकारे जर एकेका शहरावर अणुबॉंब टाकले गेले तर सारे जपानी निर्वंश होतील हे भयानक भवितव्य समोर दिसू लागताच ताबडतोब युद्धतहकुबी व शरणागती पत्करण्याशिवाय दुसरा पर्यायच उरला नव्हता. म्हणून मोठ्या नाइलाजाने, कष्टाने व नामुष्कीने जपानने पॉटस्डॅम नगरी चर्चिल, स्टॅलीन व रुझवेस्ट या त्रिकुटांची खलबते चालली असता युद्ध थांबवून शरणागती पत्करण्याची स्वतःची तयार कळवली. म्हणून १५ ऑगस्ट १९४५ रोजी द्वितीय महायुद्ध संपले. अमेरिका, ब्रिटन व रशिया हे तीन देश सांगतील त्या अटी मान्य केल्याशिवाय जपानला अन्य पर्याय उरला नाही.

एकामागून एक ॲटमबॉंब पडू लागले तर समस्त जपानी जनतेचे अस्तित्वच नष्ट होईल अशा आणिबाणीच्या अवस्थेत जपानला जरी वाटेल त्या नामुष्कीच्या अटींवर शरणागती पत्करावी लागली तरी जपानी पिंड तसा नव्हता. त्यांचा लष्करी बाणा वज्रासमान ताठर, कणखर, कोणासमोरही न वाकणारा, न झुकणारा होता. प्रत्येक जपानी सैनिकाचे अंगी कणखर देशभक्तीचा बाणा असा भिनवला गेला होता की, "कोणीही कधीही शत्रूस शरण म्हणून जायचे नाही. शत्रूचे युद्धबंदी म्हणूनही जीवन कंठायचे नाही. अचानक न कळत, निःशस्त्र जरी

पकडले गेलात तरी जीभ एका बाजूला वळवून वरच्या व खालच्या दंतपंक्तीत अडकवून चावल्याने होणाऱ्या रक्तस्रावाने आत्महत्या करा पण युद्धबंदी म्हणून हीन दीन जीवन जगू नका."

त्या जपानी राष्ट्रीय बाण्याच्या शिकवणुकीमुळे जपानी सैनिक युद्धबंदी म्हणून हाती लागलेले अगदीच तुरळक असत. स्वसैन्याची तुकडी चाल करून जात असता एखाद दुसरा सैनिक वाटेत घायाळ होऊन वा अशक्ततेमुळे मागे पडला तर तो तशा जर्जर अवस्थेतही जे मिळेल ते खात रस्त्यातील असहाय्य भिकाऱ्यासारखा वाटेत मरे पण कोणासमोरही तोंड वेंगाडून वा हात पसरून दयेची भीक मागत नसे. म्हणूनच द्वितीय महायुद्ध संपून तीस तीस वर्षे, पन्नास वर्षे उलटून गेल्यावरही दूरवरच्या देशात रानावनात जीवन कंठणारे एकटेदुकटे जपानी सैनिक गवसत. "मारता मारता मरावे। वा एकाकी जीवन कंठावे। पण कोणासही कधी शरण न जावे" ही शिकवण प्रधानमंत्री व सेनाप्रमुख हिडेकी टोजोपासून कनिष्ठतम सैनिकापर्यंत प्रत्येक जपान्यांच्या मनात इतकी कणखर रुजवली गेली होती की, "बाबांनो अणुबॉंबच्या भीषण वर्षावामुळे आपल्या देशास बिनशर्त शरणागती पत्करावी लागत आहे." अशी घोषणा करून जपानी सैनिकांनी जेथे असतील जसे असतील तशा अवस्थेत शस्त्रे टाकावीत असे सांगण्याची हिडेकी टोजो ह्यांची सुद्धा छाती नव्हती. कारण त्यांच्या तोंडून ती नामुष्कीची आज्ञा निघताच टोजोंच्या दुय्यम, सहाय्यक अधिकाऱ्यांनीच टोजोंची मान छाटली असती. म्हणून टोजोंनी त्या आणिबाणीच्या बिकट व लाजिरवाण्या प्रसंगी सम्राटाची भेट घेतली. वैदिक प्रथेनुसार जपानी सम्राट सूर्यवंशी आहे. राज्याभिषेक आदि प्रसंगी तो सम्राट केशरी वस्त्रे परिधान करतो. सम्राटाची आज्ञा ही प्रत्यक्ष परमात्म्याची आज्ञा असे मानून तिचे काटेकोर पालन हा जपानी जनता स्वधर्म मानते. सम्राटासमोर प्रधानमंत्री जरी गेला तरी त्याने सम्राटाच्या दृष्टीला दृष्टी न भिडवता मान खाली घालूनच सम्राटाशी बोलायचे व सम्राटाची सूचना वा आज्ञा शिरसावंद्य मानायची ही जपान्यांची राष्ट्रीय शिस्त होती म्हणून हिडेकी टोजोंनी सम्राटाची भेट घेऊन त्यांना विनंती केली की आता आपणच नभोवाणीने प्रजाजनांना व सैनिकांना 'युद्ध स्थगित झाल्याने त्यांनी इतःपर शस्त्र चालवू नये' अशी आज्ञा द्यावी. त्यानुसार सम्राटाने ती घोषणा केली व युद्ध थांबले.

बँकॉकमध्ये युद्धसमाप्तीची बातमी कळताच सुभाषचंद्रांनी तेथील भारतीय

जनतेची एक सभा बोलावली. त्या सभेपुढे भाषण करताना सुभाषचंद्र म्हणाले की, "जपानी राष्ट्र शरण गेले म्हणून आपला संघर्ष थांबला असे समजू नका. आपले स्वातंत्र्य तर आपण केव्हाच गमावून बसलो आहोत. म्हणून ते परत मिळेपर्यंत आपला लढा चालूच राहणार." कशाही दुर्धर परिस्थितीत स्वतःची ध्येयनिष्ठा ढळू न देण्याचा सुभाषचंद्रांचा बाणा क्वचितच कोणात दिसतो.

स्वातंत्र्यप्राप्तीच्या दृष्टीने राजकीय डावपेच व संघर्ष यांचा आत्मीयतेने अभ्यास केल्याने व कशाही परिस्थितीत ध्येयकार्य सोडायचे नाही अशा निश्चयी वृत्तीने सुभाषचंद्रांनी स्वतःच्या मनात असा बेत आखला की "रशिया हा (कम्युनिस्ट) 'समूहनिष्ठ' धोरणाचा देश असल्याने राजशाही ब्रिटिश सत्तेशी रशियाचे शत्रुत्व पुढेमागे निर्माण होईलच. म्हणून आपण रशियन नेत्यांच्या संगनमताने हिंदुस्थानावरील ब्रिटिशसत्ता उपटून टाकण्याचा यत्न करावा. त्यासाठी जपानी सरकारने त्यांच्या विमानातून रशियाच्या सीमेवर वा सीमेच्या जेवढे आत सुभाषचंद्रांना सोडता येईल तेवढे सोडावे, अशी जपानी सरकारला शेवटली विनंती करावी" असा सुभाषचंद्रांच्या मनात निर्वाणीचा बेत पक्का झाला. कशाही परिस्थितीत ध्येयनिष्ठा सोडायची नाही असा न डगमगणारा, निःस्वार्थी निर्धार हे सुभाषचंद्रांच्या स्वभावाचे वैशिष्ट्य होते.

त्या त्यांच्या बेतानुसार नेताजी बँकॉकहून जपानी सैनिकी विमानाने सिंगापुरी गेले. सिंगापुरातील जपानी लष्करी केंद्राशी त्यांनी संपर्क साधून टोकियोतील जपानी सरकारशी पुढील हालचालींबाबत वाटाघाटी करण्याची त्यांनी स्वतःची मनीषा सांगितली, त्यानुसार दि. १६ ऑगस्ट (१९४५) रोजी सकाळी सात वाजता सुमारे ६-७ सहकाऱ्यांसह सिंगापुरातून जपानी लष्करी विमानाने नेताजी निघाले अन् तासभरात बँकॉकला पोचले. जगन्नाथराव भोसले व मी बँकॉकलाच होतो. सव्वादोन वर्षांच्या नेताजींच्या वास्तव्यात केलेल्या अनेक सार्वजनिक सभांतून स्वातंत्र्य लढ्यासाठी जनतेने त्यांना स्वस्फूर्तीने दाग दागिने, सोने, नाणे इ. जे दिले होते ते आझाद हिंद सरकारच्या रिझर्व बँकेत जमा होते. तसेच जपानी नोटात द्रव्यही जमा होते. त्या द्रव्याचा हिशेब करून जीवित स्वातंत्र्यसैनिकांना त्यांचा सहा महिन्यांचा भत्ता देण्यात आला. कारण यापुढे कोण कोठे जाणार, कोणावर काय प्रसंग गुदरेल ह्याची काहीच कल्पना करणे शक्य नव्हते. युद्धाची स्थगिती ही पाश्चिमात्य राष्ट्रांनी बिनतारी संदेशाने कळवण्यात आल्याने अतिपूर्वेतील प्रदेशात पूर्ववत ब्रिटिश आदि सेना येऊन

स्वतःच्या अंमल आरंभ करण्यास अजून एकदीड महिना लागणार होता. तोवर जपान्यांच्या व नेताजींच्या स्वातंत्र्यचळवळीच्या हालचाली अनिर्बंध चालत होत्या. मात्र आता गुपचुप व वेगाने निरवानिरव करणे भाग होते.

अडीअडचणीत पुढील अनिश्चित भवितव्यात नेताजींसह सातआठ जणांच्या गटाला उपयोगी पडावी म्हणून दोनचार पेटाऱ्यात सोनेचांदी, दागदागिने इ. संपत्ती बरोबर घेतली होती.

बँकॉकहून विमान निघाले ते सायगांव नगरी उतरले. रात्र तेथेच काढावी लागली. दुसरे दिवशी तेथील जपानी लष्करी अधिकाऱ्यांशी चर्चा करता कळले की तातडीची सोय म्हणून स्वतः नेताजी सुभाषचंद्र बोस व त्यांचेबरोबर एकच भारतीय जपानला तूर्त जाऊ शकेल कारण विमानांचा तुटवडा होता व बऱ्याच जपानी लष्करी अधिकाऱ्यांना तातडीने जपानला परतायचे होते. उरलेल्या चारपांच भारतीय सहकाऱ्यांनी तूर्त सायगांवलाच रहावे. नंतर काही दिवसातच त्यांना जपानला धाडण्याची व्यवस्था होईल.

कर्नल हबिबुर रेहमान हा हिंदी स्वातंत्र्यसेनेचा अधिकारी नेताजींच्या सहासात जणांच्या गटात होता. तूर्त त्याने सुभाषचंद्रांसह जावे व इतरांनी सायगांव नगरी थांबावे असे ठरले. हबिबुर रेहमान हा मोठा सभ्य, शांत, सोज्ज्वळ वागणुकीचा मनुष्य होता.

सन १९४५ च्या ऑगस्ट दि. १८ रोजी सकाळी नेताजी सुभाषचंद्र बोस, कर्नल हबिबुर रेहमान व काही जपानी अधिकारी हे जपानी लष्करी विमाना टोकियोला जाण्यास निघाले. त्या वाटेवर टायवान द्वीप (बेट) होते. त्य बेटावरील टायशंकु विमानतळावर दुपारी १॥ च्या सुमारास हे विमान उतरले त्यात आणखी काही जपानी अधिकारी टोकियोस जाण्याच्या उद्देशाने चढले विमानतळावरील कर्मचाऱ्यांनी विमानाच्या पेट्रोलच्या टाकीत पेट्रोल भरले. अ सुमारे सव्वादोन वाजता दुपारी विमानाने टोकियोस जाण्याच्या उद्देशाने उड्डा केले. विमानतळावरून उड्डाण केल्यावर उंची व वेग वाढवण्याच्या प्रयत्ना विमानाने तळाभोवती दोन प्रदक्षिणा घातल्या असतील तोच विमानाच्या पुढ्या उभयबाजूस दोन यंत्रांचे जे दोन पंखे फिरत होते त्यापैकी एक तुटून धाडक भूमीवर पडला. युद्धाच्या दिवसातील घिसाडघाई व कामकऱ्यांचा अभा इत्यादींमुळे विमानाच्या इंजिनमध्ये दोष राहिल्याने एकाबाजूच्या पंख्याचे पा गळून पडल्याबरोबर विमानाचा तोल जाऊन हवेत दोनतीन गटांगळ्या खा

विमान धाडकन् मैदानावर आदळले. त्यावेळी विमान फार उंचावर नव्हते. पण विमानाचे पेट्रोलचे टाके फुटून जळत्या पेट्रोलचा एक फवारा सुभाषचंद्रांच्या अंगावर फेकला गेला.

विमान आदळले तेव्हा त्यातील माणसे कोणी पुढे, कोणी मागे बसली होती त्यानुसार कमी अधिक आदळआपटीत जखमी झाली होती. नेताजी सुभाषचंद्र विमानाबाहेर फेकले जाऊन भूमीवर कोलमडल्यावर त्यांच्या घट्ट लष्करी पोषाखावर जळत्या पेट्रोलचा एक झोत शिंपला गेला. जपानची हवा थंड म्हणून सुभाषचंद्रांच्या अंगावर घट्ट, गरम मिलिटरी पोषाख होता. त्या ऊबदार पोषाखावर फेकला गेलेला पेट्रोलचा फवारा पोषाखात मुरला अन् त्यांच्या त्या पोषाखातून जळत्या पेट्रोलच्या वाफा निघू लागल्या. विमानाबाहेर नेताजी कोलमडल्यावर ते उठून उभे राहिले. अन्य ज्या प्रवाश्यांना विशेषसे लागले नव्हते तेही स्वतःला सावरून जखमी प्रवाश्यांना विविध प्रकारचे सहाय्य करू लागले. विमानतळावरील कर्मचारीही अपघातग्रस्त व्यक्तींच्या सहाय्यार्थ धावले. कर्नल हबिबुर रेहमानच्या हातांवर मनगटांपाशी जळत्या पेट्रोलचे तुरळक शिंतोडे उडाले होते तेवढेच. इतर काही दुखापत नव्हती. म्हणून ते व अन्य सुरक्षित प्रवासी आणि विमानतळावरील कर्मचारी यांनी सुभाषचंद्रांचा घट्ट लष्करी पोषाख काढायला सहाय्य केले. सुभाषचंद्रांचा सारा पोषाख जळत्या, कढत पेट्रोलच्या फवाऱ्याने ओलाचिंब होऊन उकडलेल्या रताळ्यागत त्यांच्या उभ्या शरीरातून वाफा निघत होत्या.

त्यांच्या सामानात सोनेनाणे, दागिने आदींनी गच्च भरलेले जे पेटारे होते ते अपघाताच्या आपटीने पार तुटून फुटून त्यातील चमचमती संपत्ती विमानतळावर सर्वत्र विखुरली गेली होती. एक प्रकारे नेताजींच्या अघटित कर्तृत्वाचा साराच चेंदामेंदा, तूटफूट व चक्काचूर इ. त्या अपघाताने झाला होता. तर दुसऱ्याप्रकारे विमानतळावर विखरून चमचमणारी सोने, चांदी, दागदागिने व हिरेमाणके ह्यांचा सर्वत्र सडा शिंपला गेला असता त्यांच्या मधोमध दिव्य देशशक्तीने चमचमत उभी असणारी सुभाषचंद्रांची वाफावणारी काया एखाद्या दिव्य विभूतीसारखी दिसत होती.

विमानतळावरील कर्मचाऱ्यांनी अपघातग्रस्त व्यक्तींना, काहींना स्ट्रेचरवर आडवे घालून तर काहींना आधार देऊन जपानी लष्करी मोटारवाहनातून लष्करी इस्पितळात पोचवले. तेथे एका पलंगावर सुभाषचंद्र होते तर शेजारच्या

पलंगावर हबिबुर रेहमान होते. रात्री सुमारे आठ वाजेपर्यंत सुभाषचंद्र बोस शुद्धीवर होते व "मैं ठीक हो जाऊंगा" असे हबिबुर रेहमानला अधूनमधून आश्वासन देत होते. नंतर मात्र त्यांना ग्लानी येऊ लागली. अधुनमधून काही अस्पष्ट वा असंबद्ध असे त्यांचे उद्‌गार निघू लागले. अशा अवस्थेत ते हबिबुर रेहमानास म्हणाले की, "मेरे जीवित रहने की अब कोई आशा नहीं है। इसलिये अपने देशवासियोंसे कहो की मेरे अंततक मैंने जो स्वतंत्रता संग्राम चलाया उसे आझादी मिलने तक वे चलाए" तेच त्यांचे अंतिम देशभक्ती प्रेरित वीरोचित अंतिम शब्द होते. तदनंतर त्यांना मूर्छा आली व त्याच रात्री (१८ ऑगस्ट १९४५) साडेदहाच्या सुमारास टायवान बेटावरील जपानी सेनेच्या लष्करी इस्पितळात सुभाषचंद्रांचे प्राणोत्क्रमण झाले. त्यानंतर तेथील विद्युत्‌दाहिनीत त्यांच्या पार्थिव देहाचे दहन झाले व त्यांच्या अस्थि एका खोक्यात बंद करून जपानची राजधानी टोकियो नगरी रेंकोजी मंदिरात ठेवल्या आहेत. त्या बोस कुटुंबाने वा भारत सरकारने न्याव्यात असं जपान्यांनी अनेकवेळा सुचवले. भारत सरकारने बोस कुटुंबाला विचारले. पण सदाशिवराव भाऊंच्या अस्थि जशा संशयास्पद समजून त्या स्वीकारायला वा सदाशिवराव पानिपतात कामी आले हे मानण्यास पार्वतीबाई जशा तयार झाल्या नाहीत तशाच वृत्तीने त्या अस्थि सुभाषचंद्रांच्याच कशावरून? अशा वृत्तीने बोस कुटुंबीयही त्या अस्थि स्वीकारण्यास तयार नाहीत. अन् बोस कुटुंब तयार नाही, त्यामुळे भारत सरकारही त्या अस्थि स्वीकारण्यास तयार नाही.

एकूण सुभाषचंद्रांच्या दोन्ही तळमळी त्यांच्या जीवनात सफल झाल्या नाहीत. मूलतः अन् मुख्यतः त्यांना संन्यास घ्यायचा होता. पण परतंत्र देशात जन्म झाल्याने आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळवून देणे हे आपले आद्य कर्तव्य आहे, ते पार पाडून मग आद्यकर्तव्यपूर्तीच्या समाधानाने आपण संन्यास घेऊन अध्यात्मिक जीवनास लागावे हा त्यांचा मानस होता. म्हणून सार्वजनिक व्याख्यानातून सांगत की, "या युद्धाने हिंदुस्थान स्वतंत्र झाला तरी ते स्वातंत्र्य जनतेच्या स्वाधीन करून मी माझ्या संन्यस्त साधनेसाठी निघून जाईन." ही त्यांची निःस्वार्थी जोड-तळमळ अजोड होती. मी नेताजींना पाहिले त्यावरून नेताजी सुभाषचंद्र बोस ही एक आगळीवेगळी दिव्य विभूती होती असाच त्यांच्या जीवनकार्यातून निष्कर्ष निघतो.

● ●

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

# नेताजी सुभाषचंद्र बोस : एका कम्युनिस्टाच्या दृष्टिकोणातून

**अर्धेन्दुभूषण बर्धन**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

सुभाषचंद्र बोस यांच्या जन्मशताब्दी वर्षात, स्वाभाविकपणे, भारतीय स्वातंत्र्य लढ्यातील त्यांची भूमिका, भारतीय स्वातंत्र्याची त्यांची धारणा यावर मूल्यमापन करणारे उदंड लेखन होत आहे. ऐतिहासिक पुरुषांचे मूल्यमापन अनेकदा सहा आंधळ्याच्या कथेतील हत्तीसारखे असते. त्या महापुरुषांवर आपला हक्क सांगण्यासाठीच कोणत्याही आधाराशिवाय केलेला तो प्रयत्न असतो. उदाहरणार्थ, सुभाष हिंदुत्वाचे पुरस्कर्ते होते. आम्ही त्यांचेच कार्य पुढे नेत आहोत ही भाषा ऐकतो त्यावेळी करमणूक होते. तुलना नेहमीच आणि त्यातही ऐतिहासिक महापुरुषांच्या बाबतीत वादग्रस्त असते. पण तरीही असे म्हणता येते की, या शतकातील दुसऱ्या दशकाच्या उत्तरार्धापासून चौथ्या दशकाच्या मध्यापर्यंत म्हणजे स्वातंत्र्य लढ्याच्या निर्णायक काळात सुभाष एखाद्या महाकाय वीराप्रमाणे भारतीय राजकारणाच्या पटलावर वावरले. गांधीजीनंतर तेच! या स्थानावर पं. नेहरूही होते. नेताजी प्रखर देशभक्त व साम्राज्यवादाचे कट्टर विरोधक असल्याने तरुणांमध्ये लोकप्रिय होते. आपल्या अद्वितीय गुणांनी जीवनकालात ते आख्यायिका बनले. त्यांचे 'दिल्ली चलो' व 'जयहिंद' हे नारे आमच्या अंतःकरणात कायमचे कोरले गेले.

आम्हा कम्युनिस्टांना त्यांचे जर्मनीत जाणे व तेथून जपानमध्ये पोंचणे मान्य नव्हते, तरी त्यांचे प्रत्येक पाऊल भारतीय स्वातंत्र्यासाठी होते. याबाबतीत शंका बाळगण्याचे कारण नाही. त्यांच्या स्थानबद्धतेतून झालेल्या चित्तथरारक सुटकेनंतर त्यांना पेशावर मार्गे अत्यंत जोखमीच्या मार्गाने बर्लीन पर्यंत जाण्यास मदत करणारे भगतराम तलवार व सींग चीमा कम्युनिस्ट होते.

नंतरच्या घटना सर्वविदित आहेत. फॅसिस्ट जर्मनीचा आणि जपानचा महायुद्धात पराभव झाला. सर्व वसाहती देशातून स्वातंत्र्य लढ्याचा उठाव झाला. युद्ध समाप्तीनंतर दोन वर्षांनी भारत स्वतंत्र झाला. सर्व जगातील वसाहतवाद अवघ्या एका दशकात उलथून पडला.

गौतम चट्टोपाध्यायांसारख्या अनेक साम्यवादी इतिहासकारांनी, हिरेन मुखर्जीसारख्या विचारवंतांनी गौरवपूर्ण शब्दात नेताजींचे वर्णन केले. तरीपण त्यांनी नेताजी मार्क्सवादी असल्याचे म्हटले नाही. सुभाष सुभाषसारखेच होते- एक देशभक्त, राजकारणात वामपंथी आणि समाजवादावर विश्वास असणारे. याच कारणांनी ते समकालीन नेत्यांहून वेगळे ओळखले जात.

सुभाषचंद्राचा दृष्टिकोण समजून घेण्यासाठी त्यांच्या अनेक बाबी व त्यांच्या कृती विचारात घेणे आवश्यक आहे. त्यातील सुसंगती अधोरेखांकित केली पाहिजे. त्यांना अर्धवट संदर्भांनी उद्धृत करणे योग्य नव्हे.

चार वर्षाच्या कारावासातून सुटका झाल्यावर, ३ मे १९२८ रोजी पुणे येथे महाराष्ट्र प्रांतीय राजकीय परिषदेसमोर बोलताना ते म्हणाले,

''सांप्रदायिक गळवांवर मलमपट्टी आवश्यक वाटत असेल तर मी तिच्या विरोधात नाही. तरीपण सांप्रदायिकतेच्या दुखण्यावर अधिक सखोल उपाययोजना शोधण्याचा आग्रह मात्र धरेन. भिन्न धर्मगटांनी एकमेकांच्या धार्मिक परंपरा, परस्परांचे आदर्श आणि इतिहास जाणून घेणे आवश्यक आहे कारण सांस्कृतिक जवळीक शांती आणि एकोपा यांचा मार्ग खुला करते. माझ्या मते संप्रदायातील राजकीय ऐक्य संस्कृतीच्या समेटातच आहे... **संस्कृतीचा समेट सुलभ व्हावा यासाठी धर्मनिरपेक्षता आणि विज्ञान यांची शिकवण आवश्यक आहे. धर्मवेड सांस्कृतिक जवळीकीच्या मार्गातील मोठा काटा आहे. धर्मवेडावर धर्मनिरपेक्षता आणि विज्ञानाचे शिक्षण हाच सर्वोत्तम उपाय आहे.** ''
(ठळक लिखाण प्रस्तुत लेखकाचे)

ही सुभाषची भूमिका. ती शेवटपर्यंत कायम होती. एका गटाला दुसऱ्या गटाच्या विरोधात उभे करण्याचा हेतू बाळगून त्यांनी आपल्या भूमिकेत कधीही बदल केला नाही. सांप्रदायिक राजकारणाला दिलासा मिळावा असे कोणतेही उद्गार त्यांनी काढले नाहीत. अशी कोणतीही कृती त्यांनी केली नाही. आझाद हिंद फौज, सांप्रदायिक ऐक्याची प्रतीक होती. झाशी राणी पथक भारतीय सैनिकी इतिहासातील 'केवळ स्त्रीयांचे' असे पहिले पथक आहे.

सुभाषबाबूंनी स्पष्टपणे जरी, वर्गसंघर्ष इतिहासाला गती देणारी शक्ती आहे हे मान्य केले नसले तरी उपरोल्लेखित भाषणात त्यांनी वर्ग जाणीव सांप्रदायिक जाणिवेवर मात करू शकते असा विचार व्यक्त केला. ते म्हणतात,

"आर्थिक जाणिवेचा उदय म्हणजे धर्मवेडाचा मृत्यू. हिंदू शेतकरी आणि मुसलमान शेतकरी यांच्यात मुसलमान शेतकरी व मुसलमान जमीनदार यांच्यापेक्षा अधिक समान गोष्टी आहेत. जनतेला त्यांचे आर्थिक हित कशात आहे हे शिकविले पाहिजे. एकदा त्यांना जाणीव होताच ते सांप्रदायिक कलहात प्यादे होण्याचे नाकारतील."

या विवेचनात वर्गीय जाणीव म्हणजे आर्थिक जाणीव एवढंच गृहित धरले. पण तरुण सुभाषची त्यावेळी आपल्या राजकीय धारणा आणि तत्त्वज्ञान यांना आकार देण्याची प्रक्रिया पूर्ण झालेली नव्हती म्हणून तसे झाले असे म्हणता येईल.

१९३१ मध्ये, भगतसिंहाच्या बलिदानानंतर आणि कराची काँग्रेस अधिवेशनाच्या पूर्वसंध्येला, २७ मार्च १९३१ रोजी नौजवान भारत सभेत अध्यक्षपदावरून बोलताना सुभाषबाबूंनी स्वतंत्र भारताची आपली कल्पना स्पष्ट केली. ती अशी :

"मला भारतात समाजवादी गणतंत्र हवे.... काँग्रेसच्या कार्यक्रमातून भारताला स्वातंत्र्य मिळेल ह्यावर माझा विश्वास नाही. भारताला स्वातंत्र्य मिळवून देणारा कार्यक्रम, माझ्या मते असा असावा :

(अ) शेतकरी व कामगार यांचे समाजवादी संघटन;

(ब) तरुणांचे अत्यंत शिस्तबद्ध स्वयंसेवी संघटन;

(क) जातिभेदाचे आणि सर्व प्रकारच्या अंधश्रद्धांचे उच्चाटन;

(ड) आमच्या भारतीय स्त्रीयांचे नवीन कार्यक्रम राबविण्याचे दृष्टीने संघटन;

(इ) ब्रिटिश मालाचा तीव्र बहिष्कार करण्यासाठी योजना तयार करणे;

(क) नवीन योजना व कार्यक्रम रुजविण्यासाठी साहित्य तयार करणे;

....भारत हा जागतिक समाजवादाचा आधार आहे. साम्राज्यवादाची तो मृत्यूघंटा आहे. तेव्हा त्यासाठी आपण स्वतःला समर्थ बनवून भारताला स्वतंत्र करू या. त्यामुळेच मानवता जगेल."

अशा रीतीने, सुभाषबाबूंनी स्वातंत्र्य लढ्याची सांगड कामगार,

शेतकरी, तरुण आणि स्त्रिया यांच्या उन्नयनाशी घातली. सुभाषबाबूंनी समाजवादी गणराज्याची कल्पना केली, जातिभेदरहित, अंधश्रद्धारहित समाजाची संकल्पना मांडली. भारतीय स्वातंत्र्याकडे जागतिक दृष्टिकोणातून त्यांनी पाहिले. मानवता व स्वातंत्र्य त्यांना अभिप्रेत होते.

त्यांनी आयटक च्या अध्यक्षपदावरून बोलताना ४ जुलै १९३१ ला याच कल्पनेचा पुनरुउच्चार केला. उदा.

"भारताचा तसेच जगाचा उद्धार समाजवादातच आहे याविषयी माझ्या मनात कोणतीच शंका नाही. भारताने अन्य देशांच्या अनुभवांचा लाभ घ्यावा. त्यांच्या अनुभवाने शहाणे व्हावे पण भारताने आपल्या गरजांशी आणि वातावरणाशी सुसंगत पद्धती निर्माण करावी. कोणताही सिद्धांत प्रत्यक्षात उतरवताना भूगोल व इतिहास नाकारून चालणार नाही. भारताने स्वतःचे वेगळे समाजवादी प्रारूप तयार करावे."

इतिहास आणि भूगोल यांच्याशी सिद्धांताची सांगड घालण्याची कल्पनाच वेगळी आहे. सुभाष दैनंदिन राजकारणात एवढे व्यस्त होते की त्यांना आपले विचार कोणत्याही "वादाच्या" साच्यात बसविता आले नाहीत, पण त्यांचा कल उघड होता. हा कल पाहूनच त्यांना भारतीय राजकारणात वामपंथी म्हणून शिक्का लागला. त्यांनी वामपंथी शक्तीचे एकत्रीकरण करून काँग्रेसला लोकशाहीवादी बनवून विशाल संघर्षाकडे नेण्याची कल्पना मांडली. त्यांनी ब्रिटिश साम्यवाद्यांच्या भूमिकेची प्रशंसा केली. तो पक्ष भारतीय स्वातंत्र्याला मदत करीत होता. हरिपुरा अधिवेशनात १९ फेब्रु. १९३८ अध्यक्षीय भाषणात सुभाष म्हणाले :

"आज काँग्रेस हीच एकमेव सर्वोच्च संस्था आहे, जी जनआंदोलन घडवू शकते. भारताच्या उन्नयनासाठी धडपडणाऱ्या सर्व साम्राज्यवादी विरोधी संघटनांसाठी काँग्रेस हे समान व्यासपीठ आहे. तेव्हा आपण सर्व अखिल भारतीय काँग्रेसच्या ध्वजाखाली एक होऊ या. मी सर्व डाव्या गटांना आवाहन करतो की त्यांनी आपली सर्व संसाधने व शक्ती काँग्रेसला लोकशाहीवादी बनविण्यासाठी एकत्र करावी. तिला व्यापक साम्राज्यवाद विरोधी पायावर संघटित करावे.

"मी हे आवाहन करतो. (कारण) ब्रिटिश साम्यवादी पक्षाने मला प्रेरणा दिली. त्याचे भारताविषयीचे सर्वसामान्य धोरण भारतीय राष्ट्रीय काँग्रेसशी

जुळणारे दिसते.''

एक वर्षानंतर काँग्रेसमधील डाव्या शक्तींची कसोटी लागली. त्यावेळी सुभाषबाबूंनी काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठी पुन्हा उमेदवारी घोषित केली तीही प्रत्यक्ष गांधींजींचाच विरोध असताना. काँग्रेसमधील डाव्या-उजव्या आघाडीतील संघर्ष अटळ होता. दोन्ही आघाडीतील फूट टाळण्यासाठी सुभाषने लगेच निवेदन दिले,

''काँग्रेसमध्ये फूट पाडण्याचे दायित्व डाव्यांनी घेवू नये. जर फूट पडलीच तर ती डाव्यांमुळे पडणार नाही, तर त्यांच्या फूट विरोधी प्रयत्नांना अपयश आल्याने पडेल.''

निवडणुकीतील यश हेच काँग्रेसमधील सुभाषबाबूंच्या अपयशाचे कारण ठरले. काँग्रेसमधील उजवा गट सहजी पराभव मानणारा नव्हता. त्यांची शक्ती आणि साधने कमी लेखून चालणार नव्हते. गांधीजींकडे प्रतिहल्ल्याचे नेतृत्व सोपवून उजवा गट त्रिपुरी अधिवेशनात सुभाषबाबूंची कोंडी करण्यात यशस्वी झाला.

सुभाषबाबूंनी वामपंथी एकीकरण समिती स्थापन केली. त्यासाठी भारतीय कम्युनिस्ट पक्ष आणि शेतकरी नेते स्वामी सहजानंदांची त्यांनी मदत घेतली. आरंभी सुभाषचंद्र बोसांचा फॉर्वर्ड ब्लॉक व भाकप एका बाजूने होते. युद्धाला ते साम्राज्यवाद्यांचे युद्ध मानत होते व दोघेही युद्धाच्या विरोधात होते. पण फॅसिस्ट जर्मनीने जून १९४१ मध्ये रशियावर केलेल्या चढाईनंतर तिचे सर्व युरोपवर वर्चस्व प्रस्थापित झाले. एक नवीन आयाम युद्धाला मिळाला. दरम्यान सुभाषबाबूंनी जर्मनीत पोचून आझाद हिंद सेनेची स्थापना केली.

हे नमूद करणे आवश्यक आहे की, सुभाषबाबूंनी हिटलरच्या सैन्याबरोबर रशियाशी लढण्याचे नाकारले. तसे केल्यामुळे भारतीय स्वातंत्र्याचा कोणताही लाभ होणार नाही हे त्यांनी जाणले. म्हणून मग त्यांनी जपानकडे प्रयाण केले. फॅसिस्टांनी तोवर आझाद हिंद फौजेच्या शिपायांना अटक केली.

जपानच्या मदतीने आझाद हिंद फौज स्थापन करण्याचे सुभाषबाबूंचे प्रयत्न सर्वश्रुत आहेत. त्यांचे इतिहासाचे, भूप्रदेशाचे आकलन त्यांनी आझाद हिंद फौजेतील पथकांना दिलेल्या नावातून व्यक्त होते. त्यांचे राष्ट्रीय-सांस्कृतिक ऐक्याचे विचारही त्यात प्रतीत होतात. त्यांनी आपल्या जोशपूर्ण भाषणातून ब्रिटिशांशी लढा देणाऱ्या इतिहासातील सर्व सैनिकांचा गौरव केला. आझाद हिंद

सरकार स्थापन करताना २१ ऑक्टो. १९४३ ला केलेल्या भाषणात सर्व भारतीयांच्या ऐक्यावर भर दिला.

आझाद हिंद फौजेचे शूर सैनिक कोहीमापर्यंत ब्रह्मदेशाच्या दुर्गम जंगलातून वाट काढीत धडक देवू शकले. पण तोवर जपानला शेवटची घरघर लागली. पश्चिमेत शौर्यशाली लाल सेनेने जर्मनीला पराभूत केले. आझाद हिंद फौजेचे कार्य अपूर्ण राहिले. पण पहाटेपूर्वी नेहमीच काळाकुट्ट अंधार होत असतो.

आपल्या सर्व युद्ध प्रयत्नात सुभाषबाबूंनी, ज्यांना आता 'नेताजी' ही उपाधी प्राप्त झाली होती, त्यांनी कधीही सोव्हिएट रशियावर टीका केली नाही. उलट मे १९४५ मध्ये बँकॉकला केलेल्या एका भाषणात ते म्हणतात,

"हे स्पष्ट आहे की, रशियाचा युद्ध हेतू ब्रिटन-अमेरिका यांच्यापेक्षा वेगळा आहे याला, जर्मनी दोघांचाही समान शत्रू असला तरी, सान्फ्रान्सिस्को अधिवेशनातील घटना दुजोरा देतात. रशियन परराष्ट्रमंत्री मोलोटोव्ह यांनी अँग्लो-अमेरिकन मागण्यांना संमती देण्यास नकार दिला. मोलोटोव्ह यांनी एक पायरी पुढे जाऊन भारत आणि फिलीपाईन्समधून ब्रिटिशांची बाहुले बनून आलेल्या त्या त्या राष्ट्रातील प्रतिनिधिंच्या सच्चेपणालाच आव्हान दिले."

असे होते सुभाषचंद्र बोस. अशी होती त्यांची स्वातंत्र्य संग्रामातील भूमिका.

आझाद हिंद सैनिकांनी साम्राज्यवादी शत्रूपुढे नव्हे तर आपल्या मातृभूमीसमोर शरणागती स्वीकारली. ऐतिहासिक लाल किल्ल्यात त्यांचे विरुद्ध चाललेला अभियोग हा भारतीय स्वातंत्र्य संघर्षातील शेवटच्या नाट्याचा शेवटचा अंक होता.

सुभाषचंद्राच्या शेवटच्या भूमिकेचे कम्युनिस्टांचे आकलन चुकले. त्यांनी जपानकडून जी मदत घेतली ती देशभक्तीतून. ते जपानचे साथीदार किंवा सहयोगी नव्हते. या सर्व लढ्यात, आझाद हिंद सरकारचे आणि फौजेचे प्रमुख म्हणून त्यांनी दाखविलेली अस्मिता आणि त्यांची विश्वासार्हता अगदी स्वच्छ आणि सुरक्षित होती.

त्यावेळी केलेल्या चुकीच्या आकलनाबद्दल कम्युनिस्ट पक्षांनी खेद व्यक्त केला. चूक लगेच दुरुस्तही केली.

आज अत्यंत अभिमानाने सांगावेसे वाटते की, आमच्या ऑल इंडिया स्टुडंट फेडरेशनच्या नेतृत्वात सर्व देशभरचे विद्यार्थी आय. एन. ए. च्या

अभियुक्ताच्या मदतीसाठी उभे ठाकले. लाखोंच्या कंठातून शहानवाझ खान, गुरूबक्षसिंग आणि सेहगल यांच्या सुटकेचे नारे लागले. देशाच्या काना-कोपऱ्यातून 'जयहिंद', 'चलो दिल्ली' व 'नेताजी जिंदाबाद'चे नारे गुंजले.

संपूर्ण देशाने नेताजींप्रती आपले ऋण फेडले. या शताब्दी वर्षात सुभाषचंद्रांच्या स्वातंत्र्य लढ्याचे, त्यांच्या राष्ट्रीय ऐक्याच्या आणि सांप्रदायिक एकात्मतेच्या विचारांचे, समाजवादी भारताच्या संकल्पनेचे आपण स्मरण करू या.

● ●

(श्री. अर्धेन्दुभूषण बर्धन यांच्या मूळ इंग्रजी लेखाचा
डॉ. श्री. प्र. कुळकर्णी यांनी केलेला अनुवाद.)

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

# कामगार चळवळीतील सहभाग

## डॉ. य. दि. फडके

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

१९२८ आणि १९२९ ही दोन्ही वर्षे देशात औद्योगिक अशांततेची वर्षे होती. रेल्वे कामगार, कापड, ज्यूट गिरण्यांतले कामगार यांच्यापासून ते महापालिकेच्या सफाई कामगारांपर्यंतच्या श्रमजीवींनी संप केले. ते कमी अधिक काळ चालवणारे नेते उद्योगधंद्याबाहेरचे होते. बहुतेक कम्युनिझमच्या तत्त्वज्ञानाने किंवा डाव्या विचारसरणीने भारलेले होते. कामगार चळवळीतही अर्जविनंत्या करून शिष्टमंडळे पाठवून कायद्यात बदल सुचवून सनदशीर मार्गांनी कामगारांचे प्रश्न सोडवणारे नारायण मल्हार जोशी, दिवाण चमनलाल यांच्यासारखे नेमस्त किंवा मवाळ नेते होते. याउलट संपाचे अस्त्र उपसून दीर्घकाळ लढा दिल्याशिवाय कामगारांच्या हाती काहीही पडणार नाही, अशी धारणा असलेले तरुण कामगारनेते वर्गलढ्याची जहाल भाषा बोलत असत. वर्गसंघर्षावर विश्वास असलेले प्रमुख कम्युनिस्ट नेते १९२९ च्या मार्चमध्ये मीरत कट खटल्यात गोवले गेले आणि तुरुंगात खितपत पडले. १९२९ च्या जूनमध्ये इंग्लंडमध्ये मजूरपक्षाचं मंत्रिमंडळ अधिकारावर आलं तरी त्या सरकारनं मीरत खटल्यातील आरोपींची मुक्तता केली नाही. व्हिटले यांच्या अध्यक्षतेखाली हिंदुस्थानातील कामगारांच्या परिस्थितीची पाहणी करून सुधारणेचे उपाय सुचविण्यासाठी ४ जुलै १९२९ रोजी बादशाही आयोग नेमण्यात आला. या आयोगात व्हिक्टर ससून, घनश्यामदास बिर्ला या उद्योगपतींबरोबरच ना. म. जोशी आणि दिवाण चमनलाल या नेमस्त मजूर पुढाऱ्यांचीही सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. मोतीलाल नेहरू समितीचा अहवाल फेटाळावा, व्हिटले आयोगावर बहिष्कार घालावा अशा

आशयाचे ठराव आयटकच्या वार्षिक अधिवेशनात मंजूर झाल्यामुळे अखिल भारतीय कामगार संघटनेत फूट पडली आणि ना. म. जोशी, एस. सी. जोशी, चमनलाल, व्ही. व्ही. गिरी या नेमस्त नेत्यांची इंडियन ट्रेड युनियन फेडरेशन ही नवी संघटना १९२९ च्या अखेरीस स्थापन केली.

जवाहरलाल नेहरू आणि सुभाषचंद्र बोस १९२८ सालापासून कामगार चळवळीत लक्ष घालू लागले. हावड्याची ट्राम कामगारांची संघटना, अखिल बंगाल मोटार कामगार संघ, बजबज इथली तेल व पेट्रोल व्यवसायातल्या कामगारांची संघटना अशा विविध कामगार संघटनांचे सुभाषचंद्र पदाधिकारी बनले होते. बंगाल प्रांतिक काँग्रेसचे अध्यक्ष झाल्यानंतर त्यांनी तिथंही कामगारांसाठी स्वतंत्र विभाग सुरू केला, पण त्याचं अस्तित्व फक्त कागदोपत्री राहिलं. शेतकऱ्यांना, कामगारांना, विद्यार्थ्यांना आणि स्त्रियांना राष्ट्रीय चळवळीत सहभागी करून घेणं हा खरा सुभाषचंद्रांचा हेतू होता. काँग्रेस पक्षाला व्यापक जनआंदोलनाचं रूप लाभलं तरच देश स्वतंत्र होईल अशी खूणगाठ त्यांनी मनाशी बांधली होती. १९२८ साली जमशेटपूरच्या टाटा आयर्न अँड स्टील वर्क्समधील कामगार संपावर गेले तेव्हा सुभाषचंद्रांनी त्या संपाचं नेतृत्व केलं.

१९२९ च्या जुलैमध्ये जमशेटपूरच्या टिनप्लेट कंपनीतले कामगार संपावर गेले. त्यांना सहानुभूती दाखविण्यासाठी टाटा आयर्न अँड स्टील कंपनीतल्या कामगारांनी संपावर जावं असं सुभाषचंद्रांचं म्हणणं होतं. टिनप्लेट कंपनीचे दोन तृतियांश शेअर्स वर्मा ऑईल कंपनीने खरेदी केलेले असले तरी उरलेले टाटांच्या पोलाद कंपनीच्या मालकीचे होते. टिनप्लेट कंपनीच्या संचालकांमध्ये दोघे संचालक टाटा उद्योगसमूहाचे प्रतिनिधी होते. टिनप्लेट कंपनीला वीज आणि पाणी टाटा पुरवीत असत. टाटांच्या पोलाद कारखान्यातले काही सेवक टिनप्लेट कंपनीत काम करीत होते. नाक दाबलं की तोंड उघडतं हे लक्षात येऊन टाटांच्या पोलाद कंपनीत संप घडवून आणला की टाटा टिनप्लेट कंपनीच्या व्यवस्थापकांना संपावरच्या कामगारांशी बोलण्यास भाग पाडतील, असं सुभाषचंद्रांना वाटत होतं. तसं त्यांनी ६ जुलै १९२९ रोजी वृत्तपत्रात प्रसिद्ध केलेल्या निवेदनात स्पष्ट म्हटलं होतं. टाटांच्या जमशेटपूरच्या कारखान्यात माणिक होमी या पारशाच्या नेतृत्वाखाली कामगार संघटना स्थापन करण्यात आली होती. ती लेबर फेडरेशन नावानं ओळखली जात असे. सुभाषचंद्र टाटांच्या कारखान्यातल्या युनियनचे नेतृत्व करीत होते. तिचं नाव होतं लेबर

असोसिएशन. सप्टेंबर १९२८ मध्ये सुभाषचंद्रांच्या युनियननं केलेला संप बारगळला होता. टाटांनी कामगार वर्गात फूट पाडली होती. प्रथम माणिक होमीच्या लेबर फेडरेशनला त्यांनी रीतसर मान्यताही दिली नव्हती. सुभाषचंद्रांच्या युनियननं वाटाघाटी करून मालकांनी सुचविलेल्या तडजोडीच्या मसुद्याला मान्यता दिली. प्रथम माणिक होमीनंही तो स्विकारला. नंतर कामगारांनी तो मसुदा मान्य करू नये म्हणून माणिक होमीनं आपण केलेल्या भरमसाठ मागण्या मान्य केल्या जाव्या असा आग्रह धरला. कामगारांचा बुद्धिभेद करण्यासाठी त्यानं सुभाषचंद्रांच्या चारित्र्यावर चिखलफेक केली. टाटांनी चलाखी करून माणिक होमीच्या युनियनला मान्यता दिली. एकाच कारखान्यात दोन युनियनना मान्यता देऊन कोंबडी झुंजवीत मजा पाहावी असा टाटांनी विचार केला असावा. त्यांचा हा डाव ओळखून कामगार संघटनांमधील दुही टाळण्यासाठी सुभाषचंद्रांनी १९२९ च्या जानेवारीपासून जमशेटपूरच्या टाटांच्या कारखान्यातील कामगार संघटनेचं नेतृत्व करणं सोडून दिलं. माणिक होमीच्या लेबर फेडरेशनला प्रथम मान्यता दिली ती टिनप्लेट कंपनीनं आणि नंतर टाटांच्या पोलाद कारखान्याच्या संचालक मंडळानं. सुभाषचंद्रांच्या प्रस्थापित युनियनला नष्ट करण्यासाठी माणिक होमीचा प्याद्यासारखा उपयोग करण्यात आला. त्याची मालकांबरोबरची लढाई लुटुपुटूची होती आणि टाटा कंपनीच्या व्यवस्थापनानं प्रथम माणिक होमीच्या युनियनला मान्यता नाकारण्याचं नाटक करून कामगारांच्या डोळ्यांत धूळ टाकण्यात यश मिळवलं होतं. माणिक होमीच्या युनियनच्या सभासदांनी सुभाषचंद्रांच्या युनियनमधल्या कामगारांना रात्रीच्या वेळी गाठून बेदम मारहाण करण्यास सुरुवात केली. कामगारांमध्ये दहशत निर्माण करण्यासाठी माणिक होमीच्या हस्तकांनी जमशेटपुरात धुमाकूळ घातला. मालकांप्रमाणे सरकारनंही त्याकडे दुर्लक्ष केलं. त्यामुळे सवकलेल्या गुंडांनी दिवसाढवळ्या कामगारांवर हल्ले चढविले. सुभाषचंद्रांच्या लेबर असोसिएशनच्या कार्यालयावर भरदिवसा हल्ला करून त्याची मोडतोड, त्यातल्या सामानाची नासधूस करण्यापर्यंत माणिक होमीची मजल गेली. हे सारे प्रकार असहायपणे पाहण्याखेरीज सुभाषचंद्र काहीच करू शकले नाहीत. जुलै १९२९ मध्ये टिनप्लेट कंपनीच्या कामगारांनी संप पुकारला तेव्हा टाटांच्या पोलाद कारखान्यातील कामगारांनीही संप करून सुहानुभूती व्यक्त करावी असं जाहीर आवाहन सुभाषचंद्रांनी केलं ते या कारणामुळं.

टिनप्लेट कंपनीच्या कामगारांचा संप ऑगस्ट १९२९ मध्येही चालूच राहिला. संपामुळं होणारं नुकसान सोसूनही कंपनीच्या मालकांनी कामगारांच्या मागण्यांचा विचार करण्याचं नाकारलं. परदेशातून आयात केल्या जाणाऱ्या टिनप्लेटवर जबर जकात वसूल करण्यात येत असल्यामुळे परदेशात बनविलेल्या टिनप्लेटस् विकत घेणं इथल्या ग्राहकांच्या अवाक्याबाहेरचे असे. हिंदुस्थान सरकारनं आयात मालावर जबर कर बसवल्यामुळे इथल्या कारखान्यांना संरक्षण मिळालं होतं. त्यांचा माल विकला जात होता. इथल्या कामगारांना फार कमी वेतन देऊन मालक गबर होत होते. मात्र आपल्याला मिळणाऱ्या नफ्याचा थोडासा वाटाही वेतनवाढीच्या रूपानं कामगारांना द्यायला ते तयार नव्हते. त्यामुळं सुभाषचंद्रांनी ३ ऑगस्ट १९२९ रोजी पत्रक काढून मध्यवर्ती कायदेमंडळाच्या सदस्यांना विनंती केली. आयात टिनप्लेटवरची संरक्षक जकात रद्द करण्याचा ठराव मांडून त्यांनी तो संमत्त करून घ्यावा म्हणजे टिनप्लेट कंपनीचे संचालक ताळ्यावर येतील असं सुभाषचंद्रांचं म्हणणं होतं. संरक्षक जकात रद्द करण्याचा ठराव मध्यवर्ती कायदेमंडळाने मंजूर केला तर आपण टिनप्लेट कारखानाच बंद करू अशी धमकी बर्मा ऑईल कंपनीने दिली तेव्हा बजबज इथली तेल कामगारांची संघटना आपल्या नियंत्रणाखाली असल्याची सुभाषचंद्रांनी ऑगस्ट अखेरीस पत्रक काढून मालकांना आठवण करून दिली. त्या युनियननं संपावर जाण्याचा निर्णय घेतला तर बर्मा ऑईल कंपनीची नाकेबंदी करणं शक्य होईल असं सुभाषचंद्रांचं मत होतं. २८ नोव्हेंबर ते १ डिसेंबर १९२९ पर्यंत जवाहरलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखाली आयटकचं अधिवेशन भरलं. मुंबईतल्या गिरणी कामगार युनियनला आयटकशी संलग्न करून घेण्याच्या प्रश्नावर १ डिसेंबर या दिवशी मवाळ आणि जहाल नेत्यांमधले मतभेद विकोपाला गेले आणि फूट पडली.

सुभाषचंद्रांची १९३० सालच्या आयटकच्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून निवड झाल्यानंतर ३० नोव्हेंबरला रात्री सुभाषबाबू अमरावतीला गेले. त्यांच्या गैरहजेरीत दुसऱ्या दिवशी आयटकचे दोन तुकडे झाले. कामगार संघटनेमध्ये फूट पडली की चळवळीचं खूप नुकसान होत असल्यामुळे नियोजित अध्यक्ष या नात्यानं आयटकमधून बाहेर पडलेल्या मवाळ नेत्यांची मनधरणी करून फूट साधण्याचा सुभाषचंद्रांनी प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरला.

१९३१ च्या उत्तरार्धात बंगाल प्रांतिक काँग्रेसमधील दुफळीमुळे सुभाषचंद्र

जसे वैतागले होते तसे ते आयटक या कामगार संघटनेतील कम्युनिस्टांच्या कारवायांमुळे उद्विग्न झाले होते. ४ जुलै १९३१ रोजी कलकत्त्यात आयटकचं वार्षिक अधिवेशन सुभाषचंद्रांच्या अध्यक्षतेखाली भरलं होतं. १९२९ सालच्या अखेरीस नागपूरला जवाहरलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या आयटकच्या अधिवेशनात संघटनेत फूट पडून ती दुभंगली. ना. म. जोशी, व्ही. व्ही. गिरी यांच्यासारखे नेमस्त कामगार नेते बाहेर पडले आणि त्यांनी वेगळी चूल मांडली. या दुफळीमुळे आयटकची पिछेहाट झाली आणि ती दुबळी बनली हे सुभाषचंद्रांचं मत शं. वा. देशपांडे मास्तर, बंकिम मुखर्जी, भूपेंद्रनाथ दत्त वगैरे कम्युनिस्टांना मान्य नव्हतं. १९३० सालच्या सविनय कायदेभंगाच्या चळवळीमुळंही कामगारांच्या प्रश्नाकडे फारसं लक्ष देण्यात आलं नाही असं सुभाषबाबूंना वाटत होतं. आयटक ही कामगार संघटना मॉस्कोतल्या आंतरराष्ट्रीय कामगार संघटनेला संलग्न करावी की ॲमस्टरडॅममधल्या बिगर कम्युनिस्ट आंतरराष्ट्रीय कामगार संघटनेला जोडावी हा प्रश्न त्यांना महत्त्वाचा वाटत नव्हता. आयटकनं कोणत्याही आंतरराष्ट्रीय संघटनेला संलग्न होऊ नये, तसंच जिनेव्हा इथं भरणाऱ्या आंतरराष्ट्रीय मजूर परिषदेला प्रतिनिधी पाठवल्यानं काही निष्पन्न होईल अशी आशा धरू नये असं त्यांचं म्हणणं होतं. दरवर्षी त्या त्या वेळच्या परिस्थितीनुसार प्रतिनिधी पाठवण्याच्या या प्रश्नाबद्दल विचार करावा असं त्यांनी सुचवलं. सर्व कामगार संघटनांनी आयटकमध्ये सामील व्हावं. मग ती कोणत्याही पक्षाच्या हाती जावो अशी त्यांची भूमिका होती. १९३० सालच्या सत्याग्रह आंदोलनात कामगार वर्गाच्या आयटक या संघटनेनं भाग घेतला नसला तरी पुन्हा सविनय कायदेभंग सुरू झाला तर त्यात भाग घ्यावा, असं आवाहन त्यांनी अध्यक्षीय भाषणात केलं.

व्हिटले आयोगाचा अहवाल प्रकाशित झाला होता. त्या अहवालानं कामगार संघटनेत किमान दोन-तृतीयांश पदाधिकारी हे प्रत्यक्षतः त्या उद्योगधंद्यात काम करणारे असावेत असं सुचवलं होतं. कारखान्यांचे मालक कामगार संघटनेचे पदाधिकारी म्हणून काम करणाऱ्यांवर डूक धरून आकसाने त्यांना जिणं नकोसं करतात असा सार्वत्रिक अनुभव हिंदुस्थानात येत असल्यामुळं कारखान्याबाहेरच्या आणि कामगार नसलेल्या नेत्यांवर कामगारांना अवलंबून राहावं लागतं असा सुभाषचंद्रांनी खुलासा केला. १९२९ च्या अखेरपासून जागतिक मंदीचा जोरदार तडाखा हिंदुस्थानलाही बसला होता.

किमती कोसळल्या होत्या. उत्पादन केलेल्या मालाचा उठाव होत नव्हता. कारखानदारांनी कामगा , वेतनकपातीचं धोरण अवलंबलं होतं, बेकारी वाढत होती. या महत्त्वा प्रश्नांची सोडवणूक करण्याची जबाबदारी आयोगानं सर्वस्वी राज्यकर्त्यांवर टाकली हे सुभाषचंद्रांना आक्षेपार्ह वाटत होतं. कामगार चळवळीत एका बाजूला सुधारणावादी उजवा गट होता तर दुसऱ्या बाजूला क्रांती घडवून आणू पाहणारे कम्युनिस्ट होते. आपण या दोन्ही टोकांच्या मधोमध असलेल्या समाजवाद्यांच्या गटात आहोत असं कबूल केलं आणि हिंदुस्थाननं भारतीय प्रकारचा आणि भारतीय पद्धतींचा अवलंब करून समाजवादी व्यवस्था निर्माण करावी असं त्यांनी मत व्यक्त केलं. आयटकच्या नागपूर अधिवेशनात नेहरू-सुभाषचंद्रांच्या समाजवादी गटानं अनेक ठरावांच्या बाबतीत मत देताना कम्युनिस्टांना पाठिंबा दिला. त्या अधिवेशनात आयटकचं सबंध सचिवालयच ताब्यात घेण्याचा कम्युनिस्टांनी प्रयत्न केला. पण अखेर नाइलाजानं सुभाषचंद्रांना कलकत्ता अधिवेशनाचं अध्यक्षपद देऊन पेचप्रसंग तात्पुरता टाळला. मॉस्कोतील स्टॅलिनच्या तालावर इथं नाचणाऱ्या मुंबईच्या कम्युनिस्टांनी आयटकमध्ये राहून कॉंग्रेस पक्षाची निंदा करण्याची मोहीम वर्षभर चालवली. आयटकचे चिटणीस असलेले देशपांडे मास्तर अध्यक्ष सुभाषचंद्र आणि खजिनदार जिनवाला यांच्या पत्रांना उत्तरंही पाठवीत नसत. देशपांडे मास्तर, बंकिम मुखर्जी, भूपेन दत्त वगैरेंनी गुंडांना अधिवेशनात आणून हुल्लड माजवली. कामकाजात सतत व्यत्यय आल्यामुळे ५ जुलै १९३१ रोजी अध्यक्ष सुभाषचंद्रांना कार्यकारिणीची बैठक आणि खुल्या अधिवेशनाचं कामकाज तहकूब करावं लागलं. ६ जुलैस कलकत्त्याच्या टाऊन हॉलमध्ये कार्यकारिणीची बैठक भरली आणि खुल्या अधिवेशनाचं कामकाज सुरू झालं तेव्हा देशपांडे मास्तरांचा सबंध गट गैरहजर राहिला. आयटकमधून फुटून बाहेर पडल्यासारखं देशपांडे गटाचं वागणं होतं. मॉस्कोशी एकनिष्ठ असलेले कम्युनिस्ट म्हणजे इथल्या कामगार चळवळीवर ओढवलेलं संकट आहे असं ११ सप्टेंबर १९३१ रोजी काढलेल्या पत्रकात सुभाषचंद्रांनी स्पष्ट शब्दात मत दिलं. सुभाषबाबूंना संताप आला तो सेनगुप्तांच्या गटानं कॉंग्रेस पक्षाशी आणि गांधीजींशी उभा दावा असल्यासारखं वागणाऱ्या देशपांडे मास्तरांच्या गटाला पाठिंबा दिल्यामुळं. 'कॉंग्रेस मुर्दाबाद', 'गांधी मुर्दाबाद' असं कम्युनिस्टांच्या सुरात सूर मिसळून म्हणण्यास आपण तयार नाही, आपण सदैव कॉंग्रेसमध्येच राहू आणि मॉस्कोचे

आदेश जुमानणार नाही असं सुभाषचंद्रांनी या पत्रकातच नमूद केलं होतं.

कराची काँग्रेसनंतर महात्मा गांधींनी केलेली वक्तव्यंही सुभाषचंद्रांना आवडली नव्हती. कराचीचं अधिवेशन संपल्यानंतर गोलमेज परिषदेच्या दुसऱ्या सत्रात सहभागी होण्यासाठी विलायतेला जाण्यापूर्वी हिंदूमुसलमानांमध्ये समझोता घडवून आणण्याची भाषा ते खासगीरीत्या तसंच जाहीररीत्या करू लागले. हा समझोता घडून येण्यावरच आपला गोलमेज परिषदेतला सहभाग अवलंबून असल्याचंही गांधीजी सांगू लागले. त्यामुळे राष्ट्रीय मुसलमानांची अडचण होणार आणि कडव्या जातीयवादी मुसलमानांकडून केली जाणार असं सुभाषचंद्रांना वाटू लागलं. त्यांचा हा तर्क बरोबर ठरला. १९३१ च्या एप्रिलमध्ये गांधीजी दिल्लीत कडव्या जातीयवादी मुसलमानांना भेटले. तेव्हा सुभाषचंद्र दिल्लीतच होते. जातीयवादी मुसलमानांनी जिनांनी केलेल्या चौदा मागण्या गांधींनी स्विकाराव्या असा आग्रह धरला. त्या मागण्या मान्य करायला गांधीजी तयार नव्हते. मुस्लिम नेत्यांबरोबरची बोलणी संपल्यानंतर महात्माजी निराश झाल्यासारखे दिसले. राष्ट्रीय वृत्तीच्या हिंदूंनी राष्ट्रीय मुसलमानांबरोबर करार करावा आणि जातीयवाद्यांची मनधरणी करण्याच्या नादाला न लागता तोच करार गांधीजींनी गोलमेज परिषदेला सादर करावा असं सुभाषबाबूंनी गांधीजींची भेट घेऊन त्यांना सुचवलं. या वेळी झालेल्या चर्चेत गांधीजींनी विभक्त मतदारसंघाबाबत सुभाषचंद्रांचं मत अजमावलं तेव्हा विभक्त मतदारसंघांच्या आधारावर स्वराज्य जरी मिळालं तरी ते आपल्याला नको असं त्यांनी महात्माजींना सांगितलं. त्या दोघांचं हे बोलणं चालू असताना डॉ. अन्सारी आणि तसदुक शेरवाणी हे दोघे राष्ट्रीय मुसलमान तिथे आले आणि त्यांनीही विभक्त मतदारसंघांना आपलाही प्रखर विरोध असल्याचं सांगितलं. त्यानंतर विभक्त मतदारसंघांसकट कडव्या जातीयवादी मुसलमानांनी केलेल्या मागण्या आपल्याला मान्य करता येणार नाहीत असं महात्माजींनी जाहीर निवेदन केलं. १७ एप्रिलला आयर्विनऐवजी लॉर्ड विलिंग्डननं व्हाइसराय म्हणून काम सुरू केलं.

९ ते ११ जून १९३१ पर्यंत मुंबईत काँग्रेस कार्यकारिणीची सभा झाली. हिंदू-मुसलमानांमध्ये समझोता होवो वा न होवो, महात्मा गांधींनी गोलमेज परिषदेत सहभागी होऊन काँग्रेसचं प्रतिनिधित्व करावं असा कार्यकारिणीनं ठराव केला. २० जुलै १९३१ ला काँग्रेस कार्यकारिणीने अल्पसंख्यांकांसाठी

हिंदुस्थानच्या राज्यघटनेत संरक्षक तरतुदी केल्या जातील असं अभिवचन दिलं. विविध धर्मांच्या लोकांसाठी वेगळे व्यक्तिगत कायदे राहतील, संयुक्त मतदारसंघाच्या आधारावर स्वतंत्र हिंदुस्थानात निवडणुका घेतल्या जातील, सिंध मुंबई प्रांतातून अलग केला जाऊन त्याचा वेगळा प्रांत बनवला जाईल, हिंदू, मुसलमान किंवा शीख यांची संख्या जिथं जिथं २५ टक्क्याहून कमी असेल तिथं कायदेमंडळात त्यांच्यासाठी राखीव जागा असतील वगैरे तरतुदी करण्याची काँग्रेस कार्यकारिणीनं तयारी दर्शविली. व्हाइसरॉय विलिंग्डननं गांधी-आयर्विन करार मोडण्यास सुरुवात केली. कराराबद्दल मतभेद झाल्यास तंटा लवादाकडं सोपवावा ही गांधींची सूचनाही धुडकावली. करार पाळण्यास सरकार तयार नव्हतं हे उघड झाल्यावर महात्मा गांधींनी विलिंग्डनला ११ ऑगस्टला तार पाठवून आपण इंग्लंडला जाण्याचा बेत रद्द केल्याचं कळवलं. १३ ऑगस्टला काँग्रेस कार्यकारिणीनेही ठराव करून गांधीजींचा निर्णय उचलून धरला. या निर्णयाचं आणखीही एक कारण होतं. डॉ. अन्सारींनाही काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून निमंत्रित केलं जाईल हे आयर्विननं आधी दिलेलं आश्वासन आपल्यावर बंधनकारक नाही असं विलिंग्डन म्हणू लागला. काँग्रेस गोलमेज परिषदेवर बहिष्कार घालणार असं ऐकून सुभाषचंद्रांना आनंद झाला आणि त्यांनी १५ ऑगस्ट १९३१ ला पत्रक काढून तो व्यक्त केलाही. सुरत जिल्ह्यातल्या खेडेगावात शेतकऱ्यांकडून जबरदस्तीनं सारा वसूल करण्यात येत असल्याच्या तक्रारींची चौकशी करण्याचं आश्वासन व्हाइसरायनं दिलं. तेवढ्यावर समाधान मानून गांधीजी २९ ऑगस्टला विलायतेस जाण्यासाठी काँग्रेसचे एकटेच प्रतिनिधी म्हणून बोटीवर चढले. हा गांधीजींचा विजय नसून सरकारचा विजय होता असं सुभाषचंद्रांना वाटल्याशिवाय राहिलं नाही.

● ●

(डॉ. य. दि. फडके यांच्या 'कहाणी सुभाषचंद्रांची' या ग्रंथातील ५५ व ६४ अशी दोन प्रकरणे एकत्रित पुनर्मुद्रित. लेखकाच्या अनुज्ञेने. - संपादक)

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

# उत्कट अनुभवाचा उदात्त आविष्कार

**वि. स. वाळिंबे**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या सुवर्णमहोत्सवी वर्षामध्ये सुभाषचंद्र बोस यांची जन्मशताब्दी यावी हा एक अर्थपूर्ण योग म्हटला पाहिजे.

आपली मातृभूमी बलदंड ब्रिटिश सत्तेच्या पाशातून मुक्त व्हावी यासाठी जवळजवळ शतकभर असंख्य देशवीर निधडी झुंज घेत होते. परवशतेची इमारत एका आघाताने हतबल होऊन जाणार नाही याची कल्पना असून प्रत्येकजण सर्वस्व पणाला लावून लढत राहिले म्हणून हे सारेच स्वातंत्र्यवीर तितकेच आदरणीय, तेवढेच वंदनीय.

असे असले तरी, आपण यापुढे इथे राहू शकत नाही अशी ब्रिटिश राज्यकर्त्यांची खात्री पटविली तो सुभाषचंद्र बोस यांच्या आझाद हिंद सेनेने.

तोच परसत्तेच्या मर्मावरचा प्रखर आणि परिणामकारक प्रहार ठरला.

म्हणून १५ ऑगस्ट १९४७ च्या स्वातंत्र्यावर अधिक अधिकार पोहोचतो तो सुभाषचंद्र बोस यांचाच.

हे ऐतिहासिक वास्तव नाकारण्याचा करंटेपणा कोणी करू नये. परंतु दुर्दैवाने तसे घडले नाही.

स्वातंत्र्याच्या या शिल्पकाराची स्मृती जेवढी पुसट होत जाईल तेवढे बरे, असा स्वतंत्र भारताच्या सूत्रधारांनी आपल्या परीने आटोकाट प्रयत्न केले.

अर्थात या अशा कुत्सित खटाटोपांमुळे जनमानसामधल्या सुभाषबाबूंच्या अनन्यसाधारण स्थानाला ढळ पोहोचू शकली नाही, ही गोष्ट वेगळी.

परंतु त्यामुळे विश्वबंधुत्वाची भाषा बोलणाऱ्यांचे क्षुद्र अंतरंग लपून राहिले नाही. हेही तितकेच खरे.

सुभाषबाबूंचे सारे जीवन म्हणजे रोमांचक घटनांची अखंड मालिका कल्पितानेही थक्क होऊन जावे अशी.

जानकीनाथ बोस हे कटकमधले एक प्रमुख विधिविशारद. शिवाय, सार्वजनिक कार्याची आवड. त्यामुळे जानकीबाबूंना गावात मोठा मान होता. तिथले पद त्यांनी अनेक वर्षे भूषविले होते. इतकेच नव्हे, तर ओरिसा तेव्हा बंगाल इलाख्याचा भाग असल्यामुळे सरकारने त्यांची बंगाल विधिमंडळावर नियुक्तीही केली होती.

अशा या प्रतिष्ठित कुटुंबात सुभाषबाबूंचा जन्म झाला. २३ जानेवारी १८९७ या दिवशी.

ते वर्ष ब्रिटिश साम्राज्यसत्तेच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे तसेच अभिमानाचेही. महाराणी व्हिक्टोरिया हिच्या राज्यारोहणास त्यावर्षी साठ वर्षे पूर्ण होत असल्यामुळे त्या घटनेचा हीरकमहोत्सव सर्वत्र थाटात साजरा होत होता.

ब्रिटिश साम्राज्याने आपल्या कर्तृत्वाचे शिखर गाठले ते व्हिक्टोरियाच्या कारकीर्दीत. त्यामुळे या महाराणीसंबंधी तिच्या प्रजाजनांना अतीव आदर वाटायचा. तो प्रकट व्हायची संधी हीरक महोत्सवाने मिळवून दिली.

सूर्य कधीही मावळत नाही असा ब्रिटिश साम्राज्याने लौकिक संपादन केला, तो याच काळात.

म्हणून तर, लॉर्ड कर्झन यांच्यासाठी स्वतःला शहाणी आणि श्रेष्ठ समजणारी माणसे ग्वाही देऊ लागली, 'हा सूर्य किमान पाचशे वर्षे तरी अस्ताला जाणार नाही हे नक्की.'

अवघ्या पन्नास वर्षात तसे घडून आले.

त्या अर्थाने सुभाषबाबूंचे जीवन म्हणजे एका शक्तिकेंद्राची वैभवापासून विलयापर्यंतची वाटचाल ठरली.

सुभाषबाबू लहानाचे मोठे झाले ते, हे वैभव निरखीतच. ते स्वातंत्र्य लढ्यामध्ये सक्रीय सहभागी झाले ते नंतर. शाळकरी वयात त्यांना निराळ्याच विवंचनेने व्यग्र करून टाकले होते. आपल्याला लाभलेल्या मनुष्यजन्माचे प्रयोजन काय?

वास्तविक हा आयुष्याच्या संध्याकाळी सतावणारा प्रश्न. सुभाषबाबूंना तो बालपणातच छळू लागला.

जानकीनाथ सचिन्त झाले. संध्याकाळी मैदानावर जाऊन समवयस्कां-समवेत फुटबॉल खेळण्याच्या वयात आपला हा मुलगा नको तेवढा गंभीर होत असल्याचे जाणवू लागले. तसे ते प्रभावतीदेवींपाशी बोलून दाखवीत.

ती माऊलीही कष्टी होऊन जाई. आपली इतर मुले तर तशी नाहीत. एवढे समाधान प्रभावतीदेवींना पुरेसे ठरे. बारा वर्षांच्या सुभाषला पहिला मोठा माणूस भेटला तो त्याच्या रॅवेनशॉ कॉलेजिएट स्कूलचे मुख्याध्यापक वेणीमाधव दास यांच्या रूपाने.

वेणीमाधवबाबूंनी आपल्या या विद्यार्थ्याला एवढे प्रभावित केले होते की सुभाषने आपल्या मनाशी पक्के केले - पुढे अध्यापकच व्हायचे, वेणीमाधवबाबूंसारखे.

परंतु लवकरच वेणीमाधवबाबूंची दुसऱ्या शाळेत बदली झाली आणि सुभाषला पुन्हा एकटेपण जाणवू लागले.

एवढ्यात, बोस कुटुंबाचे एक आप्त कटकमध्ये राहायला आले. सुभाष अधूनमधून त्यांच्याकडे जाऊ लागला. कारण त्यांच्या घरी पुस्तके खूप होती. सुभाषला आवडणाऱ्या विषयांवरची. तिथेच त्यास 'स्वामी विवेकानंद' हा ग्रंथसंच वाचायला मिळाला आणि मॅट्रिक व्हायच्या आतच जानकीबाबूंच्या या चिंतनशील मुलाला जीवनहेतू समजला.

'आत्मनो मोक्षार्थं जगद्धिताय च!'

महाविद्यालयात शिक्षणासाठी सुभाष कलकत्त्याला गेला तो याच मंत्राचे आपल्या मनाशी पठण करीत.

तिथे त्याला कोणी तरी सांगितले, 'आध्यात्मिक आशय गुरुकृपेशिवाय अवगत होत नाही.'

झाले, एके दिवशी सुभाषने घरातल्या कोणालाही न कळविता, हेमंतकुमार सरकार या मित्रासमवेत घर सोडले. दोन महिने त्यांची ही अशी भ्रमंती सुरू होती. कितीतरी तीर्थक्षेत्रे त्याने पालथी घातली. अनेक साधुबैराग्यांशी बोलणे केले. परंतु, मनातल्या शंकांचे निरसन करणारा आणि साक्षात्काराची वाट दाखविणारा एकही गुरू भेटला नाही.

सुभाष घरी परतला - काहीसा निराश होऊनच.

काही दिवसांच्या आत त्याच्यावर निराळीच आपत्ती कोसळली. अगदी अनपेक्षित रीतीने.

ओसॅटन या इंग्रज प्राध्यापकांच्या संतापी वर्तनाचा निषेध करण्यासाठी प्रेसिडेंन्सी कॉलेजमधल्या विद्यार्थ्यांनी हरताळ पुकारला. विद्यार्थी संघटनेचा कार्यवाही होता सुभाष. म्हणून प्राचार्यांनी त्याला बोलावून घेऊन सांगितले, "हा संप ताबडतोब मागे घेतला गेला पाहिजे."

"तत्पूर्वी संबंधित प्राध्यापकांनी दिलगिरी व्यक्त करायला हवी."

"तसे होणार नाही."

"मग संपही चालूच राहील."

प्राचार्यांनी सुभाषला महाविद्यालयातून काढून टाकले.

पुढे काय?

काहीच नाही.

पदवी मिळविल्याशिवाय अध्यापकाची नोकरी देणार तरी कोण?

सगळाच अंधार.

सुभाष कटकला गेला आणि त्याने वडिलांना विनंती केली - "मला कलकत्त्यामधल्या दुसऱ्या कोणत्याही महाविद्यालयामध्ये प्रवेश मिळू शकणार नसल्यामुळे पुढच्या शिक्षणासाठी इंग्लंडला पाठवा."

"ते जमणार नाही. त्यासाठी अगोदर इथे पदवीधर व्हायला हवे."

कलकत्याच्या स्कॉटिश मिशन कॉलेजमध्ये सुभाषला प्रवेश मिळाला आणि तो बी. ए. झाला. तत्त्वज्ञान हा आवडता विषय घेऊन.

तो एम. ए. चा अभ्यास करू लागला - प्राध्यापक होता यावे म्हणून.

एके दिवशी जानकीबाबू कटकहून आले आणि विचारू लागले, "सुभाष, तू मागे इंग्लंडला जायचे म्हणत होतास. तेव्हा मी 'नाही' म्हटले होते. पण आता पाठवायला तयार आहे. तिथल्या विद्यापीठाची तू पदवी संपादन करावी, असे मला वाटते."

सुभाष आनंदून गेला. पण तो आनंद फार काळ टिकू शकला नाही. कारण जानकीबाबू सांगत होते, "तिथे बी. ए. चा अभ्यास करीत असतानाच तू आय. सी. एस. च्या परीक्षेला बसले पाहिजे. तशी माझी अटच आहे."

काय करावे! कारण त्याने आपल्या मित्रांसमवेत 'नव-विवेकानंद समाज' स्थापन केला होता. सारे आयुष्य समाजकार्यात व्यतीत करायचे असे ठरवले होते, परकीय सरकारची चाकरी करायची नाही, अशी शपथ घेतली होती.

आय. सी. एस. होणे म्हणजे प्रतिज्ञेशी प्रतारणा. ते पातक आपल्या हातून

कधीच घडता कामा नये. पण आपण ती अवघड परीक्षा उत्तीर्ण होऊ, अशी तरी काय खात्री ?

सुभाषने वडिलांना 'हो' म्हटले आणि तो इंग्लंडला जाऊन केंब्रिज विद्यापीठामध्ये पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास करू लागला.

ती परीक्षा दोन वर्षांनी होती, तर आय. सी. एस. ची आठ महिन्यांवर आलेली. म्हणून सुभाषने तिकडे लक्ष केंद्रित केले. वडिलांना दिलेल्या शब्दाप्रमाणे सुभाष आय. सी. एस.च्या परीक्षेला बसला - आपण बहुधा अनुत्तीर्ण होऊ, अशी मनाची समजूत घालत.

जे नको होते तेच नेमके घडले.

सुभाष ती परीक्षा उत्तीर्ण झाला, इतकेच नव्हे, तर सगळ्या विद्यार्थ्यांमध्ये त्याचा चौथा क्रमांक आला. सुभाषने वडिलांना कळविले, "मी आय. सी. एस. ची परीक्षा उत्तीर्ण झालो असलो तरी सनद स्वीकारणार नाही."

जानकीबाबूंनी आपल्या या मनस्वी मुलाला परोपरीने विनविले, 'असा वेडेपणा करू नकोस.'

सुभाषने वडिलांचे ऐकले नाही. लंडनमधल्या इंग्रज अधिकाऱ्यांनी धमकी दिली, 'तू जर सनद स्वीकारली नाहीस तर आमचे सरकार हा अपमान सहन करणार नाही. ते तुला चिरडून टाकतील.'

'मनासारखे जगता येणार नसेल तर मी नष्ट होऊन जाणे पसंत करीन.'

इतके टोकाचे उद्‌गार तो इंग्रज अधिकारी प्रथमच ऐकत होता. तो स्वतःशी उद्‌गारला, 'बोलणारे खूप असतात. करणारा एखादाच.'

सुभाषबाबू १६ जुलै १९२१ या दिवशी मायभूमीस परतले - गांधीजींनी प्रवर्तित केलेल्या असहकारितेच्या आंदोलनामध्ये सहभागी होण्यासाठी.

या उपक्रमाची आवश्यकता त्यांना मान्य होती, मात्र त्याच्या परिणामकारकतेसंबंधी संदेह होता.

तोच त्यांनी गांधीजींपाशी बोलून दाखविला. गांधीजींना ही चिकित्सक विचारणा आवडली नाही.

पहिल्या भेटीतच सुभाषबाबूंनी गांधीजींची नाराजी संपादन केली आणि ती शेवटपर्यंत तशीच कायम राहिली.

लंडनमधल्या इंग्रज अधिकाऱ्याचा रोष ओढवून घेणे वेगळे आणि इथे गांधीजींच्या प्रतिपादनासंबंधीची मतभिन्नता व्यक्त करणे वेगळे.

गांधीजी म्हणजे कॉंग्रेस आणि कॉंग्रेस म्हणजे संपूर्ण हिंदुस्थान अशा सर्वमान्य समीकरणाचा तो काळ होता.

आपण आपले मतभेद मवाळ केले नाहीत तर सार्वजनिक जीवनातून उठायची वेळ येईल, हा धोका सुभाषबाबूंना ठाऊक नव्हता, असे नाही.

परंतु गांधीजी जेवढे आपल्या अंतरात्म्यास प्रमाण मानत होते तेवढेच सुभाषबाबूही आपल्या विवेकबुद्धीला.

असा व्यक्तिविशेष एखादाच.

बाकीची सारी प्रभावळ 'हो' ला 'हो' म्हणायची - 'नाही' म्हणायचे मनात असूनही.

आय. सी. एस. च्या परीक्षेचा अभ्यास करीत असताना सुभाषबाबूंनी आधुनिक युरोपचा इतिहास बारकाईने वाचला होता. ते विशेष प्रभावित झाले, इटलीचा स्वातंत्र्यवीर जोसेफ मॅझिनी याच्या तेजस्वी विचारांनी. आपली पितृभूमी परवशतेतून मुक्त करण्यासाठी मॅझिनीने केलेल्या पराकाष्ठेच्या प्रयत्नांप्रमाणे आपणही हिंदुस्थान स्वतंत्र करण्याकरिता असेच झुंजले-लढले पाहिजे ही इंग्लंडमधल्या वास्तव्यात सुभाषबाबूंना आलेली जाण.

त्यामुळेच गांधीजींच्या आंदोलनासंबंधी सुभाषबाबूंना काही शंका उपस्थित कराव्याशा वाटल्या.

एखाद्या संघर्षाला प्रारंभ करण्यासाठी असहकार आवश्यक आणि उपयुक्त ठरत असला तरी निर्णायक विजय संपादन करायला शस्त्रबळाची निर्विवाद आवश्यकता आहे याबद्दल त्यांना खात्रीच होती.

अर्थात गांधीजी करीत असलेल्या कार्याची महती ओळखण्याइतकी प्रगल्भता सुभाषबाबूंना लाभली होती.

म्हणून त्या असहकारितेच्या आंदोलनासंबंधी त्यांनी प्रकट रीतीने मतभिन्नता व्यक्त केली त्याचे मूल्यमापन करताना सुभाषबाबू उद्गारले, 'जे कार्य व्हायला दुसऱ्या एखाद्या व्यक्तीला शंभर वर्षे लागली असती ते गांधीजींनी अवघ्या दहा वर्षात करून दाखविले. हा चमत्कारच म्हटला पाहिजे.'

त्याचबरोबर, आपण वसाहतींच्या स्वराज्यावर समाधान मानू ही गांधीजींची भूमिका सुभाषबाबूंना मान्य नव्हती.

इंग्लंडसोबतचे सगळे संबंध तोडणे गांधीजींच्या विचाराशी विसंगत ठरत होते.

सुभाषबाबू होते, संपूर्ण स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते. म्हणून ते म्हणू लागले, ''संपूर्ण स्वातंत्र्य वा संपूर्ण पारतंत्र्य अशा दोनच अवस्था संभवतात. अर्धवट स्वायत्ततेला काहीच अर्थ प्राप्त होत नाही.''

आपल्या या संपूर्ण स्वातंत्र्यवादी भूमिकेचा प्रचार करण्यासाठी सुभाषबाबूंनी 'इंडिपेंडन्स लीग'च्या प्रस्थापनेमध्ये पुढाकार घेतला. यावेळी त्यांचे सहकारी होते, पंडित जवाहरलाल नेहरू.

जवाहर-सुभाष युतीने आपल्या विचारांचा आग्रही पुरस्कार आरंभिताच तरुणवर्ग तिच्याकडे आकृष्ट होऊ लागला.

यातला धोका जाणून घेण्याइतके गांधीजी जागरूक होते. काँग्रेसचे नेतृत्व दुसऱ्या कोणाकडे जावे हे त्यांना सहन होण्यासारखे नव्हते. अशा वेळी राजकारणी माणूस जो मार्ग स्वीकारतो तोच गांधीजींनी अंगिकारिला. जवाहरलालला सुभाषपासून अलग पाडायचे हा.

त्यासाठी गांधीजींनी १९२९ च्या डिसेंबरमध्ये लाहोर इथे भरलेल्या काँग्रेस अधिवेशनाचे अध्यक्षपद नेहरूंना मिळेल अशी तजवीज केली.

या उपायाचे लगेच प्रत्यंतर दिसून आले. नेहरू सुभाषबाबूंपासून दूर गेले.

'इंडिपेंडन्स लीग'चा उरला सुरला प्रभाव ओसरावा म्हणून गांधीजींनी लाहोर इथल्या अधिवेशनात संपूर्ण स्वातंत्र्याच्या मागणीचा पुकारा केला.

गांधीजींनी आपल्या आजवरच्या भूमिकेत, बदलत्या परिस्थितीचा अंदाज घेऊन, बदल घडवून आणलां.

१९३० साली त्यांनी असहकाराचे दुसरे आंदोलन प्रवर्तित केले आणि त्या चळवळीने जोर पकडलेला असतानाच मागच्या वेळेप्रमाणे याही वेळी गांधीजींनी ते आंदोलन मागे घेतले - पुन्हा एकदा कोणाशीही यासंबंधी विचारविनमय न करता.

गांधीजींनी जनजागृती फार मोठ्या प्रमाणावर घडवून आणली असली तरी त्या जनशक्तीचा ते स्वातंत्र्यसंपादनासाठी उपयोग करून घेत नाहीत, हे दिसून आल्यावर सुभाषबाबूंनी आपले मत परखड शब्दांत व्यक्त केले.

'गांधीजी ही आता भारतीय राजकारणात अडचण ठरू पाहात आहे. गांधीजींचे जनमानसातील अनन्यसाधारण स्थान सुभाषबाबूंना ठाऊक नव्हते असे नाही.

परंतु, एखादा माणूस कितीही मोठा असला तरी त्याला काही अंगभूत

मर्यादा असतात आणि त्या ओलांडणे त्याला जमू शकत नाही, याचीही सुभाषबाबूंना कल्पना होती.

गांधीजींनी स्वातंत्र्याची चळवळ एका विशिष्ट टप्प्यावर आणून ठेवली. यासंबंधीचे त्यांचे ऋण मान्य करीत असताना, पुढचा टप्पा गाठण्यासाठी दुसऱ्या कोणीतरी पुढे येणे आवश्यक आहे, या जाणिवेतूनच सुभाषबाबूंनी गांधीजींच्या मर्यादा सांगायला सुरुवात केली.

हे गांधी-समर्थकांना मानवण्यासारखे नव्हते. त्यामुळे, सुभाषबाबू काँग्रेस संघटनेमध्ये एकाकी पडतील, अशी पाऊले पडू लागली.

सुभाषबाबूंना मध्यंतरी मंडालेच्या कारागृहात दोन-अडीच वर्षे काढावी लागली होती. तिथल्या रोगट हवामानामुळे त्यांच्या शरीरप्रकृतीवर अनिष्ट परिणाम दिसून येऊ लागला. मुख्य म्हणजे त्यांची पचनशक्तीच मंदावली.

या आजारातून आपण आता वाचत नाही, असे सुभाषबाबूंना वाटू लागले आणि तसे त्यांनी आपल्या थोरल्या बंधूंना कळवले.

सुभाषचंद्र बोस यांच्यासारखा झुंजार देशवीर असल्या मरण अवस्थेमध्ये मंडाले इथे दिवस व्यतीत करीत आहे ही बातमी कळताच, त्यांची सुटका करण्याच्या मागणीने जोर पकडला.

सुभाषबाबूंना कारावासात मृत्यू आला तर लोकमत संतप्त होईल, याची कल्पना आल्यामुळे सरकारने त्यांची सुटका करायची तयारी दर्शविली. मात्र सरकारने अट घातली - सुभाषबाबूंनी हिंदुस्थानात न परतता अन्य कोठेतरी औषधोपचारासाठी गेले पाहिजे.

सुभाषबाबूंनी ती मान्य केली नाही. ते उद्‌गारले, "सुटकेसाठी असा लाचार सौदा करणे माझ्या प्रकृतीशी विसंगत आहे." सरकारही हट्टाला पेटले.

काँग्रेस नेत्यांपैकी सरकारचा राग होता तो एकट्या सुभाषबाबूंवर. कारण ते केवळ विचारानेच नव्हे, तर कृतीनेही क्रांतिकारक आहेत, हे सरकारला ठाऊक होते.

म्हणून तर सरकारने त्यांना हिंदुस्थानातल्या कोणत्याही तुरुंगात न ठेवता, थेट मंडालेला बंदिस्त करून ठेवले होते.

सुभाषबाबूंची प्रकृती आणखीच ढासळली. केव्हाही देहांत घडून येईल अशी शक्यता वाटावी इतकी.

म्हणून सरकारने सुभाषबाबूंची मुक्तता केली. मंडालेला गेलेले सुभाषबाबू

मंडालेहून परतले तेव्हा, परिचितांनाही ओळखू न येण्याइतके क्षीणबल होऊन गेले होते.

मित्रांनी सल्ला दिला, "युरोपमध्ये काही ठिकाणी औषधी पाण्याचे झरे आहेत. तिथे उपचार केले तर ढासळलेल्या प्रकृतीला उतार मिळू शकेल."

म्हणून सुभाषबाबू व्हिएन्ना इथे राहायला गेले. प्रकृती थोडीशी सुधारताच ते भोवतालच्या देशांना भेटी देऊ लागले. हेतू एकच की, त्यांच्यापैकी कोणाची हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यप्रयत्नांना मदत होऊ शकेल. याचा अंदाज घ्यायचा.

सुभाषबाबूंनी या दौऱ्यांमध्ये अनेक राजकीय पुढाऱ्यांशी बोलणी करून आपले मनोगत त्यांना सांगितले. त्यांचे जाणून घेतले.

जर्मनीमध्ये हिटलर नुकताच सत्तेवर आला होता. पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर विजेत्या राष्ट्रांनी जर्मनीवर लादलेल्या अपमानकारक अटी आपण अल्पावधीत उधळून लावणार आहोत, असे हिटलरने सत्ताग्रहण करताच सांगून टाकले.

याचा अर्थ स्पष्ट होता - पुन्हा एकदा युरोपमध्ये रणसंघर्ष उफाळून येणार - जर्मनीची मित्रराष्ट्रे आणि शत्रुराष्ट्रे यांच्यात.

इंग्लंड हे अर्थातच जर्मनीचे शत्रुराष्ट्र.

त्यामुळे इंग्लंडच्या विरोधात जे देश उभे ठाकतील त्यांच्याकडून आपल्याला सहाय्य मिळण्याचा संभव अधिक, हे सुभाषबाबूंनी ओळखले.

त्यादृष्टीने त्यांनी आपल्या आंतरराष्ट्रीय संबंधांची आखणी-जुळणी आरंभली.

इंग्लंडसारख्या महासत्तेशी यशस्वी मुकाबला करायचा असेल तर तो केवळ हिंदुस्थानला जमणार नाही, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य-प्रयत्नांना काही स्वतंत्र आणि समर्थ देशांची मदत मिळणे आवश्यक आहे, याचीही सुभाषबाबूंना जाणीव होती.

सुभाषबाबू स्वातंत्र्याचे स्वप्न पहात होते - पण वास्तवावर घट्ट पाय रोवून. ज्यांना काही करायचे नव्हते त्यांनी आपल्या निष्क्रीयतेच्या समर्थनार्थ गोंडस शब्दांची आतषबाजी करावी, हे स्वाभाविकच होते.

इंग्लंड आणि जर्मनी हे दोघेही परस्परांशी लढणार होते. ते आपापले राष्ट्रीय हितसंबंध सुरक्षित राहावे व बळकट व्हावेत म्हणून.

त्यात मूल्यांचा वा सिद्धांतांचा काहीच संबंध नव्हता. परंतु आपण त्या

संघर्षाचे लोकशाही विरुद्ध हुकूमशाही असे वर्णन केले की इंग्लंडच्या बाजूने सहानुभूती व्यक्त करायला आणि महायुद्धाची सांगता घडून येईपर्यंत स्वस्थ बसायला मोकळे झालो, असा सोयीस्कर विचार इतर नेत्यांच्या प्रवृत्तीला मानवणारा होता.

आधीच त्यांचा, स्पष्टवक्तेपणामुळे सुभाषबाबूंवर राग. त्यात त्यांची बदनामी करायची ही आयती संधी चालून आलेली.

सुभाषबाबूंनी या अशा निष्क्रीय निषेधाची फिकीर न बाळगता, आपल्या आंतरराष्ट्रीय संबंधावर भर देण्यात युरोपमधले वास्तव्य व्यतीत केले.

गांधीजींना या प्रयत्नांची उपेक्षा करून चालण्यासारखे नव्हते. म्हणून जेव्हा त्यांचे समर्थक सुभाषबाबूंच्या विरोधात बोलू लागले त्या काळातच गांधीजींनी काँग्रेसचे अध्यक्षपद सुभाषबाबूंकडे सोपवायचे ठरविले.

काँग्रेसच्या अध्यक्षाला त्यावेळी ' राष्ट्रपती ' या बिरुदाने संबोधिले जाई.

एकदा का आपण हा सर्वोच्च सन्मान सुभाषबाबूंना दिला की ते, काही प्रमाणात तरी मवाळ होतील, असा गांधीजींनी आपल्या मनाशी आडाखा बांधला आणि व्हिएन्ना इथे राहत असलेल्या सुभाषबाबूंच्या हातात एके दिवशी तार पडली - ' १९३८ च्या प्रारंभी गुजरातमधल्या हरिपुरा इथे भरणाऱ्या काँग्रेसच्या पन्नासाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावर तुमची एकमताने निवड करण्यात आली आहे.'

सुभाषबाबू हिंदुस्थानात परतले - काँग्रेसचे अध्यक्षपद स्वीकारण्यासाठी. आपला गौरव व्हावा याचा आनंद वाटणे साहजिकच होते. पण म्हणून, मतांना मुरड घालायची काहीच जरूरी नव्हती.

तसे असते, तर स्वर्गाला हात पोहोचविणारी आय. सी. एस. ची सनद नाकारायचे काय कारण होते ?

सुभाषबाबूंनी आपल्या अध्यक्षीय भाषणात ठामपणे सांगितले. ' लवकरच युरोपमध्ये पुन्हा एकदा, युरोपवरच्या वर्चस्वाची आकांक्षा बाळगणाऱ्या देशांमध्ये रणसंघर्ष उफाळून येईल अशी लक्षणे दिसू लागली आहेत. युरोपच्या क्षितिजावर महायुद्धाचे ढग गर्दी करू लागलेले असताना आपण स्वस्थ बसून चालणार नाही. या अशा आंतरराष्ट्रीय घटनांचा आपल्या देशाच्या मुक्ततेसाठी कसा उपयोग करून घेता येईल, याचा आतापासूनच गंभीर विचार व्हायला हवा.'

अवघड आव्हानाला सामोरे जाण्याचे आवाहन करणारे हे विचार अनेकांना मानवणारे नव्हते.

अध्यक्षपद जपूनही सुभाषबाबूंचे एकाकीपण संपलेले नव्हते. किंबहुना ते सोबतीला घेऊनच त्यांना यापुढेही वावरायचे होते. १९३८ हे वर्ष सरले, १९३९ साल उजाडले.

त्या वर्षीचे अधिवेशन जबलपूरजवळच्या त्रिपुरी इथे भरणार होते. अध्यक्ष कोणाला करायचे?

सुभाषबाबूंसारखी लढाऊ भाषा न बोलण्याऱ्या कोणासही. मौलाना आझादांच्या उमेदवारीचा विचार पुढे आला. सुभाषबाबूंना वाटले, आपण आता आगामी महायुद्धाच्या आणखीच जवळ जाऊन पोहोचलो आहोत. काँग्रेस हे राष्ट्रीय व्यासपीठ आहे. म्हणून या प्रातिनिधिक मंचावरून लढाऊ कार्यक्रमाची घोषणा होणे आवश्यक आहे.

असेच मत अनेक जण व्यक्त करीत होते. सुभाषबाबूंनी त्यांच्याशी संपर्क साधला. 'तुमच्यापैकी कोणीतरी यावेळी अध्यक्षपदासाठी उभे राहावे,' असे आग्रहपूर्वक सुचविले. परंतु सगळेच सुभाषबाबू नसतात.

बहुतेक सगळे क्रांतीची भाषा बोलणारे वाचीवीर असतात. अशी देखणी माणसे शोभून दिसतात ती केवळ रंगमंचावर. समरांगणाकडे ती, कोणती तरी सबब सांगून, पाठ फिरवितात. एकही जण निवडणूक लढायला तयार होईना. महायुद्धाची संधी वारंवार येत नसते. अशा वेळी मैदान मोकळे सोडून चालणार नव्हते. सुभाषबाबूंनी, निरुपाय म्हणून स्वतःच उभे राहायचे ठरवले. हे नाव ऐकताच आझादांनी आपले नाव मागे घेतले. सुभाषबाबूंची अविरोध निवड व्हावी हे गांधीजींना मानवण्यासारखे नव्हते. त्यांनी कसेबसे पट्टाभी सीतारामय्या यांना तयार केले. सुभाषबाबूंवर, उमेदवारी मागे घेण्यासंबंधी चहुबाजूंनी दडपण येऊ लागले. तरीही सुभाषबाबूंचा निर्धार कायम.

मित्र म्हणविणाऱ्यांनी समजाविले. "गांधीजींच्या विरोधात निवडणूक लढविणे म्हणजे नष्ट होऊन जाण्यासारखे ठरू शकेल."

"त्याची तर मी पहिल्यापासूनच तयारी केलेली आहे."

काँग्रेसच्या इतिहासात अध्यक्षपदासाठी प्रथमच निवडणूक घ्यावी लागली. सुभाषबाबू पराभूत होणार हे सगळे जण धरूनच चालले होते.

सुभाषबाबू म्हणाले, "निवडणूक म्हटली की कोणीतरी विजयी होणार

आणि दुसरा कोणीतरी हरणार. हे असे चालायचेच. पराभवाला भ्यायचे कशासाठी ?"

निवडणुकीचा निकाल जाहीर झाला आणि अनपेक्षित घडल्याचा प्रत्यय आला. गांधीजींनी आपली सारी शक्ती पणाला लावलेली असूनही पट्टाभी सीतारामय्या पराभूत झाले, सुभाषबाबू विजयाचे मानकरी ठरले. एकटे सुभाषबाबू एका बाजूला आणि बाकीची सगळी पुढारी मंडळी विरुद्ध बाजूला असूनही.

हा अपमान गांधीजींना सहन होणे शक्यच नव्हते. ते उद्‌गारले, "पट्टाभींचा पराभव हा मी माझाच पराभव समजतो."

वस्तुतः मतपेटीचा कौल गांधीजींसारख्या महात्म्याने मोकळ्या मनाने स्वीकारायला हवा होता. इतरांची तशीच अपेक्षा होती. गांधीजी सुभाषबाबूंना निवडणूक लढविण्याचे पातक केल्याबद्दल क्षमा करणार नव्हते. त्यांनी नेहरू, पटेल, आजाद, राजेंद्रप्रसाद, राजगोपालाचारी प्रभृतींशी चर्चा केली. यातला एकही जण सुभाषबाबूंशी सहकार्य करायला तयार होईना. सुभाषबाबू रीतसर निवडून आलेले असतानाही.

आणि हीच मंडळी लोकशाहीचे तारस्वरात गुणगान करीत असायची. अध्यक्ष म्हणून काम करणे गांधीजींनी आपल्याला अशक्य करून टाकले आहे हे दिसून आल्यावर, स्वाभिमानी माणूस जसा वागतो तसेच सुभाषबाबू वागले - त्यांनी त्या पदाचे त्यागपत्र सादर केले.

विरोधकांनी आनंद व्यक्त केला, "स्वतःच्या कर्तृत्वावर भलता भरवसा बाळगणारा हा माणूस आता संपला - कायमचा."

पलिकडे विरोधकांचा विरोध अधिक वाढला. सुभाषबाबूंना कॉंग्रेसमधून बाहेर पडावे लागले. या अन्यायाबद्दल त्यांनी किंचितही कुरकूर केली नाही. सुभाषबाबूंसारख्यांची जडणघडण वेगळ्याच मुशीतून झालेली असते याची केवळ 'प्रभावळ' होण्यात धन्यता मानणाऱ्यांना काय कल्पना!

सुभाषबाबूंनी नवा पक्ष स्थापन केला - 'फॉरवर्ड ब्लॉक'.

देशापुढे लढाऊ कार्यक्रम ठेवण्यासाठी त्यांनी दिल्लीपासून मद्रासपर्यंत आणि मुंबईपासून कलकत्त्यापर्यंत दौरा काढला. सुभाषबाबूंचे आपल्या देशबांधवांना एकच सांगणे होते, 'महायुद्धासारखी स्वतंत्र होण्याची संधी वारंवार येत नसते. इंग्लंड त्या निमित्ताने अडचणीत आलेले असताना आपण

त्यांच्याशी असहकार पुकारला तर त्याला आपल्या मागणीचा विचार करणे भाग पडेल. अशा वेळी आपण, कोणतेही कारण पुढे करून स्वस्थ बसलो तर दैव देते, पण कर्म नेते, अशी आपली अवस्था होऊन जाईल.'

काँग्रेसव्यतिरिक्त देशात जे इतर पक्ष होते त्यांच्या नेत्यांशी सुभाषबाबूंनी बोलणी केली. यावेळी आपण संयुक्त आघाडी निर्माण करणे कसे आवश्यक आहे, हे सुभाषबाबू त्यांना पटवून देऊ लागले.

परंतु इतरांचे हे धोरण नाही, हे सुभाषबाबूंना कळून आले. प्रत्येकाची सबब वेगळी, पण उत्तर एकच 'तुम्ही म्हणता तसे आता आम्हाला काहीही करता येण्यासारखे नाही.'

देशाचे भवितव्य आपण घडविणार आहोत, अशा आविर्भावात बोलणाऱ्यांची ही केविलवाणी अवस्था पाहून सुभाषबाबूंना विस्मयही वाटला आणि वाईटही वाटले.

सुभाषबाबूंची जनजागृतीची परिक्रमा चालूच होती.

३ सप्टेंबर १९३९ हा दिवस. वेळ संध्याकाळची. स्थळ - मद्रासमधले मरिना बीच. सुभाषबाबूंचे भाषण नुकतेच सुरू झाले होते. युरोपीय परिस्थिती आणि हिंदुस्थानचे स्वातंत्र्य यांचा संबंध सुभाषबाबू विशद करू लागले. एवढ्यात श्रोत्यातून एक जण व्यासपीठावर आला आणि स्थानिक सायंदैनिकाचा नुकताच प्रसिद्ध झालेला अंक त्याने सुभाषबाबूंच्या हातात ठेवला.

सुभाषबाबूंनी पहिल्या पानावरून नजर फिरविली. शीर्षक होते - 'इंग्लंडचे जर्मनीविरुद्ध युद्ध घोषित.'

सुभाषबाबू सांगू झाले, "गेले वर्षभर मी जे म्हणत होतो ते आज प्रत्यक्षात आलेले आहे. युरोपमध्ये पुन्हा महायुद्धाला आरंभ झालेला आहे. अशावेळी आपले सूत्र एकच असले पाहिजे - शत्रूची अडचण ती आपली सोय."

तेथपासून, या संधीचा कसा काय फायदा घ्यायचा हाच सुभाषबाबूंचा एकमेव चिंतनविषय होऊन गेला.

१९४० साल उजाडले ते सुभाषबाबूंची ही व्यग्रता घेऊनच. महायुद्धाच्या पहिल्या सात-आठ महिन्यांमध्ये हिटलरच्या जर्मनीने सारा पश्चिम युरोप पादाक्रांत करून टाकला. हा रणसंघर्ष यापुढे कोणते वळण घेईल, हे कोणीही सांगू शकत नव्हते.

अशा वेळी काहीतरी करायला हवे, असे सुभाषबाबूंना होऊन गेले.

लखनौला फॉरवर्ड ब्लॉकच्या कार्यकारी समितीची बैठक होती. ती आटोपून सुभाषबाबू कलकत्त्याला यायला निघाले. प्रवासात नीहारेंदू दत्त-मुजुमदार बरोबर होते. सुभाषबाबू कोणत्या तरी गंभीर विचारात बुडून गेलेले आहेत हे नीहारेंदू यांना जाणवले.

ते सुभाषबाबूंकडे पाहत राहिले. एकदम काहीतरी सुचल्यासारखे झाले आणि सुभाषबाबूंनी विचारले, "निहारेंदूबाबू, तुम्ही आत्ताच्या आत्ता भूमिगत व्हायला तयार आहात काय ?"

निहारेंदूंना या प्रश्नाचा अर्थच कळेना.

सुभाषबाबूंनी आपला विचार बोलून दाखविला. निहारेंदू सांगू लागले, "बाबूजी, जर्मनीमध्ये ओळखी आहेत त्या तुमच्या. मला तिथे कोणीच ओळखणार नाही. त्यामुळे तुम्ही स्वतः तिकडे गेलात तर तुम्ही म्हणता तसे घडून यायची शक्यता आहे."

हावडा स्टेशनवर उतरताना सुभाषबाबूंनी निहारेंदू यांना बजावले "आता आपण जे बोललो ते कुणाशीही बोलू नका."

सुभाषबाबूंच्या विचारचक्राने गती घेतली. परंतु तो बेत पक्का होईपर्यंत स्वस्थ बसून चालण्यासारखे नव्हते. १ जुलै १९४० या दिवशी सुभाषबाबूंनी जाहीर केले. 'आणखी दोन दिवसांनी बंगालचा शेवटचा राजा सिराजुद्दोला याचा स्मृतिदिन आहे. त्या दिवशी हॉलवेल स्मारक पाडून आम्ही तो दिवस साजरा करणार आहोत.'

तो दिवस उजाडायच्या आत सरकारने सुभाषबाबूंना अटक केली. सुभाषबाबूंचा गेल्या वीस वर्षांमधला हा अकरावा कारावास. त्यांना फार काळ स्थानबद्धतेत ठेवता येणार नाही असे कळून आल्यामुळे सरकारने त्यांच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवला.

सरकार आपल्याला महायुद्ध संपेपर्यंत तुरुंगात ठेवू इच्छित आहे हे सुभाषबाबूंना कळून आले. खटल्याचे कामकाज सुरू होईपर्यंत आपल्याला जामिनावर सोडले पाहिजे अशी सुभाषबाबूंनी मागणी केली. ती नाकारली जाताच सुभाषबाबूंनी उपोषण आरंभिले.

सरकारला निरुपायाने सुभाषबाबूंची तात्पुरती सुटका करावी लागली. न्यायाधीशांनी सुटकेचा हुकूम देताना जाहीर केले, 'सुभाषचंद्र बोस यांच्यावरच्या खटल्याचे कामकाज २७ जानेवारी १९४१ ला सुरू होईल. त्या

दिवशी त्यांनी न्यायालयात हजर राहिले पाहिजे.'

७ डिसेंबरला सुभाषबाबू घरी परतले. २७ जानेवारी हा दिवस विसरता येत नव्हता. जे काही करायचे असेल ते या महिनाभरातच, हे जाणवले. सुभाषबाबूंनी भेटीगाठी थांबविल्या. तरीही सरकारने '३८/२, एल्गिन रोड' या त्यांच्या निवासस्थानाबाहेर पोलिसांचा पहारा बसविला. चोवीस तासांचा.

सुभाषबाबू घरी एकटे काय करीत आहेत, हे सरकारला कळेना. काहीही झाले तरी सुभाषबाबू पळून जाऊ शकणार नाहीत याबद्दल पोलिस प्रमुखांची खात्रीच होती.

आणि तरीही १६ जानेवारी १९४१ या दिवशी मध्यरात्र होताच सुभाषबाबू घरातून बाहेर पडले. पठाणाचा वेश करून, महंमद जियाउद्दीन हे त्या पोषाखाला साजेसे नाव धारण करून.

त्यांनी गोमोह स्टेशन गाठले आणि कालका मेलमधून ते दिल्लीला जाऊन पोहोचले. तिथून फ्रँटियर मेलने ते पेशावरपर्यंत जाऊन पोहोचले. पेशावर ते काबूल हा प्रवास पायी पार पाडावा लागला. २७ जानेवारीला पोलीस सुभाषबाबूंना न्यायालयात नेण्यासाठी त्यांच्या घरी गेले तेव्हा ते काबूलला जाऊन पोहोचले होते. सुभाषबाबूंच्या पलायनाने सरकारची पुरती नाचक्की झाली. आग्र्याहून औरंगजेबाच्या बंदिवासातून शिवाजी महाराजांनी स्वतःची शिताफीने सुटका करून घेतली होती. सुभाषबाबू देशाबाहेर कोठे तरी गेले आहेत ही बातमी प्रसिद्ध झाली तेव्हा त्यांच्या देशबांधवांना इतिहासातला तो रोमहर्षक प्रसंग आठवला.

काबूलहून बर्लिनला जायला सुभाषबाबूंना बरेच प्रयास पडले. दुसरा एखादा असता तर तो केव्हाच खचून गेला असता. वाहनाची सोय होत नाही असे आढळून आल्यावर सुभाषबाबूंनी काबूलपासून रशियाच्या सीमेपर्यंत पायी जायची तयारी केली होती.

बर्लिनमध्ये पोहोचल्यावर सुभाषबाबूंनी तेथे 'स्वतंत्र हिंदुस्थान केंद्रा'ची स्थापना केली.

या केंद्राला जर्मनीने स्वतंत्र हिंदुस्थानचे हंगामी सरकार म्हणून मान्यता द्यावी, यासाठी सुभाषबाबूंनी हिटलरची भेट घेतली. हिटलरने होकार दिला. परंतु त्यानंतर त्याने रशियावर हल्ला चढविल्यामुळे अफगाणिस्तानातून हिंदुस्थानात पोहोचायचा आपला मार्ग बंद झाल्याचे सुभाषबाबूंना कळून आले. त्या वर्षीच्या

डिसेंबरमध्ये जपान युद्धात उतरला आणि आता आपण जर्मनीत थांबण्याऐवजी जपान गाठावा असे सुभाषबाबूंच्या मनाने घेतले. जपानकडून त्यांना तसे आमंत्रण आलेही. युद्धकाळ असल्यामुळे जर्मनी ते जपान हा प्रवास कसा पार पाडायचा हा प्रश्न उभा राहिला.

सुभाषबाबूंनी हा सगळा प्रवास पाणबुडीमधून केला. या प्रवासातल्या ८८ दिवसात दिवस कळत नव्हता की रात्र, वार समजत नव्हता की आठवडा.

केव्हा काय होईल आणि पाणबुडी समुद्राचा तळ गाठेल असा क्षणोक्षणी धोका. किएल बंदरामध्ये सुभाषबाबू पाणबुडीत बसले आणि आफ्रिका खंडाला वळसा घालून, हिंदी महासागर पार करून ते साबांग इथे आले. तिथून विमानाने ते टोकियोला जाऊन पोहोचले. तिथल्या सरकारचे हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याबाबतचा दृष्टिकोन जाणून घेण्यासाठी.

जपानचे पंतप्रधान तोजो यांना पहिल्याच भेटीत सुभाषबाबूंनी आपली अपेक्षा कथन केली - 'हिंदुस्थान स्वतंत्र करायचा आहे तो हिंदुस्थानी सैनिकांनीच. आम्हाला जपानकडून हवी आहे ती शस्त्रांची मदत. तीही मोफत नव्हे कर्ज म्हणून. स्वतंत्र हिंदुस्थानचे सरकार ती रक्कम चुकती करील.'

हे तोजो यांनी मान्य केले. सुभाषबाबूंनी सिंगापूर येथे २१ ऑक्टोबर १९४३ या दिवशी आजाद हिंद सरकार स्थापन केले. त्याला चीन, जपान, थायलंड, ब्रह्मदेश, जर्मनी, इटली, फिलिपीन्स, मलाया आणि क्रोआटिया या राष्ट्रांनी मान्यता दिली.

जपानच्या ताब्यात गेलेल्या भारतीय सैनिकांमधून मोहनसिंगांनी आजाद हिंद फौज अगोदर उभारली होती. आता ती आझाद हिंद सरकारच्या नियंत्रणाखाली आली. सुभाषबाबूंनी अंगावर रणवेश चढविला. आजाद हिंद सेनेची पहिली डिव्हिजन रंगूनला जाऊन पोहोचली. तिथून मुतागुचि हा जपानी सेनानी इंफालपर्यंत आपले तीन डिव्हिजन सैन्य घेऊन जाणार होता.

आजाद हिंद सेना एकदा इंफालपर्यंत पोहोचली की जपानी सरकारची जबाबदारी संपणार होती. इंफालपासून दिल्लीपर्यंतची धडक एकटी आजाद हिंद फौजच घेणार होती. दिल्लीतल्या लाल किल्ल्यावर स्वतंत्र हिंदुस्थानचा ध्वज फडकविला की आजाद हिंद सेना आणि आजाद हिंद सरकार यांचे विसर्जन करायचे आणि भारतीय जनतेने निवडलेला प्रतिनिधींच्या हाती सारी सूत्रे सोपवायची, असे सुभाषबाबूंनी ठरविले होते.

इंफालभोवती वेढा घालण्यात मुतागुचि यशस्वी झाला. अलिकडच्या मोईरांग इथे आजाद हिंद सेनेने आपला तळ ठोकला. इंफालचे संरक्षण करण्याची जबाबदारी ब्रिटिश सरकारने जनरल विल्यम स्लीम यांच्यावर सोपविली होती. इंफाल पडले की आजाद हिंद सेनेची विजयी वाटचाल सुरू होईल याची कल्पना आल्यामुळे कलकत्त्याहून स्लीमकडे सतत शस्त्रास्त्रांचा आणि अन्नधान्याचा भरपूर पुरवठा होत राहिला. इंफालपासून टोकियो फार दूर होते. तिथून मुतागुचि याला नवी कुमक आणि रसद मिळेना.

त्याच्यावर माघार घेण्यावाचून पर्याय राहिला नाही. हिंदुस्थानच्या प्रवेशद्वारापाशी येऊन सुभाषबाबूंच्या आजाद हिंद सेनेला पुन्हा रंगूनपर्यंत आणि नंतर सिंगापूरपर्यंत मागे येणे भाग पडले. हिरोशिमा आणि नागासाकी इथे अणुबाँब पडल्यानंतर जपानला शरणागती पत्करावी लागली.

आणि त्या क्षणीच सहा वर्षे उफाळून आलेल्या दुसऱ्या महायुद्धाची सांगता घडली. सुभाषबाबूंना सिंगापूर सोडावे लागले. त्यांनी मांचुरियाला जायचे ठरविले. त्या प्रवासात १८ ऑगस्ट १९४५ या दिवशी तैवानमधल्या तैपेई इथे नेमके काय घडले हे इतिहासाला कळू शकले नाही.

२२ ऑगस्टला टोकियो नभोवाणीवरून सुभाषबाबूंच्या अपघाती निधनाची वार्ता प्रसृत करण्यात आली. ती खरी की खोटी - कळायला काहीच मार्ग नव्हता.

१५ ऑगस्ट १९४५ या दिवशी सिंगापूर सोडण्यापूर्वी सुभाषबाबूंनी आपल्या सहकाऱ्यांचा आणि सैनिकांचा अखेरचा निरोप घेतला. त्यावेळी ते म्हणाले होते, "हिंदुस्थान स्वतंत्र होणार आणि तोही लवकरच."

ते पुढे असेही उद्‌गारले होते, 'हिंदुस्थान स्वतंत्र होणे म्हणजे अखिल मानवजातीच्या मुक्ततेचा शुभारंभ होणे होय.'

तसेच घडून आले. सुभाषबाबूंच्या त्या आकाशभाषिताला भविष्यवाणीची झळाळी प्राप्त झाली. अखिल मानवमात्रांची सर्वांगीण मुक्तता - याहून भव्यदिव्य संकल्पना असूच शकत नाही.

म्हणूनच, सुभाषबाबूंचे १९२१ ते १९४५ या पाव शतकातील तेजस्वी जीवनकार्य म्हणजे उत्कट अनुभवांचा उदात्त आविष्कार.

'या सम हाच' म्हणावा असा.

● ●

*************************

# अंदमानचा पेच तथा नेताजी सुभाषचंद्र बोस

**जालंदर सोनुने**

*************************

सात डिसेंबर १९४१ ची घटना. त्या दिवशी सर्वप्रथम 'पर्ल हार्बर'वर जपान्यांनी हल्ला केला. आणि त्याचक्षणी दुसऱ्या महायुद्धाचा भडका उडाला. जपानी सैनिक आपल्या सामर्थ्यामुळे एका मागून एक प्रदेश काबीज करू लागले. जेव्हा १५ फेब्रुवारी १९४२ ला सिंगापूरवर आपला ताबा मिळवून ते भारताच्या दिशेने कुच करू लागले त्यावेळी त्यांच्यासमोर भारताची पूर्वेकडील प्रवेशद्वारे समजली जाणारी 'अंदमान-निकोबार'ची बेटे (द्वीप) दिसू लागली.

त्यानुसार त्यांनी आपल्या सैनिकांसह २३ मार्च १९४२ ला या द्वीप समूहाच्या धरतीवर पहिल्यांदा पाऊल ठेवले. त्यावेळी त्यांच्यासोबत दोन भारतीय, दुभाषी म्हणून आलेले होते. ते दोघेही 'इंडियन इंडिपेंडंट लीग'चे सदस्य होते. श्री. ए. के. शाह तथा श्री. चन्द्रा. या दोन्हीही व्यक्ती पुढे 'आझाद हिंद सेने'च्या अत्यंत उत्साही सदस्य झाल्या.

इंग्रजांना पिटाळून लावावयाचे प्रयत्न भारतीय क्रांतिकारी, जपान्यांच्या मदतीने सतत करत होते. त्यानुसार जपानमध्ये 'इंडियन इंडिपेंडंट लीग'ची स्थापना श्री. रासबिहारी बोस यांनी केली. त्याचीच शाखा इथे अंदमानला श्री चंद्रा तथा श्री. शाह यांनी स्थापन केली होती. इतर ठिकाणी जशा लीगच्या अनेक शाखा होत्या, तशाच येथेही, दोन शाखा होत्या. त्यामध्ये अंदमानातील अधिकारी, तथा व्यापारी वर्ग सामील होता. आजच्या घडीला, पोर्ट-ब्लेअर या राजधानीच्या शहरात जेथे 'नेताजी क्लब' आहे, तेथे पूर्वी 'लोकल बॉर्न'चा 'ब्राऊनिंग क्लब' होता. तेथेच जुलै १९४२ ला जपानचे संपर्क अधिकारी श्री. हाताशा यांनी एक सभा घेतली. कित्येक जपानी अधिकाऱ्यांनी त्यात भाग घेतला.

सर्वप्रथम त्या सभेत श्री. शाह आणि चंद्राने लोकांना आवाहन केले की, "सर्व जनतेने जपानी सैनिकांना, सहकार्य देऊन भारताच्या स्वातंत्र्यासाठी इंग्रजांविरुद्ध संघर्ष करावा. इंग्रज लोक भारताचे, तसेच जपानी जनतेचे शत्रू आहेत. आणि जपान देश आपला एक मित्रराष्ट्र म्हणून, भारताला हरप्रकारे सहायता करत आहे."

मार्च १९४२ च्या दरम्यान, बहुतेक सर्वच इंग्रज द्वीप समूहातून निघून गेलेले होते. अन् ती पहिलीच वेळ होती की त्यावेळेस पूर्णतः कारभार भारतीय अधिकाऱ्यांच्या हातात आला होता. परंतु येथील 'मुख्य आयुक्त' इंग्रज व्यक्ती मात्र येथेच होती. त्यावेळी त्यांची एक वेगळीच योजना होती. जेव्हा जपानी सेना येथे, या द्वीप समूहात येतील, त्यावेळी येथील प्रमुख स्थाने, वायरलेस स्टेशन, आशिया खंडातील सर्वात भव्य असा 'चॅथम आरा मील', जहाज बांधणी तथा दुरुस्ती स्थान, आदि ठिकाणे सुरुंग लावून उध्वस्त करावयाची होती.

त्यानुसार सुरुंग लावले सुद्धा होते. २२ मार्च १९४२ ची ती सकाळ. त्यादिवशी सर्व सैनिक अंदमान-निकोबार द्वीप समूहात येऊन धडकले. त्याच सुमारास, पूर्वनियोजित योजनेनुसार सर्व सुरुंगांची बटणे दाबली गेली. त्याक्षणी वायरलेस स्टेशनवर मोठा आवाज झाला आणि ते स्टेशन उध्वस्त झाले. परंतु इतर ठिकाणी मात्र असे काहीच घडले नाही. कारण काही लोकांनी ती योजना अयशस्वी केली. त्यांना वाटले, "शेवटी ही सारी संपत्ती आपलीच आहे. तिला का नष्ट होऊ द्यायचे!" आणि म्हणून त्यांनी त्या सुरुंगाची संपर्क केंद्रे तोडून टाकली होती. अशा या अंदमानात, एके दिवशी अचानक घोषणा झाली, "नेताजी सुभाषचंद्र बोस येथे, अंदमानला भेट देणार आहेत." या बातमीमुळे 'आझाद हिंद सेनेतील, स्थानीय शाखांमधील जवानांना स्फूर्ती आली. 'लम्बालाईन' स्थित विमानतळावर त्यांना सलामी देण्यासाठी, एका विशेष तुकडीला प्रशिक्षण देण्यात आले. त्यावेळी लोक त्यांना हे दाखवून देणार होते की, "देशाच्या स्वातंत्र्यासाठी, आम्ही जीवदान द्यायला सुद्धा तयार आहोत."

शेवटी तो इतिहासप्रसिद्ध दिवस उजाडला. २९ डिसेंबर १९४३ ला सकाळी १० वाजता, एक विशेष तुकडी आजच्या नेताजी क्लब पासून निघून 'लंबालाईन' विमानतळावर पोहचली. न जाणो केव्हापासून, प्रतीक्षा होती त्या घटकेची. दुपारी त्यांचे विमान आले. नेताजी सुभाषचंद्र बोस, विमानाबाहेर येताच, 'आझाद हिंद सेने'च्या तुकडीचे प्रमुख श्री. परसराम यांनी रायफली

ऐवजी हातातील दंडे उंच करून सैनिक सलामी दिली. त्यानंतर श्री. आफताफ अली यांनी तिरंगा झेंडा झुकवून त्यांना अभिवादन केले. तद्नंतर इतर सदस्य तथा नेता लोकांनी त्यांना 'गार्ड ऑफ ऑनर'चा सन्मान दिला.

नेताजी सुभाषचंद्र बोस प्रत्येकाचा प्रणाम स्वीकारीत पुढे पुढे जात होते. त्यावेळी जपानी ॲडमिरल तसेच कमांडर हिराकावा उपस्थित होते, ते नेताजींना गाडीपाशी सन्मानपूर्वक नेत होते. ३० डिसेंबर १९४३ रोजी, जिमखाना मैदानात नेताजींचे नागरिक अभिनंदन करणार होते. त्याचवेळी नेताजी सुभाषचंद्र, जनतेला उद्देशून भाषणही करणार होते. आणि म्हणून मोठ्या संख्येने स्त्री-पुरुष, मुले उपस्थित होते. स्टेजच्या दोन्ही बाजूला दोन लहान लहान चौक्या सुद्धा उभारल्या होत्या. त्यावर आफताफअली आणि उसमानअली, हातात दंडे घेऊन, 'आझाद हिंद सेने'चे प्रतिनिधी या नात्याने नेताजींच्या अंगरक्षकांचे काम करणार होते.

सकाळी जवळपास साडेनऊ वाजता, त्यावेळी द्वीप समूहाचे मुख्यालय असलेल्या, 'रॉस द्वीप'वरून निघून, नेताजी, जपानी सेनाधिकाऱ्यांच्या कडक बंदोबस्तात जिमखाना मैदानात आले. 'रॉस द्वीप' हे चहुबाजूने पाण्याने वेढलेले असल्याकारणाने, मोटार लाँचद्वारा ते धक्क्यावर आले, आणि तद्नंतर ते जिमखाना मैदानात प्रवेशले. तेथे पोहचताच लीगच्या सदस्यांनी त्यांचे भव्य स्वागत केले. त्यानंतर त्यांना सन्मानपूर्वक स्टेजवर आणण्यात आले. तेथे त्यांनी सर्वप्रथम स्वतंत्र भारताचा 'तिरंगा झेंडा' फडकविला. त्याप्रसंगी तेथे जवळपास पाच हजार लोक उपस्थित होते. त्याचवेळी लीगचे सदस्य श्री. केशरदास आणि त्यांच्या साथीदारांनी 'सुखचैन की बरखा बरसे...' हे देशभक्तिपर गीत गायिले. सैनिक तुकडीने त्यांना अभिवादन केले. त्यावेळी नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी कवायतीचे निरीक्षणही केले.

त्यांच्या सन्मानार्थ निकोबारी आदिवासींनी परंपरागत वेषात नृत्य करून उपस्थितांचे मन जिंकले. नेताजींच्या सन्मानाप्रित्यर्थ भाषण वाचून दाखविले. लीगचे नवे अध्यक्ष श्री. रामकृष्ण यांनी, त्याचवेळी लीगच्या तर्फे उपाध्यक्ष या नात्याने दहा हजार रुपये, शिवाय काही दागिने असलेली थैली अर्पण केली. या रकमेचा उपयोग युद्धप्रसंगी करावा, हा यामागील उद्देश होता. काही क्षणानंतर नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी ध्वनिक्षेपक आपल्यासमोर घेतला आणि अत्यंत जोशपूर्ण शब्दात बोलू लागले, '' आपणास आता दिल्लीस जावे लागेल. आपणा

सर्वांनी मिळून जपानी सैनिकांना साथ द्यावी. त्यांच्याच सहकार्याने, आपण इंग्रजांशी लढा देऊ शकतो.'' त्यावेळी नेताजींनी मोठ्या आवेगाने म्हटले होते, 'तुम मुझे खून दो. मैं तुम्हे आझादी दूंगा' शेवटी द्वीप-वासियांना अनेक शुभेच्छा देऊन आपले भाषण संपविले.

दुसऱ्या दिवशी सकाळी लीगच्या कार्यालयात नेताजींचे भाषण ठेवण्यात आले होते. ते पाहून जपान्यांना पंचाईत वाटू लागली. भारतीय जनता नेताजी सुभाषचंद्र बोस यांना यापूर्वी आपण केलेल्या अत्याचारांची कल्पना देईल की काय? अशा स्थितीत जपानी अधिकाऱ्यांनी अत्यंत चलाखीने व्यवस्था केली. नेताजींसोबत खाजगीरीत्या कोणालाही बोलता येऊ नये म्हणून, सतत सैनिक नेताजींच्या आसपास ठेवण्यात आले.''

अशा स्थितीत नेताजी सुभाषचंद्र बोस आले. तेथे त्यांचा सन्मान झाला. त्यांनी आपल्या भाषणात, ''जपान्यांना सहकार्य करा. हिंमतीने वागा. रक्त सांडल्याशिवाय स्वातंत्र्य मिळणार नाही.'' आदि बोलून आपले भाषण संपविले. आणि त्याच दिवशी, ३१ डिसेंबर रोजी परत सिंगापूरला रवाना झाले. नेताजी आले तसेच परत गेले. परंतु मित्रराष्ट्र म्हणून जपानी जे अत्याचार करत होते, त्याबाबत त्यांना काहीएक कल्पना देता आली नाही. २२ फेब्रुवारी १९४४ ला अंदमानला आझाद हिंद सरकार स्थापन झाले. या द्वीपसमूहाचे नेतृत्व करण्यासाठी लेफ्ट. कर्नल लोकनाथन हे भारतीय गृहस्थ आले.

त्यावेळी त्यांच्यासोबत कप्तान मंसूरअली आणि सेकंड लेफ्टनंट सुबासिंह, तथा सेकंड लेफ्टनंट मुहम्मद इकबाल आलेले होते. आझाद हिंद फौजेची शाखा, आय. एन. ए. स्थापली. अल्वी तथा सुबासिंह यांनी प्रशिक्षण देण्याची जबाबदारी स्वीकारली. द्वीपसमूहातील युवकांना हे प्रशिक्षण देण्यात येऊ लागले. परेडचे ठिकाण (आजच्या) नेताजी क्लब समोरील, अबर्डीन वस्तीत स्थित असलेली जागा निवडली. आझाद हिंद सरकारच्या मुख्यालया-साठी जागा नाग परिवारांनी भेट म्हणून दिली. जागा देण्यामागे एक मोठी उदात्त भावना होती. त्यांच्या विवाहित दोन तरुण मुलांना हेर ठरवून अटक करून त्यांना जपानी सैनिकांनी ठार केले होते.

हळूहळू आझाद हिंद सेनेच्या जवानांची संख्या वाढून ती दीडशेहून दोनशेच्या वर गेली. प्रशिक्षण हिंदी भाषेतून दिले जात होते. लाठ्याऐवजी रायफलींचा उपयोग करू लागले. जपानी जनसंपर्क अधिकारी श्री. हाताशा सुद्धा

मधून मधून परेडचे निरीक्षण करीत असत. द्वीपवासीयांनी स्वातंत्र्य लढ्यात नेताजी सुभाषचंद्र बोसांच्या उपदेशानुसार मोठे योगदान दिले. जुलूम, अत्याचार सहन केले. काहींना पूर्वी जपान्यांनी गोळ्या घालून ठार केले. तो प्रसंग....

२३ मार्च १९४२ रोजी जपान्यांनी जेव्हा द्वीपसमूहाचा ताबा घेतला, त्यावेळी सैनिकांची संख्या पंचवीस हजार एवढी होती. त्याकाळात सर्व अन्नधान्य जहाजाद्वारा द्वीप समूहात आणल्या जात होते. अन्नधान्यांनी भरून आणलेली जहाजं, पोर्ट-ब्लेअर शहराजवळ येत असतानाच बॉम्ब हल्ले आणि सागरी हल्ल्यामुळे नष्ट केल्या जात व त्यामुळेच जपानी अधिकारी चिडले. त्याचा परिणाम म्हणून सामान्य लोकांना यातना देण्यात येऊ लागल्या. जनता अन्नावाचून उपाशी मरू लागली. आगीतून निघून फुफाट्यात अशी काही काळ त्यांची अवस्था झाली. संशयास्पद माणसास जपानी सैनिक 'सेल्युलर जेल'मध्ये कोंबू लागले. लोकांकडून फुकटात कामं करून घेत. जबरदस्ती कामावर घेऊन जात असल्यामुळे घरच्या माणसांना त्यांच्याविषयी काहीएक पत्ता लागत नसे. जेलमध्ये 'विद्युत यातना, जल यातना' सारख्या शिक्षा देऊ लागले. विद्युत-यातना पद्धतीत विजेचा प्रवाह नग्न शरीरास देत असत आणि 'जल यातना' पद्धतीमध्ये, संबंधित कैद्यास एका खाटेवर अथवा लाकडी फाळीवर किंवा कधी कधी जमिनीवर उताणे झोपवून हातपाय बांधत. डोक्यास दोन व्यक्ती मजबूतपणे धरून ठेवत आणि त्याच्या तोंडावर पाण्याची धार ओतत. ही प्रक्रिया कित्येक तास चालू असायची. त्यामुळे नाका-तोंडातून पाणी शरीरात जात असे. अशा तऱ्हेने यातना देऊन जर्जर करीत. कधी कधी तर क़ैदी मृत्युमुखी पडायचा. एकेकाळी जपान्यांनी अंदमानच्या एतद्देशीयांचे हाल केले.

जहाजं नष्ट होत असताना जपानी लोक, इंग्रजी ज्यांना येते, अशांना जास्त त्रास द्यायचे. दिनांक २९ जानेवारी १९४४ रोजी संशयित ४४ लोकांना त्यांनी अटक केली. यातना दिल्या. कसून चौकशी केली. कोण आमच्या हालचालींविषयी गुप्तपणे बातम्या-संदेश पाठवितात! परिणामस्वरूप धान्याची जहाजे उध्वस्त केली गेली. चौकशीअंती काहीही बातमी बाहेर आली नाही व त्यामुळे जपानी सैनिक आणखीच चिडले. शेवटी ३० जानेवारी १९४४ रोजी 'सेकंड स्पाय केस' मधील अटक केलेल्यांच्या सर्व नातेवाईकांना भेटावयास येण्याचा निरोप पाठविला. अर्थातच सर्वच नातेवाईकांच्या मनात अपशकुनयुक्त शंकेची पाल चुकचुकली. सर्वांचेच नातेवाईक, लहान मुले, आबाल-वृद्ध एकत्र

गोळा झाले होते. येताना, प्रत्येकासाठी काहीना काही खावयास प्यावयास घेऊन आले होते. सूर्योदयापूर्वी समस्त आप्तगण 'सेल्युलर जेल'समोर गोळा झाले. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर भय, करुणा, दया, शोकाकुलता आदि भाव दिसून येत होते. तेवढ्यात एका काळ्या रंगाच्या व्हॅनमधून जपानी सैनिक तेथे आले. बंदी केलेल्यांना व्हॅनमध्ये बसण्याचा आदेश दिला. एक एक जण व्हॅनमध्ये चढू लागले. वातावरण शोकसागराने व्याप्त झाले. काहींनी तर हंबरडे फोडले. थोड्याच अवधीत व्हॅन सुरू झाली. व्हॅनमध्ये चढत असताना बंदिवासियांनी आपल्या आप्तजनांना फक्त डोळा भरून पाहिलं. बोलण्याची संधी मात्र मिळाली नाही. तेव्हा दुरूनच ओरडून त्यांनी आपापल्या नातेवाईकांना स्वतःची, मुला-बाळांची काळजी घ्या म्हणून सांगितले. व्हॅनमध्ये सर्वत्र गंभीरता पसरली. आपणास कुठे नेत आहेत? याची कुणालाही कल्पना नव्हती.

पोर्ट-ब्लेअर शहराच्या मुख्य रस्त्यावरून व्हॅन विमानतळाकडे वळली. लंबा लाईन विमानतळावरून आणखी पुढे धावू लागली. सतत अठरा किलोमिटर धावल्यानंतर व्हॅन उभी राहिली. सकाळची वेळ असूनही, गर्द झाडीमुळं आणि आकाशातील काळ्याकुट्ट ढगांमुळं सर्वत्र अंधार पसरला होता. आणि म्हणून ठिकाण कोणतं? ओळखता आलं नाही. तेवढ्यातच हुकूम सुटला, 'नीचे उतरो.' सर्वजण लगेच खाली उतरले. जवळच फर्लांगभर अंतरावर एका टेकडीवर चढावयास सांगितले. चढून गेल्यावर तेथे त्यांच्या नजरेस इंग्रजी 'एल' आकाराचा खड्डा नजरेस पडला. जो आधीच खोदून ठेवलेला होता. सर्व ४४ जणांना त्या खड्ड्याच्या सभोवार उभं राहण्याचा आदेश दिला. त्यानुसार सर्वच ४४ बंदी त्या सभोवती उभे राहिले.

त्यांचे हातपाय बांधण्यात आले. त्यांच्या चेहऱ्यावर बुरखे चढविण्यात आले. तदनंतर पुढचा हुकूम सुटला. एक शिपाई धाड् धाड् गोळ्या झाडू लागला. तसतसे बंदी छातीवर गोळ्या झेलून, त्या खड्ड्यात पडत होते. अशा तऱ्हेनं जपानी सैनिकांनी आपल्या निष्ठुर कृत्यानं, भारतीय जनतेचा छळ केला. ज्याठिकाणी हे घडलं, ते ठिकाण 'हम्प्रीगंज' म्हणून ओळखल्या जाते. अशा ह्या कठोर, निर्दयी जपान सरकारसोबत वाटाघाटी करताना, नेताजी सुभाषचंद्र बोस यांना अंदमान-निकोबार द्वीपसमूहाचा प्रश्न सोडविताना मोठा पेच पडला होता. पण नंतर सुभाषबाबूंनी जपान्यांवर मात केली.

जपान सरकारचा विचार होता की, "अंदमान-निकोबार द्वीपसमूह,

भारताच्या मुख्य भूमीपासून जवळपास १२५५ किलोमीटर अंतरावर आहे. भौगोलिकदृष्ट्या थोडा लांबच आहे. पूर्वेकडील भागात ब्रह्मदेश (आजचे नाव म्यानमार) तसेच दक्षिणेकडील भागात इंडोनेशिया देश असल्यामुळे, भारताने या द्वीपावर अधिकार सांगण्यात फारसे औचित्य नाही. आणि म्हणून ते द्वीप भारत सरकारने, जपानला दुसऱ्या महायुद्धात हार्दिक सहयोग दिला, त्याबदल्यात भेट म्हणून देण्यात यावेत.'' मधोमध पसरलेला अथांग सागरसुद्धा आपला हक्क सांगण्यासाठी जपाननं पुढं केला होता.

पुढे भारतीय देशभक्तांनी जपानमध्ये 'आझाद हिंद सेना' स्थापन केली. राजकीय डावपेच म्हणून प्रारंभी ती जपानसाठी अनुकूल होती. जपान सरकारने आपल्या इच्छेनुसार श्री. रासबिहारी बोस यांना तिचा नेता मानले. तो काळ वैयक्तिक क्रांतिकारक बनून या अत्याचारी इंग्रजांना धडा शिकवण्याचा प्रारंभिक काळ होता. अशांचे कुशल नेता श्री. रासबिहारी बोस होते. परंतु त्यांना सामूहिक क्रांतिदलाचे संघटन करण्याविषयी फारसा अनुभव नव्हता. श्री. बोस आधीपासून पूर्वभारत सोडून जपानमध्ये जाऊन वसले होते. मायभूमीपासून ते पूर्णतः अलिप्त पडले होते. परंतु त्यांचा मायभूमीशी संपर्क जे क्रांतिकारी लोक जपानमध्ये जात, आणि त्यांना भेटून सर्व वार्ता सांगत, त्यामुळे यायचा. श्री. रासबिहारी बोस यांनी जपानमध्येच विवाह केला. त्यांनी तेथील नागरिकत्वही स्वीकारले होते आणि जपानमधील मोठमोठ्या अधिकाऱ्यांशी त्यांचे संबंध अत्यंत घनिष्ट बनले होते. म्हणूनच जपान सरकार बोस यांना पुढे करू इच्छित होते.

जपान सरकारचा विश्वास होता की, ''श्री. रासबिहारी बोस हा जपानमधील अशा भारतीय क्रांतिकारी नेत्यांचा नेता आहे की, जो भारताचे हित लक्षात घेऊन जपान सरकारच्या सल्ल्यानुसार वागेल. जपान सरकारचे मत मानेल, याकरिता जेव्हा युद्धाच्या सुरवातीला जर्मन सरकारने, जपान सरकारला गुप्त संदेश पाठविला होता, 'जर गरज भासली तर ते नेताजी सुभाषचंद्र बोस यांना जपानला पाठविण्याची व्यवस्था करू शकतील.' त्यावेळी जपान सरकारकडून लगेच उत्तर पाठविले गेले की,

''जपानमध्ये या कोटीतील एक जुना नेता श्री. रासबिहारी बोस हे आधीपासूनच असल्यामुळे दुसऱ्या नेत्याची सध्यातरी गरज भासत नाही.'' आणखी एक थोर व्यक्ती राजा महेन्द्रप्रताप सुद्धा त्यावेळी जपानमध्येच वास्तव्य

करून होते. त्यांनी पहिल्या महायुद्धाच्या वेळी काबूलमध्ये 'आझाद हिंद सरकारची' स्थापना करून, तेथून त्यांनी इंग्रजांना तंग करून सोडले होते. शिवाय दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी इंग्रजांविरुद्ध लढा देण्यासाठी स्वतःच्या अध्यक्षतेखाली एक गुप्त कौन्सिल बनविली. त्या कौन्सिलचे उपाध्यक्ष श्री. रास बिहारी बोस आणि सचिव श्री. आनंदमोहन सहाय हे होते. परंतु जपान सरकारचा राजा महेंद्रप्रतापवर तेवढा विश्वास नव्हता. शेवटी त्यांच्यावर युद्ध काळात प्रतिबंध ठेवून, त्यांना त्यांच्याच घरात बंदिस्त ठेवल्यासारखे केले आणि उदरनिर्वाहासाठी नाममात्र भत्ता ठरवून दिला. त्यामुळे ते दुसऱ्या महायुद्धात काही करू शकले नाही.

अशा स्थितीत युद्धबंदी, देशभक्त सैनिकांनी श्री. रासबिहारी बोस यांना नेता मानले. तसे केले नसते तर जपान्यांना वाटले असते, 'आमच्या विरुद्ध हे संघर्ष करत आहेत. यांचा रासबिहारीवर विश्वास नाही.' अर्थात भारतीय सैनिकही रासबिहारी बोसच्या देशभक्तीवर अत्यंत प्रभावित होते. त्यांचा कोणी विरोधही करू इच्छित नव्हते. रासबिहारींनी पूर्ण भक्तिभावाने आझाद हिंद सेनेला आपले नेतृत्व प्रदान करण्याचा आटोकाट प्रयत्न केला.

मात्र त्यांना अशा क्रांतिदलाचे नेतृत्व करण्याचा अनुभव नव्हता. तसेच त्यांची वृद्धावस्थासुद्धा त्यांच्या कार्याआड येऊ लागली. जपान सरकारची जेव्हा पिछेहाट होऊ लागली तेव्हा त्यांना वाटू लागले, श्री. रासबिहारी बोस यांच्यावर निर्भर राहून काम भागणार नाही. त्यांच्यामुळे युद्धात विजयी होणे पण शक्य नाही. परिणामस्वरूप शेवटी नेताजी सुभाषचंद्र बोस यांना बोलाविण्यात आले.

त्यावेळी रासबिहारी बोस यांनी एका उत्सवात आपले त्यागपत्र आणले. भारतीय सेनेची सूत्रे मोठ्या सद्‌भावाने नेताजींना सोपविली. त्यावेळी ते म्हणाले होते, "मी आता वयस्कर झालो. मला विश्वास वाटतो की, आमचे तरूण नेता विजय मिळवून देतील. मी त्यांना यश चिंतितो!"

नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी आपलं पहिलं भाषण, जपानी अधिकाऱ्यां-समक्ष देऊन भारतीय सैनिकांना जो जीवन संदेश दिला, जी स्फूर्ती दिली, त्यामुळे आझाद हिंद सेनेचे स्वरूप एकदम बदलून गेले. भारताच्या स्वातंत्र्यासाठी सैनिक रक्ताने सह्या करू लागले. आणि धनराशीचे ढीग नेताजींच्या समोर साचू लागले. जपानी सरकारला नेताजी सुभाषचंद्र यांच्या तेजस्वी व्यक्तित्वाचा अंदाज आला. त्यांची खात्री पटली की, 'नेताजी आता

आपल्या हातची बाहुली बनू शकत नाहीत.' परिणामतः त्यांचा पूर्ण व्यवहारच बदलला. एतद्देशीयांचा छळ करणे त्यांनी थांबवले.

पहिल्याच बोलण्यात नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी अशा काही अटी मान्य करून घेतल्या की, त्या इतरांना कुणासही अशक्यप्राय होत्या. उदाहरणादाखल, "भारतीय सैनिक जपानी सैनिकांना सॅल्यूट करणार नाहीत. उलट बरोबरचे समजून परस्परास अभिवादन करतील. भारतीय सेनेचे कमांडर भारतीयच राहतील. आणि जेथे कुठे भारतीय तथा जपानी सेना एकत्र लढतील तिथे दोन्ही सेनेचे, दोन कमांडर राहतील. आणि व्यूहरचनेबाबत दोघे आपापसात विचार-विनिमय करून निर्णय घेतील. भारतीय प्रदेशातील युद्धाच्या बाबतीत नेताजी सुभाषचंद्र बोस यांचाच अंतिम निर्णय समजला जाईल. कारण जपानी, भारतीय जनतेच्या मनोवृत्तीबाबत अज्ञानी आहेत."

त्यानंतर जपान्यांना नेताजी सुभाषचंद्र बोस यांना स्वतंत्रपणे 'आझाद हिंद सेने'ची स्थापना करण्याची परवानगी दिली. नेताजींनी जपानी सरकारला स्पष्ट करून सांगितले होते, "जपान सरकार, जी काही मदत देईल, ते ती मित्र राष्ट्राची भेट म्हणून सादर स्वीकारतील आणि ते केवळ जपान सरकारवरच निर्भर राहणार नाहीत. त्यांच्यावर भार बनणार नाहीत. आम्ही स्वतः आमचे सरकार तथा सैनिक उभे करू." नंतर स्वतः जपानी अधिकारी सुद्धा आपल्या कामासाठी ब्रह्मदेशाकडून सहायता मिळवून देण्यासाठी नेताजी सुभाषचंद्र बोस यांना विनंती करीत होते. जपान सरकारबरोबर वाटाघाटी करताना सर्वात मोठा पेच नेताजी सुभाष बोस यांना, "अंदमान-निकोबार द्वीपांचा प्रश्न सोडविताना पडला होता." जपानी सरकारचं म्हणणं होतं, "अंदमान-निकोबार द्वीप-समूहावर अधिकार सांगण्यात काहीच औचित्य नाही. त्यामुळे भारताने ते द्वीप जपानने युद्धकाळात जो हार्दिक सहयोग दिला, त्या बदल्यात भेट म्हणून द्यावेत."

याच इराद्याने जपानने या द्वीपसमूहावर १९४२ साली अधिकारही मिळविला होता. भारतीय जनतेस अतोनात त्रासही दिला होता. तसेच जपानी सैनिक 'सेल्युलर जेल'ला उध्वस्त करून, भारतीयांच्या मनातील आदरभाव नष्ट करू इच्छित होते. त्यावेळी नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी या गोष्टीचा गंभीरतापूर्वक विचार केला ते अशा काही ठोस पुराव्याच्या शोधात लागले की, कसंही करून हे द्वीप भारताच्याच अधिकारात राहतील. युद्धशास्त्रदृष्ट्या ते

राहणे योग्य होते. शिवाय अंदमानवरचा भारताचा अधिकार नेताजींना बिनतोड युक्तिवादाने मांडायचा होता.

शेवटी श्री. आनंदमोहन सहाय, जे नेताजींचे मुख्य सहयोगी होते, शिवाय आझाद हिंद सरकारचे मंत्री सुद्धा होते, त्यांनी नेताजींना सल्ला दिला, "तुम्ही, जपान्यांना श्राईन (यशकुनी) द्वीपांचे उदाहरण देऊन अंदमान-निकोबार द्वीपांच्या बाबतीत भारताचा दावा त्यांच्यासमोर मांडा." नेताजींना ही बाब पटली. 'श्राईन अथवा इसेश्राईन' द्वीपसुद्धा जपानच्या भूप्रदेशापासून बरेच दूर सागरात, (आपल्या अंदमान-निकोबारसारखे) स्थित आहे. जपानी लोकांच्या व त्यांच्या पूर्वजांच्या समाध्या तेथे आहेत. तो उत्सव करतात. त्या द्वीपाविषयींच्या जपान्यांच्या भावना कशा उदात्त आहेत. मग अंदमानसंबंधी भारताच्या का असू नयेत ?

नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी, याच मुद्याला धरून आपला अधिकार अंदमान-निकोबार द्वीपसमूहावर प्रस्तुत केला. त्यांनी जपानी सरकारकडे स्पष्टीकरण केले, "हे द्वीप इ. स. १८५७ पासून, तर आजपर्यंत स्वातंत्र्य सैनिकांचे आदरणीय स्थान, शहीद स्मारक आहे. त्यांच्या रक्ताने आणि श्रमाने, तेथील एक एक कण रंगलेला आहे. हे द्वीप त्यामुळे आम्हा भारतीयांना, मुख्यभूमीपासून दूर जरी असले, तरीसुद्धा पवित्र आहेत, प्रिय आहेत. जितके तुम्हास श्राईन द्वीप आहेत, किंबहुना त्यापेक्षा जास्त पावन आहेत. त्यामुळे आम्ही तुम्हास ते देणार नाही आणि दुसरी बाब अशी की, आमचे जे सरकार आहे ते युद्धकाळात स्थापन झालेले आहे. विधिवतपणे जनतेकडून निवडले गेले नाही आणि म्हणून अशा प्रकारचे स्थायी निर्णय घेण्याचा मला अधिकार नाही."

नेताजी सुभाषचंद्र बोस यांचा हा तर्क जपान्यांना मानावा लागला. लगेच अंदमान-निकोबार द्वीपसमूहाची राजधानी, पोर्ट-ब्लेअर येथे असलेल्या जपानी कमाण्डरला आद्देश पाठवून कळविले, "अंदमान-निकोबार द्वीप समूहातील शासन हे नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या सल्ल्यानुसार चालवावे." त्यांच्या भेटीच्या वेळी म्हणूनच त्यांना राजकीय सन्मान देण्यात आला होता. पूर्वीच्या काळात जपान्यांनी अंदमानवासीयांवर जे निर्घृण अत्याचार केले त्यांचे नेताजी सुभाषचंद्र बोसांच्या मुत्सद्देगिरीमुळे काही अंशी परिमार्जन झाले. आंतरराष्ट्रीय युद्धसंदर्भित राजकारणात पलिकडे अंदमानला आपल्या देशाच्या सुरक्षिततेच्या संदर्भात खूपच महत्त्व आले.

• •

**************************

# परकीयांच्या दृष्टिकोणातून नेताजी

## डॉ. श्री. प्र. कुळकर्णी

**************************

नेताजींच्या महाकर्तृत्वाचा काळ प्रामुख्याने विदेशात गेला. देशोदेशीच्या सहस्रावधी नागरिकांशी त्यांचा संबंध आला. त्यात सामान्यांपासून असामान्यांपर्यंत सर्व स्तरातील लोक होते. त्यात राजे, महाराजे, पंतप्रधान होते, त्यात हुकुमशहा होते, त्यात सेनापती होते तसेच शिपाई होते, मुत्सद्दी होते तसेच महापंडित होते, क्रांतिकारक होते तसेच अहिंसावादी होते, राज्यकर्ते होते तसेच सामान्य प्रजाजन होते. या सर्वांचे काळानुरूप, स्वार्थानुरूप भारताविषयी, भारतीयांविषयी आणि म्हणून सुभाषचंद्र बोस या व्यक्तीविषयी पूर्वग्रह अधिक व ज्ञान कमी अशी स्थिती होती. शिवाय यातील उच्चपदस्थ माणसे जगाचा चेहरा मोहरा बदलविणाऱ्या महायुद्धात अग्रेसर होती. राजनीती आणि सामर्थ्य पणाला लावून बुद्धिवंत नेते आणि पराक्रमी सेनापती आव्हान-प्रतिआव्हानाचा खेळ खेळत होती. अशा अत्यंत तरल पटावर भारतीय स्वातंत्र्याचे प्यादे पुढे नेणे ही अत्यंत दुष्कर गोष्ट नेताजींनी साध्य केली. त्यांना ती करता आली. कारण नेताजींचे विदेशीयांना भावलेले पारदर्शक व्यक्तिमत्व, त्यांचे सच्चेपण, त्यांची देशभक्ती आणि त्याहून अधिक भावली ती त्यांची आत्मसन्मानाची वृत्ती. पुढील पानात हीच कहाणी संकलित आहे.

नेताजी विदेशात भारतीय स्वातंत्र्याला मदत मिळविण्यासाठी गेले होते. देशाचा सन्मान परत मिळविण्यासाठी सन्मान न गमावता याचना करायची किमया त्यांना करायची होती. नेताजींनी तेच केले. प्रत्येक मदत आपल्या अटीवर घेतली, प्रत्येक निर्णय भारतीय हितानुसार घेतला. विदेशातील नेताजींच्या वागणुकीचा पोत एकदम खानदानी होता. ते वावरले राजासारखे, जगले

शिपायासारखे, लढले सेनापतीसारखे, बोलले बुद्धिवंतासारखे. योग्याची स्थितप्रज्ञता, सुशिक्षिताची सभ्यता, सज्जनाची सहृदयता, प्रतिभावंताची बहुश्रुतता या गुणांनी नेताजींनी जग जिंकले. मराठी माणसाला छत्रपतींची आठवण यावी असेच हे गुण आहेत. असेच हे कार्य आहे. नेताजी शिवाजीला आदर्श मानत होते. लोक त्यांना देशगौरव मानतात. ते योग्यच होते. हे विदेशियांच्या उद्‌गारातून उघड होते.

मुलाचे पाय पाळण्यात दिसतात आणि नेतृत्वाला पंख महाविद्यालयात फुटतात. सुभाषच्या अन्यायविरोधी मतांमुळे ऑटन प्रकरणात त्यांना निष्कासित करणाऱ्या प्राचार्य जोन्स यांना नेताजी "तापदायक" वाटले. त्यांनी, "You are most troublesome man in the college" या शब्दात युवा सुभाषची बोळवण केली. तर प्रा. ऑटन, ज्यांच्यामुळे सर्व घडले व जे तद्दन एतद्देशीयांना हिणवत त्यांनी पुढे सुभाषवर गौरवपर कविता केली. सुभाषमधील न्यायप्रियता देशभक्ती त्यांनाही जाणवली. तशीच ती जाणवली "फीटस् विल्यम हॉल'मधील प्रा. रेडवे यांना. आय्. सी. एस. सेवेचे त्यागपत्र देऊ नये म्हणून रेडवे यांना मध्यस्थ केले गेले. पण रेडवेंनी तसे काही न करता सुभाषबाबूंनी दाखविलेल्या धैर्याबद्दल त्यांचे अभिनंदन केले. ते पत्रकार होणार हे ऐकताच उत्तेजन देऊन म्हणाले, "फारच छान! पत्रकारिता व अध्यापन असे विषय आहेत की आपण ताजे राहतो. तू जे करणार आहेस ते मला पसंत आहे." लठ्ठ पगाराच्या आमिषांना बळी न पडणारा व बुद्धिजीवी नेतृत्वाला योग्य असा हा तरुण आहे हे रेडवेंनी ओळखले. तसेच याचे मन वळवणे व्यर्थ आहे हेही ओळखले.

इंग्रज माणसांच्या मनात सुभाषची प्रतिमा 'भयंकर माणूस' ही होती. मंडाले तुरुंगात पॅटरसनने त्यांची भेट घेतली तेव्हा काढलेले उद्‌गार मिस्किल असले तरी सूचक होते. ते म्हणाले, "हिंदुस्थानातील सर्वात भयंकर माणसाला भेटायला मला आनंद होतो आहे." आनंद, बुद्धिवान प्रतिस्पर्ध्याला भेटण्याचा होता. भीती क्रांतिकार्याची होती, व्यापक संघटन कौशल्याची होती. त्यामुळेच सुभाषबाबूंना प्रकृती स्वास्थ्यासाठी युरोपमध्ये पाठवण्याचे चालले होते त्यावेळी भारतमंत्री बर्कनहेड यांनी सुभाषला युरोपात पाठवू नये असे म्हटले. कारण तसे केले तर त्यांचा क्रांतिकारकांशी संबंध येईल. डब्ल्यू. जे. क्लाम्मन यांनी तर

स्पष्टच म्हटले की, "बोस अत्यंत अनुभवी संघटक आहेत त्यांच्या हाती 'कच्चा माल' लागता उपयोगी नाही." हॅरी हेग यांनी आपल्या अहवालात (४ जाने. १९२९) "सुभाष सर्वांपेक्षा (काँग्रेस नेत्यांपेक्षा) अधिक प्रक्षोभक आहेत" असा निर्वाळा दिला. हे सर्व सुभाषबाबूंचे क्रांतिकार्य सुरू होण्यापूर्वीचे आहे हे लक्षात घेता सुभाषचंद्राच्या कर्तबगारीविषयीचे ब्रिटिशांना झालेले पूर्वदर्शन किती बिनचूक होते याची कल्पना येते.

खरे तर या वेळपावेतो गांधीजींनी जनमानसावरची आपली पकड सिद्ध केली होती. तरी इंग्रजांना भीती सुभाषबाबूंची वाटत होती. कारण त्यांच्या मते गांधी 'भयंकर' नव्हते. उलट गांधीजी अहिंसक लढा हाताबाहेर जाऊ देणार नाहीत याची त्यांना खात्री होती. गांधी न कळलेल्या एलन विल्किनसन ह्या खासदाराने म्हटले होते की, "Gandhi was the best policeman the Britisher had in India." सशस्त्र लढ्याची भीती गांधीजींकडून नव्हती तशीच ती थकलेल्या रासबिहारींकडून नव्हती तुरुंगात नसले तरी स्थानबद्धतेत असलेल्या सावरकरांकडूनही नव्हती. सुभाषचंद्राची लोकप्रियता आणि प्रखरता मात्र अस्वस्थ करणारी होती. या सर्वात इंग्रजांचा दृष्टिकोण जवळ जवळ लोकमान्यांकडे पाहण्याचा जो होता तोच दिसतो.

भारतातील आणि इंग्लंडमधील राज्यकर्त्यांना सुभाष 'भयंकर' वाटत होते. इंग्लंडमधील वृत्तपत्रांना व त्यांच्या टीकाकारांना ते अहंमन्य वाटत होते. पण सुभाषचंद्रांचा 'इंडियन स्ट्रगल' हा ग्रंथ प्रकाशित झाला आणि वृत्तपत्रांचा दृष्टिकोण पूर्णतः बदलला. मँचेस्टर गार्डीयन लिहिते, "सुभाषचंद्र बोस अहंकारी आणि असहिष्णु आहेत, असे त्यांचे टीकाकार म्हणतात. परंतु बोस यांच्या ग्रंथातून त्यांचे जे दर्शन घडते ते या आक्षेपांपेक्षा वेगळेच वाटते. त्यांनी सर्व संबंधित पक्षांना आणि व्यक्तींना न्याय दिला आहे. या ग्रंथात इतर कोणाहीपेक्षा गांधींवर कडक टीका आहे. त्या टीकेत तथ्यही आहे पण तिच्यात किंचितही आकस किंवा दुष्टावा नाही. हे गांधींच्या अनुयायांना देखील मान्य करावे लागेल."

डेली हेराल्ड या वृत्तपत्राचा अभिप्राय पहा, "प्रचलित भारतीय राजकारणावरचा हा उत्कृष्ट ग्रंथ असून आपली मने निर्भीडपणे मांडूनही कोणावरही अन्याय झालेला नाही. ग्रंथलेखक चाळीशीच्या आतला असून

कोणत्याही देशाच्या राजकीय जीवनाचा आधार ठरावा, भूषण व्हावा असेच त्याचे आतापर्यंतचे कार्य आहे.''

त्याचवेळी कॉजवे हॉलमध्ये नेताजींची एक सभा झाली त्याचे वृत्त (१९ जाने. १९३८) देताना मँचेस्टर गार्डीयन म्हणते, ''सुभाषचंद्र बोस यांच्या प्रसन्न आणि शांत स्वभावामुळे प्रत्येकजण प्रथमदर्शनीच प्रभावित झाला. बोस यांनी भारताची भूमिका निःसंदिग्ध शब्दात मांडली.''

संडे टाईम्सने लिहिले, ''इंडियन स्ट्रगल ग्रंथातील मतांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.'' नेताजींच्या न्यायप्रियतेने आणि विधायकतेने घडवलेले हे मतपरिवर्तन होते.

अर्थात सुभाषबाबूंची मते पटली तरी ती मान्य करणे सत्ताधिकाऱ्यांना शक्य नव्हते. म्हणून की काय भारतमंत्री लॉर्ड झेटलंड म्हणतात, ''या माणसाचे हसणे फार गोड आहे पण बोलणे तेवढेच तिखट.'' सुभाषचंद्रांचा स्त्रियांशी संबंध फार थोडा येई. पामेला वारबर्ग ह्या इंग्रज स्त्रीला नेताजी स्त्रीद्वेष्टे वाटले. यात इंग्रजी स्वयंनिष्ठता अधिक होती की नेताजींची अलिप्तता हे सांगणे कठीण. पण कित्ती कुर्ती ह्या जर्मन विदुषीला मात्र सुभाष तसे भासले नाहीत.

नेताजींच्या ठिकाणी प्रथमभेटीतच मने जिंकून घेण्याची विलक्षण हातोटी होती याची कबूली बहुतांशी विदेशीयांनी दिली आहे. त्यांना पाहिले, त्यांचे विचार ऐकले की चमत्काराप्रमाणे लोक आपले विचार बदलवीत. हिटलर, मुसोलिनी, टोजो या तिघांविषयी असेच घडले. या प्रत्येकाची सुभाषबाबूंशी पहिली भेट अडचणीतून झाली. तिघेही प्रथम सुभाषला भेटायला उत्सुक नव्हते. एन्. जी. गणपुले लिहितात, ''महायुद्धात गुंतलेल्या जर्मनांसाठी सुभाष एक समस्या होती. त्यांच्याशी कोणत्या प्रकारचे संबंध ठेवावेत हे त्यांना कळत नव्हते. आनंदाने त्यांचे स्वागत करावे की थंडपणे त्यांना दूर ठेवावे याविषयी ते गोंधळले होते.'' ते सावध होते याचे कारण गणपुले सांगतात, ''हिटलरला इंग्रजांच्या गुलामगिरीत खितपत पडलेल्या भारतीयांविषयी सहानुभूती नव्हती. त्याच्या सत्तापिपासु मनाला, एवढी लोकसंख्या आणि साधने जर्मनीजवळ असती तर तिने सर्व जगावर राज्य केले असते, असे वाटणे स्वाभाविक आहे.'' शिवाय ''नॉर्डिक वंशांचे वर्चस्वाने पछाडलेल्या हिटलरला इंग्रजांबद्दल अधिक जवळिक वाटत होती.'' सुभाषचंद्र केवळ स्वतःच्या पाठिंब्यावर तेथे उभे होते. भारतीय पक्षाचे.

समूहाचे, गटाचे प्रतिनिधी म्हणून नव्हते हे लक्षात घेता हिटरलने केलेल्या मदतीचे मूल्य तर कळते पण त्याहून अधिक आश्चर्य वाटते नेताजींनी निर्माण केलेल्या विश्वासाचे, तेही अल्प भेटीत ! नेताजींची हिटलरशी भेट झाली तेव्हा तेथे परराष्ट्रमंत्री रिबेनट्रॉप, बोरमन, हिमलर आणि गोअरिंग उपस्थित होते. या भेटीत हिटलरने हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नाविषयी बरीच आस्था दाखविली. अर्थात प्रतिसरकार स्थापून त्याला मान्यता मिळवावी हा उद्देश मात्र सफल झाला नाही. त्या व्यतिरिक्त सर्व मदत नेताजींना मिळाली. आकाशवाणी केंद्र मिळाले, युद्धकैद्यांना नेताजींच्या सैन्यात भरती होण्याची अनुमती मिळाली. हे सर्व झाले याचे कारण जागतिक राजकारण तर होतेच पण नेताजींचे पारदर्शकत्व हेही होते. मौजेची बाब म्हणजे सुभाषबाबूंनी हिटलरच्या आक्रमक वृत्तीच्या विरोधात निवेदनही दिले होते. तरी नेताजी यशस्वी होत गेले. कारण जर्मन सेनादलातील गुप्तहेर खात्याचा अहवाल (Military Intelligence Service) म्हणतो, "साथीदार शब्दाला आज जो एक हीन अर्थ प्राप्त झाला आहे त्या अर्थाने बोस आमचे साथीदार (collaborator) कधीच नव्हते. ते केवळ भारतीय देशभक्त होते. केवळ जर्मनीच्या हिताचे असे कोणतेही काम करण्यास त्यांचा स्पष्ट नकार होता. पण भारतासाठी वाट्टेल ते करण्याचा, अगदी त्यामुळे जर्मनीचे हितसंवर्धन होत असले तरी, तेही करण्याची त्यांची तयारी होती."

या निर्भीड प्रतिमेमुळेच जर्मन मुत्सद्दी निरुत्तर होऊन उपकार म्हणून नाही तर जर्मनीची गरज म्हणून सुभाषला मदत देते झाले. स्वतंत्र हिंदुस्थान सरकारच्या घोषणेला विरोध करताना बोरमन म्हणाला, "हिंदुस्थानात पेटलेल्या आगीत तेल ओतण्याचे काम आम्ही तेवढे करीत आहोत. त्यात स्वतः होरपळू नये याची दक्षता मात्र घेत आहोत" गोबेल्स निरुपायाने म्हणाला "विरोध तर आहे पण अवकाशात काम करता येणार नाही." हिटलरला जसे राजकीय महत्व पटले होते तसेच सुभाषही पटले होते असे दिसते. उदा. तो म्हणतो,

"सुभाषचंद्र यांचा दर्जा माझ्याहून मोठा आहे. मी केवळ आठ कोटींचा प्रतिनिधी आहे ते चाळीस कोटींचे........

"Your Excellency I am ready to tear of my triparte agreement with Japan if she should refuse to honour your wishes with respect to Indian Independence."

पहिल्या वाक्यात शिष्टाचाराचा भाग असेल, दुसऱ्यात राजनीती असेल तरीपण हिटलरसारखा हुकुमशहा एका दूरस्थ नेत्याचा, अधिकृतरीत्या कोणीही नसलेल्या व्यक्तीचा सहज एवढा सन्मान करतो याचा अर्थ त्याला ती व्यक्ती सन्मानपात्र आहे याची खात्री मनोमन होते. राजनीतिज्ञांना शब्दांपलिकडे पहावे लागते. सामान्यांच्या बाबतीत सारे उघड असते.

खरे सुभाष जाणून घ्यायचे असतील तर त्या असंख्य जर्मन-जपानी सैनिक अधिकाऱ्यांना विचारा की ज्यांच्या खांद्याला खांदा लावून सुभाष आघाडीवर लढले. अडालबर्ट सीफ्रीज श्री. गणपुले यांच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिताना १० ऑगस्ट १९५९ ला म्हणतात, "अनेकांना सुभाष विचारमग्न आणि अलिप्त वाटत. पण ज्यावेळी ते आमच्यासमोर भाषण करीत त्यावेळी त्यांच्यातील संघर्षाचा अंगार आणि क्रांतिकारकत्व जाणवू लागे. आम्हा प्रशिक्षणाधिकाऱ्यांना (हे भारतीय सैनिकांना जर्मनीत शिक्षण देत) सुभाषचंद्राची भेट एक अप्रूप घटना वाटे. आमच्या मनातील सुभाषची स्मृती म्हणजे स्वतःच्या देशासाठी व लोकांसाठी स्वतःलाही खर्ची घालून सदैव संघर्षरत व्यक्तिमत्व" नेताजींचे हे समर्पण आणि सच्चेपण जर्मन आणि जपानी सैनिकांना आणि अधिकाऱ्यांना पटले होते तसेच इंग्रजांनाही. सर ऑकिनलेक यांचा चरित्रकार जॉन कॉनवेल लिहितो, "सुभाष बोस यांच्या इतकी गुणवत्ता असलेल्या मोठ्या नेत्याला भेटण्याची संधी त्या भारतीय अधिकाऱ्यांपैकी फार थोड्यांना आधी लाभली होती. हे सर्व अधिकारी दिपून गेले, हरखून गेले. त्यांच्यापैकी प्रत्येकाची खात्री झाली की आपण ज्याची काही वर्षे वाट पहात होतो तोच हा सच्चा पुढारी" नेताजींनी सच्चेपणाने निर्माण केलेल्या विश्वासाचे भक्कमपण एवढे होते की जर्मन सेनापती क्लाजवित्झ म्हणाला, "स्वतःवर विश्वास ठेवा 'चलो दिल्ली' हा चमत्कार नक्कीच घडून येईल." हे नेताजींनी कृतीने सिद्ध केले होते केवळ बोलून नव्हे. स्प्रिंगींग टायगरचे लेखक ह्यू टोये लिहितात, "व्यक्तिगत रीत्या त्यांनी अमर्याद आणि अचूक आत्मविश्वासाचेच उदाहरण घालून दिले होते" ह्यू टोयेने याला जोडून सूचकतेने पुढे टीकाही केली.

शूरांना नेताजी भावले ते त्यांच्या पारदर्शक सच्चेपणामुळे आणि परमोच्च त्यागी वृत्तीमुळे. पंडितांना सुभाष भावले ते त्यांच्या आंतरिक सौंदर्यामुळे. सुभाषचे क्रांतिकारी विचार न पटणारे, गांधीजींच्या विचारांवर श्रद्धा असणारे रोमाँ रोलाँ इंडियन स्ट्रगलबद्दल लिहितात, "भारतीय आंदोलनाच्या

इतिहासासाठी हा अनिवार्य ग्रंथ आहे. इतिहास संशोधकाला आवश्यक सुगमता आणि उच्च दर्जाची मानसिकता या गुणांचा प्रत्ययच तुम्ही त्यात देता. तुमच्यासारख्या आंदोलनात कृतिशील असणाऱ्या माणसाने पक्षानिभिवेश बाजूला ठेवून मूल्यमापन करावे ही बाब क्वचितच घडते." नेताजींच्या या न्यायप्रियतेमुळेच नाझींची मदत घेणारे नेताजी अप्रिय झाले नाहीत. आणि लोकांनी त्यांची मैत्रीही तोडली नाही. कित्ती कुर्ती या विदुषी म्हणतात, "आज सुभाष बोसांना ऐकल्यावर गांधी कळले, नेहरू कळले आणि बोसही कळले. त्यांचा तत्त्वज्ञान, मानसशास्त्र आणि योगांचा अभ्यास पाहून आम्ही थक्क झालो." रोमाँ रोलाँशी चर्चा झाल्यावर "गांधीचाच मार्ग बरोबर आहे" असे ठामपणे म्हणूनही शेवटी या पंडिताला मान्य करावे लागले की सर्व मार्ग खुंटल्यावर अपद्धर्म म्हणून क्रांती करायला हरकत नाही. विदेशियांच्या संदर्भात एक बाब सतत जाणवते की, नेताजींच्या एकूण दर्शनात असे काहीतरी होते की ज्यामुळे लोक त्यांचेकडे आकृष्ट होत. त्यांचे आंतरिक पावित्र्य त्यांच्या दर्शनी रूपात मिसळले होते. कित्ती कुर्ती सुभाषच्या पहिल्या भेटीचे वर्णन करतात :

"Walking to my apartment I was suddenly struck by a strange figure, slowly approaching me. He was a tall slender man, obviously Indian. He was clad in a dark dress not unlike priest's. He wore a cream coloured Gandhian cap, that made him stand out. His face was dark olive, round and child like yet striking intelligent."

(घराच्या वाटेवर असताना अचानक एका अपरिचित गृहस्थाकडे माझे लक्ष वेधले. ते संथ पावलांनी माझ्या दिशेने येत होते. ते उंच आणि सडपातळ गृहस्थ भारतीय असल्याचे उघड होते. त्यांनी धर्मगुरूंसारखा दिसणारा काळा पोषाख केला होता. त्यांच्या डोक्यावर क्रीमसारख्या पांढऱ्या रंगाची गांधी टोपी होती. त्यामुळे ते इतरांपेक्षा उठून दिसत होते. त्यांचा चेहरा पिवळट गोरा, गोल आणि बालसुलभ तरी प्रकर्षाने बुद्धिमान होता.)

सुभाषबाबूंच्या निरागस चेहऱ्यावरची बुद्धिमत्ता अनेकांनी उल्लेखिली आहे. पण ह्यू टोये यांना असे वाटते की, नेताजी आपल्या दर्शनी रूपाची जाणिवपूर्वक काळजी घेत. ते लिहितात :

"Personally, he gave an example of boundless, flawless

confidence. His face set in an expression of naughty determination, his heroic pose. incistance on being supreme commander, the immaculate uniform the invariable field books - these were intended to make Netaji so powerful focus of loyal and fighting spirit of INA."

"व्यक्तिगतरीत्या त्यांनी अमर्याद आणि अचूक आत्मविश्वासाचेच उदाहरण सर्वांपुढे ठेवले. त्यांचा करारी चेहरा, वीराला साजेशी ऐट, सर्वोच्च सेनापतीपद स्वतःकडे ठेवण्याचा आग्रह, स्वच्छ पोषाख, व्यक्तित्वाचा अविभाज्य भाग झालेला सैनिकी पेहेराव या सर्वांमागचा उद्देश नेताजींना आझाद हिंद सेनेतील लोकांसाठी निष्ठेचे आणि लढाऊवृत्तीचे सामर्थ्यशाली आकर्षण बनविणे हे होते."

नेताजी जन्मतःच नेते होते. त्यांना असे काही मुद्दाम करावे लागण्याची गरज नव्हती. शिस्तीचा भाग म्हणून आवश्यक ते करणे सेनापतीचे कर्तव्य असते. मुख्यतः हे सर्व ध्येयप्रेरित होते हे टोये यांनाही मान्य आहे. आदर्श उदाहरण घालून देण्यासाठी हे सर्व होते असे ते सांगतात.

मुसोलिनीची भेट घडवून देण्यात सुभाषचंद्रांना कारोनी या इटालियन मुत्सद्याची मोलाची मदत झाली. त्यांनीच प्रथम परराष्ट्रमंत्री काऊंट सियानोंना लिहिले, "बोस कसे आहेत हे त्यांच्या आजवरच्या कृतीवरून आणि कार्यावरून आपण जाणतोच. ते बुद्धिमान व कर्तृत्ववान आहेत. भावनाप्रधान असले तरी सध्याच्या भारतीय नेत्यांमध्ये त्यांच्यासारखा वास्तववादी दृष्टिकोण असलेला दुसरा नेता नाही. शत्रूच्या प्रदेशात क्रांती होणे कसे आवश्यक आहे हेही त्यांनी पटवून दिले."

पूर्वी जर्मनशरण इटालियन नेतृत्व साशंक होते. परराष्ट्र मंत्री काऊंट सियानो म्हणाले, "बर्लिनमधल्या जर्मन अधिकाऱ्यांनी सुभाष बोस यांच्या सूचनेबाबत उत्साह दाखविला नाही. धूमकेतूप्रमाणे अकस्मात उगवलेल्या या माणसाचं मोल किती आहे, हे स्पष्ट होईपर्यंत आपण याबाबतीत कसलीही भूमिका घेऊन अडचणीत येऊ नये."

पण मुसोलिनी आणि नेताजी यांची भेट झाल्यावर इतरांप्रमाणे मुसोलिनीचेही मन पालटले. स्वभावतः धूर्त असलेल्या मुसोलिनीने सर्व जबाबदारी जर्मनीवर टाकली. दोषही जर्मनीलाच दिला.

नेताजी युरोपात मॅझेट्टा ओरलँडो नावानेच वावरत होते. इटालियनांपैकी काहींना ते सिसीलीयन वाटत होते. नेताजी जर्मनीतून पूर्वेकडे आले आणि नेताजींचे अनेक गुणविशेष जगाला दिसले. युरोपियनांपेक्षा जपान्यांनी अधिक खुलेपणाने त्यांना दादही दिली.

नेताजींचे जपान मधील आगमन जपानच्या साह्याने आणि जपानी पाणबुडीतूनच झाले. ६ मे १९४३ ला ते साबाना बेटावर म्यॅसूदा नावाने उतरले. १६ मे १९४३ ला टोकिओमध्ये आले. अनेक सेनाधिकाऱ्यांना तसेच सीगॅमीट्स्यू (परराष्ट्रमंत्री) यांनाही भेटले. पण पंतप्रधान टोजोची भेट मिळत नव्हती. टोजोला नेताजींचे आगमन पसंत नव्हते. अखेर अनेकांच्या प्रयत्नांनी १० जून १९४३ ला टोजो-नेताजी भेट झाली. एका भेटीत सर्व चित्र पालटले. टोजोनी लगेच १४ जूनला दुसरी भेट ठरवली. या भेटीत नेताजींना जपानी लोकसभेत (डायेट) येण्याचे आमंत्रण टोजोंनी दिले. केवळ चार दिवसात घडलेला चमत्कार. याच सभेत भारतीय स्वातंत्र्यासाठी विनाअट मदत देण्याचे आश्वासनही टोजोंनी दिले. टोजोची हिरवी झेंडी मिळताच जपानमध्ये नेताजींच्या आगमनाची वार्ता जाहीर करण्यात आली. निप्पॉन टाईम्सने लिहिले,

"सुभाषचंद्रांचे, भारतीय स्वातंत्र्यलढ्यासाठी सर्वस्व त्यागणारे महान राष्ट्रीय नेते, या नात्याने जपानने उत्कट स्वागत केले. चाळीस कोटी भारतीयांचा दीपस्तंभ असलेल्या या महान देशभक्ताचा आशियातील सर्वच नेत्यांना अभिमान वाटणे स्वाभाविक आहे."

निशी निप्पॉन शिंबून या वृत्तपत्राने नेताजींचे संक्षिप्त चरित्रसारच प्रकाशित केले. नेताजींनी टोकीयो आकाशवाणीवर केलेल्या भाषणाचे प्रतिसाद लिस्बन व लंडन येथे उमटले. लिस्बनच्या डोमे वृत्तसंस्थेने लिहिले :

"त्यांनी टोकिओ येथून केलेले निवेदन त्यांनी बर्लिनवरून केलेल्या कोणत्याही निवेदनापेक्षा किती तरी प्रभावी होते" लंडन टाइम्सनेही या वृत्ताला दुजोरा दिला. पहिल्या पदार्पणातच नेताजींनी जपान जिंकले.

जनरल ओशीमा बर्लिनमध्ये नेताजींना भेटले होते (ते तेथे राजदूत होते). ते म्हणतात, "माझ्या आयुष्यात मी अनेक आशियायी, युरोपियन आणि अमेरिकन मुत्सद्यांना भेटलो पण नेताजींच्या तोडीचा अजून कुणीच भेटला नाही" जनरल तेराऊचींना, "जे बोलेल ते करून दाखवीन, असा हा माणूस

स्वतःसंबंधी अत्यंत निरीच्छ" वाटला. आत्मसन्मानाच्या कल्पना अत्यंत तीव्र असणाऱ्यांना नेताजी जवळचे वाटले, यात नवल नाही. जनरल माशिझ्यो फुजीवारा म्हणतात, " मदत मागायला आलेल्या नेताजींनी, नम्रपणे अर्ज विनंत्या करण्याची भूमिका घेतली नाही. संपूर्ण संभाषणात ते अधिकारवाणीने व ठामपणे बोलत होते. पण यापैकी कुणालाही ते उद्दाम वाटले नाहीत." पुढे ते म्हणतात, "नेताजींचे व्यक्तिमत्व भारदस्त होते. महान क्रांतिकारक नेत्याला आवश्यक गुणांचे त्यांना अभिदान होते. हा देशभक्त, सुविद्य, प्रखर बुद्धिमान, दृढनिश्चयी, एकचित्त आणि मानवतावादी होता."

हिकारी किकान (संपर्क साधन अधिकारी) चे एक दुभाष ताडामोटो निगीबी म्हणतात, "एकाच व्यक्तीत धैर्य, विद्वत्ता व दयाळूपणा दुर्मिळच. त्यांना लष्कराचा पूर्वानुभव नव्हता तरीपण त्यांनी निष्णात लष्करी अधिकाऱ्यांपेक्षाही उत्तम तऱ्हेने फौजांचे मार्गदर्शन केले. हिटलर, मुसोलिनी यांच्यासारखे ते हुकुमशहा नव्हते तर निराळ्या पद्धतीचे नेते होते."

संकटात, पराभवात प्रतिकूलतेत निश्चल राहण्याची नेताजींची वृत्ती महान साधकाची वृत्ती होती. विदेशियांच्या नजरेतून ती सुटली असती तरच नवल. प्रचंड खवळलेल्या समुद्रात शत्रूच्या घेऱ्यातून जर्मनी ते जपान हा कित्येक दिवसांचा व मैलांचा प्रवास नेताजींनी पूर्ण केला त्यावेळी जर्मन पाणबुडीचा कप्तान म्हणाला, "संकटात कसे वागावे हे बोस आणि चिटणीसांकडून शिकावे." तर जपानी पाणबुडीचा कप्तान म्हणाला, " हा प्रवास पूर्ण करून तुम्ही चमत्कारच घडवला." ते दोघे दर्यावर्दी होते, सैनिक होते, आदेशाचे पालनकर्ते होते. पण नेताजींसारख्या नागरी माणसाने तक्रार तर केलीच नाही उलट हा अनुभव "आनंदाचा" होता म्हणून आभारच मानले. ही तर केवळ शारीरिक कसोटी होती. पण ज्यावेळी जपानने शरणागती पत्करली त्यावेळी "त्यांच्या चेहऱ्यावर सूक्ष्म छटा देखील ही बातमी वाचून उमटली नाही." असे बातमी देणारा अधिकारी सांगतो.

हे सर्व त्यांचे मूल्यमापन आहे की, ज्यांचे नेताजींबरोबर काही मतभेदही झाले होते. जपान वा जर्मनी असो देश विदेशी एकच भीती होती सुभाषबाबू त्यांच्या हातचे खेळणे होतील का ? नेताजींचे एक चरित्रकार हयासीद लिहितात,

"नेताजींनी स्वातंत्र्याची चळवळ उच्चस्थानी नेऊन ठेवली होती, अत्यंत पावित्र्याने व उदारतेने चालविली होती. कोणीही त्यांच्या शक्तीचा गैरवापर करावा असे नेताजी नव्हते.

याच पावित्र्याच्या बळावर हिंदुस्थानला गरज असेल तर स्वातंत्र्यासाठी त्याने सैतानाशीही हातमिळवणी केल्यास कुणालाही गैर वाटू नये असे सांगून जपानच्या संमतीने सुभाषबाबू रशियाकडे निघाले होते. विमान कोसळले. सर्व संपले. जगातील सर्व भाषेतील सर्व विशेषणे संपली. शेवटी जगाने कबूल केले!

या सम हाच!

● ●

**************************

# आझाद हिंद फौजेची युद्धसिद्धता

## ले. कर्नल सुनील देशपांडे

**************************

थोरामोठ्या महापुरुषांचे चरित्रदर्शन नव्या पिढीला नेहमीच स्फूर्तिदायी व प्रेरणादायी असते. अशा चरित्रांमधून मानवी जीवनावर सुसंस्कार घडतात. स्वाभिमान, स्वावलंबीपणा, पुरुषार्थ, पराक्रम आणि मानवतेची पूजा करण्याची प्रवृत्ती समजजीवनात वाढीस लागते. समाजाला एक नवे वळण देणे, समाजाचे उत्थापन घडवून आणणे हे कार्य थोरांच्या चरित्रातून घडते. भारताच्या प्रदीर्घ अशा १८५७ सालापासून १९४७ सालापर्यंतच्या अभिनव स्वातंत्र्य चळवळीमध्ये अशा प्रकारच्या आदर्श नररत्नांची मालिकाच निर्माण झालेली आहे. अशाच थोर पुरुषांच्या मालिकेत थोर क्रांतिकारक नेताजी सुभाषचंद्र बोस यांचा समावेश अग्रक्रमाने होतो.

स्वातंत्र्य संग्रामाच्या धगधगत्या अग्निकुंडात आपलं सर्वस्व पणाला लावून भारतमातेच्या ज्या सुपुत्रांनी देहाची होळी केली त्यात नेताजी सुभाषचंद्र बोस हे नाव प्रामुख्याने पुढे येतं. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आज ५० वर्षे उलटली असली तरी सुभाषचंद्र बोस या नावाचं स्मरण झालं तर प्रत्येक भारतीयाचा ऊर अभिमानाने फुलतो. त्यांचा आवाज कानात घुमतो. " Give me Men, Money and Material; and I shall promise you freedom....... जोपर्यंत शस्त्रबळाचा वापर करून इंग्रजांवर आपण हल्ला चढवत नाही तोपर्यंत केवळ असहकाराने अगर अहिंसेच्या तत्त्वाने भीक मागून स्वराज्य केव्हाही पदरात पडणार नाही ही काळ्या दगडावरची रेघ आहे, हे पक्के ध्यानात ठेवा. भीक मागून दिलेले स्वराज्यही तसेच भिकारडे असणार. देणाराही ते चिरफाड करून, छिन्नविछिन्न तुकडे करूनच देणार हेही नक्कीच आणि भीक मागून फुकट

भारत स्वतंत्र केल्यानंतर उपयोगात यावयाची टपाल तिकीटे. ही अगोदरच जर्मनीत छापून ठेवली होती. दुर्दैवाने त्यांचा वापर करता आला नाही.

শ্রীশ্রীদুর্গা সহায় — কটক
রবিবার

পরমপূজনীয়া শ্রীমতী মাতাঠাকুরাণী —
শ্রীচরণকমলেষু —

মা,

ভারতবর্ষ ভগবানের বড় আদরের স্থান —
এই মহাদেশে লোকশিক্ষার নিমিত্ত ভগবান
যুগে যুগে অবতাররূপে জন্মগ্রহণ করিয়া পাপক্লিষ্ট
ধরণীকে পবিত্র করিয়াছেন এবং প্রত্যেক ভারত-
বাসীর হৃদয়ে ধর্ম্মের ও সত্যের বীজ রোপণ
করিয়া গিয়াছেন। ভগবান মানবদেহ ধারণ
করিয়া নিজের অংশাবতার রূপে অনেক দেশে
জন্মগ্রহণ করিয়াছেন কিন্তু এতবার তিনি কোনও
দেশে জন্ম গ্রহণ করেন নাই — তাই বলি
আমাদের জন্মভূমি ভারতমাতা ভগবানের
বড় আদরের দেশ। দেখ, মা, ভারতে যা
চাও সবই আছে — প্রচণ্ড গ্রীষ্ম, দারুণ শীত,
ভীষণ বৃষ্টি, আবার মনোহর শরৎ ও বসন্ত
কাল, সবই আছে। দাক্ষিণাত্যে দেখি —
স্বচ্ছসলিলা, পুণ্যতোয়া গোদাবরী — দুই কূল

सुभाषबाबुंचे हस्ताक्षर

घेणाऱ्यालाही त्याची खरी किंमत वा मोल कळणार नाही हेही तितकेच खरे. कसे मोल कळणार? जोपर्यंत भारतातील प्रत्येक माता आपल्या पोटच्या एकदोन गोळ्यांच्या रक्ताने स्वराज्याची किंमत अदा करीत नाही तोपर्यंत त्या मातांना व त्यांच्या भावी पिढ्यांना, काय मोलाने स्वराज्य कमावले आहे याची किंमत कळणार नाही, रास्त अभिमानही वाटणार नाही, त्यामुळे अशा स्वराज्याचे सुराज्य होणार नाही. ते स्वराज्य नव्हेच. स्वातंत्र्य तर नव्हेच नव्हे." अतिशय स्पष्ट, खणखणीत, मनात स्फुरण निर्माण करणाऱ्या नेताजींच्या या आवाहनास प्रचंड प्रतिसाद मिळाला. मोठ्या प्रमाणात तरुण-तरुणी आझाद हिंद फौजेत सामील होण्यास्तव सामोरे आले. प्रस्तुत लेखात आझाद हिंद फौजेची युद्धसिद्धता याविषयी सविस्तर विचार मांडण्यात आले आहेत.

आझाद हिंद फौजेची स्थापना होण्यापूर्वी देशात काही महत्त्वपूर्ण घडामोडी झाल्या होत्या. डिसेंबर १९३९ मध्ये काँग्रेस पक्षात मतभेद होऊन जहाल व मवाळ असे दोन तट पडले होते. सुभाषचंद्र बोस हे जहाल पक्षाचे असून त्यांनी मवाळांवर कडक टीका करण्यास सुरुवात केली. गोगलगायीच्या चालीप्रमाणे संथ राजकारण त्यांना मान्य नव्हते. काँग्रेसमधील तरुण जहालवाद्यांना हाताशी धरून स्वातंत्र्यपूर्तीकरिता योग्य अशी चळवळ प्रारंभ केली. नेताजींनी ६ जून १९४० रोजी एक खळबळजनक घोषणा केली की, प्रत्येक प्रांतात एक भारतीय स्वतंत्र सरकार स्थापन करण्यात येत असून या सरकारला सार्वभौमत्वाचे अधिकार राहतील. याविरुद्ध ब्रिटिश सरकारने ताबडतोब धरपकड मोहीम सुरू करून २ जुलै १९४० रोजी नेताजींना अटक करून बंदिस्त केले. या दरम्यान हजारो लोकांनी कायदेभंग चळवळीस प्रारंभ केला व सरकारला अटकसत्र सुरू करावे लागले. या अटकसत्राविरुद्ध नेताजींनी तुरुंगात उपोषणास सुरुवात केली. तुरुंगात त्यांची प्रकृती फार जास्त खालावल्यामुळे नंतर त्यांना त्यांचे राहते घरी बंदिस्त करण्यात आले. जानेवारी १९४१ मध्ये एके दिवशी नेताजी बंदिवासातून निसटले व भूमिगत झाले. त्यांना शोधण्याकरिता ब्रिटिश सरकारने आटोकाट प्रयत्न केले तथापि त्यांना यश आले नाही. भारताबाहेर पडून नेताजींनी अफगाणिस्तान व रशियामार्गे जर्मनीत प्रवेश केला. या अत्यंत जोखीमभऱ्या व खडतर प्रवासास त्यांना तब्बल अकरा महिने लागले.

आपल्या शत्रूचा शत्रू हा आपला मित्र राहू शकतो या उक्तीप्रमाणे जर्मनीत

नेताजींनी हिटलरची भेट घेतली व आपली भूमिका स्पष्ट केली. भारतमातेला गुलामगिरीतून मुक्त करण्यास्तव ब्रिटिशांच्या शत्रूच्या मदतीने सशस्त्र लढा दिलाच पाहिजे हे ठरवून नेताजींनी पुढील योजना आखल्या, या कामात नेताजींना प्रचंड प्रतिसाद मिळू लागला. याच सुमारास जपानमध्ये असलेले रासबिहारी बोस देखील याच धर्तीवर कार्यरत होते. त्यांनी जपानमधील भारतीयांचा भरघोस पाठिंबा मिळवला होता. बँकॉक येथे इंडियन इंडिपेंडन्स लीगची (IIL) स्थापना करण्यात येऊन अध्यक्षपदी देशभक्त रासबिहारी बोस यांची निवड करण्यात आली. ब्रिटिशांविरुद्धच्या संघर्षात रासबिहारी बोस यांनी जपानचा पूर्ण पाठिंबा मिळविला. मार्च १९४१ मध्ये नेताजींनी जर्मनीहून तर रासबिहारी बोस यांनी जपानहून रेडिओ स्टेशनवरून भाषण दिले. या भाषणात भारतमातेला स्वतंत्र करण्याकरिता प्राण पणाला लावून सशस्त्र लढ्यास तयार व्हावे असे आवाहन भारतवासियांना करण्यात आले. डिसेंबर १९४१ मध्ये इंडियन इंडिपेंडन्स लीग व जपानी सेनाधिकारी यांच्यात एक महत्वपूर्ण करार झाला. याच धर्तीवर कॅप्टन मोहनसिंग यांच्या इंडियन व्हॉलेंटियर आर्मी जी पुढे इंडियन नॅशनल आर्मी झाली व जपानी सेनाधिकारी यांच्यात विशेष करार झाला. या करारामधील प्रमुख महत्वाचा मुद्दा असा की, जपानी लष्कर आझाद हिंद फौजेस ब्रिटिशांविरुद्ध संपूर्ण मदत करेल व ही मदत देत असताना जपान कुठल्याही भारतीय भूभागाची, आर्थिक, लष्करी, राजकीय अपेक्षा भारताकडून करणार नाही. ब्रिटिश साम्राज्याचं आशियामधून उच्चाटण व्हावं हा जपानचा उद्देश असल्यामुळे जपानला देखील हे फार सोयीचं होतं. फेब्रुवारी १९४३ मध्ये नेताजी जर्मनीमधून गुप्तपणे पाणबुडीने निघून एप्रिलमध्ये जपानला पोहोचले व १६ मे १९४३ रोजी टोकियोत दाखल झाले.

बँकॉक येथे पूर्व आशियातील सर्व भारतीयांची मोठी सभा आय. आय. एल. च्या वतीने आयोजित करण्यात आली होती. या सभेच्या अध्यक्षस्थानी रासबिहारी बोस हे होते. या सभेत एकता, विश्वास व त्याग या तीन तत्त्वांवर आधारित आझाद हिंद फौज उभी करण्याचे ठरले.

कुठल्याही सेनेला युद्धासाठी बऱ्याच मुद्द्यांचा सखोल विचार करावा लागतो. आझाद हिंद फौज ही नेताजींनी भारताला गुलामगिरीतून मुक्त करण्याच्या प्रेरणेतून शून्यातून निर्माण केली. युद्धमोहीम यशस्वी करण्याकरिता काही युद्धतत्त्वांचा विचार आवश्यक असतो. ही युद्धतत्त्वे (principles of war)

आझाद हिंद फौजेच्या बाबतीत कशी अनुसरली गेली याचा उहापोह पुढे केलेला आहे. यशस्वी आक्रमणाकरिता अथवा ज्याला अचूक रणनीती म्हटले जाते त्यात पुढील मुद्दे येतात.

**(१) उद्देश** (Object) : नेताजींनी आझाद हिंद फौजेचा उद्देश हा अगदी साधासरळ ठेवला होता तो म्हणजे ब्रिटिशांच्या गुलामगिरीतून सशस्त्र लढा देऊन भारतमातेला मुक्त करणे. या उद्दिष्टपूर्तीकरिता नेताजींनी योजनाबद्ध पद्धतीने कार्यक्रम आखले व राबविले. जर्मनी, जपान व इटली या ब्रिटिशांच्या शत्रूंबरोबर मैत्री साधून आपले उद्दिष्ट साध्य होऊ शकते ही नेताजींना खात्री होती. या संदर्भात नेताजींची दूरदृष्टी वाखाणण्याजोगी होती. जर्मनी व जपान या देशांबरोबर वेळ न दवडता सल्लामसलत करून मुक्ती लष्कर उभे करणे सुरू केले. कुठल्याही युद्धात उद्देश हा फार महत्वाचा भाग असतो. जर उद्देश देशहितार्थ असेल तर त्याला लोकांचा प्रचंड प्रतिसाद मिळतो. याउलट देशहितासाठी उद्देश नसेल तर पुष्कळदा अपयश पदरी पडतं असं इतिहास सांगतो. उदाहरणादाखल सामर्थ्यशाली अमेरिकन फौजा व्हिएतनाममध्ये, रशियन फौजा अफगाणिस्तानमध्ये व भारतीय सेना श्रीलंकेमध्ये स्पष्ट उद्देशाअभावी अयशस्वी ठरल्या. आझाद हिंद सेनेचा उद्देश भारताचे स्वातंत्र्य हा सूर्यप्रकाशाइतका स्पष्ट व स्वच्छ असल्याने ज्वलंत देशप्रेमाने भारलेले अनेक भारतीय आझाद हिंद फौजेत आपखुशीने दाखल झाले. 'भाई हो, तुम्ही स्वयंस्फूर्तीने हे कार्य अंगिकारले आहे ते मानवी मनाचा थोरपणा दाखविणारे आहे. या पवित्र कार्याच्या परिपूर्तीसाठी कोणताही त्याग विशेष नाही. आज तुम्ही भारताच्या मानबिंदूचे रक्षक आहात. तुम्ही स्वतः तुमच्या वर्तनाने तुमच्या देशबांधवांचे आशीर्वाद मिळवा आणि पुढील पिढीला तुमच्याबद्दल अभिमान वाटेल असे वागा'' अशा शब्दात नेताजींनी देशवासियांना आवाहन केले.

**(२) पूर्वतयारी** (Concentration) : लढ्यासाठी सैन्य उभारणे, सैन्याला प्रशिक्षित करणे, युद्धसामग्री उपलब्ध करणे, योग्यवेळी योग्य स्थळी सैन्यास जमविणे हा सर्व पूर्वतयारीचा भाग आहे. नेताजींची इच्छा ५०,००० सैनिक तयार करण्याची होती. पण जपानी लष्कर ३०,००० पेक्षा अधिक सैन्यास सुसज्ज करण्यास तयार नव्हते. नेताजींनी त्यांची पर्वा न करता सैन्य वाढविण्याचे ठरवले. १०,००० चे तीन लष्करी विभाग व त्या व्यतिरिक्त

२०,००० शक्तिशाली, स्वयंसिद्ध सैनिक व अधिकारी यांच्या भरतीने फौज उभी करण्याचे ठरविले. नेताजींचे युद्धतंत्र हे छत्रपती शिवाजी महाराजांप्रमाणे गनिमी काव्याचे होते. त्यादृष्टीने फौजेची रचना करण्यात आली. यात लष्कराच्या सर्व आवश्यक भागांची रचना होती. यात तीन गोरीला रेजिमेंटस्, सिक्रेट सर्व्हिस दल, खबर आणणारे दल, मदत पुरविणारे दल, फिल्डफोर्स रेजिमेंट, तोफखाना दल, चिलखती गाड्यांचे दल, इंजिनियरिंग दल, सिग्नल कंपनी, बेस हॉस्पिटल, ऑफिसर्स ट्रेनिंग स्कूल, मेकॅनिकल ट्रान्सपोर्स्ट कंपनी, वैद्यकीय दल याशिवाय फौजेचे जनरल खाते, व्यवस्थापन खाते व प्रचार खाते यांची स्थापना केली गेली.

आझाद हिंद फौजेच्या फौजींना देण्यात येणारे प्रशिक्षण हे उत्कृष्ट स्वरूपाचे असून त्यात सर्व पैलूंचा समावेश करण्यात आला होता. आझाद हिंद फौजेने मदत म्हणून स्वीकारलेल्या युद्धसामग्री व शस्त्रास्त्रांच्या बाबतीत हा व्यवहार उधार समजावा असे जपानला स्पष्ट केले होते. भारत स्वतंत्र झाल्यावर याची परतफेड होईल हा करारदेखील करण्यात आला. आझाद हिंद फौजेला आर्थिक मदतीचा ओघदेखील मोठ्या प्रमाणात येण्यास सुरुवात झाली. नेताजींची जिथे जिथे भाषणे होत तेथील लोक मुक्तहस्ते नेताजींना सहाय्य करीत. हिनान येथे एका मेळाव्यास १५००० लोक उपस्थित होते व नेताजींच्या भाषणाने प्रभावित होऊन दोन लक्ष पौंड देणग्या जमविण्यात आल्या. नेताजींनी ब्रह्मदेश, जावा, सुमात्रा, जपान, सिंगापूर, मलाया, चीन या देशात दौरे काढून आझाद हिंद फौजेसाठी सैनिक, सामग्री व धनराशी गोळा केल्या. सर्व आघाडीवर योग्य प्रकारे लढाई व नियंत्रणासाठी नेताजींनी आझाद हिंद सरकारची स्थापना केली.

(३) **आक्रमकता** (Offensive action) : कोणत्याही युद्धाच्या यशस्वितेकरिता सैन्यात आक्रमकता असणे आवश्यक असते. युद्धात जर उद्देश स्वच्छ, स्पष्ट व राष्ट्रहिताचा असेल तर सैन्यातील आक्रमकशक्ती प्रखर व प्रभावी ठरते. कुठलेही युद्ध आक्रमकतेशिवाय जिंकता येत नाही. देशाला स्वतंत्र करण्याच्या भूमिकेतून प्रेरित झालेली आझाद हिंद सेना व त्यातील प्रत्येक सैनिक आपलं सर्वस्व पणास लावण्यास सिद्ध होता. नेताजींच्या प्रभावशाली भाषणांमुळे व नेतृत्वशैलीमुळे या आक्रमकतेला धार आली होती.

**(४) अचानक कार्यवाही** (Surprise) : आझाद हिंद फौजेने अचानक कार्यवाही युद्धतंत्राला प्राधान्य दिलं होतं. शिवाजी महाराजांप्रमाणे गुरीला वारफेअर हे मोठ्या सैन्यावर जास्त प्रभावी ठरतं. बर्माच्या घनदाट अरण्यात ब्रिटिश फौजेविरुद्ध आझाद हिंद फौजेने सुरवातीस चांगली कामगिरी केली त्यामुळे बरेच यश पदरी पडले. प्रशिक्षणात देखील नेताजींनी या युद्धतंत्रावर जास्त भर दिला.

**(५) वेगवान गती** (Mobility) : युद्धतंत्रामध्ये गतीला अनन्यसाधारण महत्व आहे. असे निष्कर्षाअंती आढळते की, वेगवान फौजा ह्या यशस्वी होतात. एका इंग्रजी लष्करी तज्ज्ञानुसार, Armies that could reach further, hit harder and get there faster usually won, while we range restricted, less well armed and slower armies lost. For this reason human creating effort has been poured into extending range, increasing fire power and accelerating speed of wepons and of armies. आझाद हिंद फौजेच्या रचनेमध्ये गतीचा विचार करून त्यात मेकॅनिकल ट्रान्सपोर्ट कंपनीचा समावेश केला होता. आक्रमकतेच्या व गतीचा विचार करून चिलखती गाड्यांची कंपनीदेखील फौजेत होती. पर्वतीय व जंगली भागात फौजेच्या गतीमध्ये बरेच अडथळे येतात. बर्माच्या दुर्गम भागात आझाद हिंद फौजेला बरेच अडथळे पार करावे लागले. त्यामुळे फौजेची गती ही कमी होती. इंफालच्या लढाईत सुरवातीच्या यशानंतर जेव्हा पावसामुळे व ब्रिटिशांच्या आक्रमक पावित्र्यामुळे आझाद हिंद सेनेला माघार घ्यावी लागली होती तेव्हा गती कमी असल्यामुळे बरेच नुकसान झाले.

**(६) लष्कराची बचत** (Economy of Force) : युद्धात परिस्थितीनुसार किती सैन्य वापरावयाचे ते ठरविले जाते. छोट्या कामांकरिता विनाकारण जास्त लष्कर वापरणे हितावह नसते. असे केल्याने सैन्य थकते. जेव्हा सर्व शक्ती पणाला लावून आक्रमण करण्याची वेळ येते तेव्हा तेवढा उत्साह रहात नाही. युद्धात नेहमीच बदलत्या परिस्थितीनुसार ताजेतवाने सैन्य आवश्यक असते म्हणून सैन्यात आरक्षित सैन्य तुकड्या (Reserves) असणे आवश्यक असते. या सैन्याचा सेनानायक योग्य ठिकाणी योग्य प्रकारे वापर करू शकतो. छत्रपती शिवाजी महाराजांनी त्यांच्या सैन्याचा अशा प्रकारे नेहमीच

सुयोग्य वापर केला. त्यांनी प्रत्येक हल्ल्यात कमीत कमी मावळ्यांच्या साह्याने शत्रूचे जास्तीत जास्त नुकसान केले. आझाद हिंद फौजेतदेखील सैन्याचा यथायोग्य वापर केला गेला. आरक्षित सैन्याची प्रत्येक वेळी योजना केली गेली.

(७) **सैन्याची सुरक्षितता** (Security) : सैन्याच्या सुरक्षेत सैन्याला शत्रूहल्ल्यापासून दूर ठेवणे जेवढे आवश्यक असते तेवढेच शत्रूला आपल्या सैन्याविषयी व हालचालींविषयी माहिती होऊ न देण्याची खबरदारी घेणे अंतर्भूत असते. याकरिता हेर खातं प्रभावी असणं आवश्यक असतं. शत्रूबद्दल तंतोतंत माहिती वेळेवर पोहचली तर त्याचा भावी लष्करी योजनांसाठी खूप फायदा होतो. शिवाजी महाराजांचं हेर खातं हे अत्यंत कुशल होतं. आपल्या हालचालींबद्दल शत्रूला सुगावा लागू न देता, आपल्या हालचालींबद्दल शत्रूला फसवणे हे हेरखात्याला उत्कृष्टरीत्या जमणे आवश्यक असते. आझाद हिंद फौजेने ब्रिटिशांची अगदी बारीकसारिक माहिती काढली. ज्याआधारे जपानसोबत योग्य आक्रमण योजना आखल्या गेल्या. ब्रिटिश सैन्यातील भारतीय सैनिक जे आझाद हिंद फौजेत होते त्यांच्या सहाय्याने खबर आणणाऱ्यांचे दल स्थापिले गेले. सुरवातीला जपान व आझाद हिंद फौजेला जे यश मिळालं त्यात हेरगिरीचा फार मोलाचा वाटा होता.

(८) **सहकार्य** (Co-operation) : लष्करातील विविध दलांचं सहकार्य युद्ध जिंकण्याकरिता अत्यंत आवश्यक असतं. भूदल, नौदल व वायुदल यांच्या परस्पर सहकार्याने योजना आखण्यात येतात व नंतर त्यांची अंमलबजावणी केली जाते. आझाद हिंद फौजेला जपानी लष्कराशी सहकार्य करून योजना आखाव्या लागल्या होत्या. या दोन्ही सैन्यात पूर्णपणे सहकार्य होतं ज्यामुळे कोहिमा व इंफालपर्यंतची आगेकूच व ब्रिटिश सैन्याचा पराभव होऊ शकला. युद्धातील सहकार्याचं उत्तम उदाहरण म्हणजे द्वितीय महायुद्धात योग्य पद्धतीने मित्र राष्ट्रांनी नॉर्मंडी येथे आपल्या युद्ध नौका उतरविल्या व जर्मन फौजेवर हल्ला केला. नुकत्याच झालेल्या अमेरिका-इराक संघर्षात देखील मित्रराष्ट्रांच्या भूदल, वायुदल व नौदलाने परस्पर सहकार्य उत्तमरीत्या केले होते.

(९) **प्रबंध योजना** (Administration) : नेपोलियनने म्हटले आहे, "Army marches on stomuch". सैन्याचं मनोबल राखण्याकरिता व युद्धात विजय मिळविण्याकरिता प्रबंध योजना फार महत्वाच्या असतात. सैन्यास योग्य

वेळेवर चांगलं भोजन मिळणे, दारूगोळा पुरविणे, दवाखाना सोयी उपलब्ध करून देणे, हवामानाप्रमाणे योग्य कपडे पुरवणे, रसद व सामान पुरवठा पुरेसा उपलब्ध करणे, पूरक तुकड्या पुरविणे, संचारव्यवस्था करणे, पहाडी प्रदेशात सामान वाहून नेण्यासाठी खच्चरांची व्यवस्था करणे हा सर्व प्रबंध योजनेचा भाग असतो. उद्देश असा असतो की, पुढे लढत असताना सैन्याला युद्धोपयोगी सामानासाठी मागे बघण्याची गरज भासायला नको. दुर्गम प्रदेशात या योजना फार काळजीपूर्वक आखाव्या लागतात. कित्येक वेळा रसद, दारूगोळा व सामान पुरवण्याचं काम हेलिकॉप्टर्स किंवा विमानाद्वारे करावं लागतं. इंफालच्या लढाईत माघार घेताना व त्यानंतर जेव्हा ब्रिटिश फौजेचे जोरदार हल्ले सुरू झाले त्यावेळेस आझाद हिंद फौजेचे फार हाल झाले. बर्माच्या घनदाट जंगलात पावसाने थैमान घातले, रोगराई पसरली, रसद वेळेवर पोहचू शकली नाही, दारूगोळा देखील योग्य ठिकाणी पोहचत नव्हता, पहाडी नाले अडथळा निर्माण करीत होते यामुळे आझाद हिंद फौजेचे फार मोठे नुकसान झाले. युद्धाच्या यशस्वितेत प्रबंध योजनेचा फार महत्वाचा वाटा असतो. द्वितीय महायुद्धात जर्मनीने जेव्हा रशियावर स्वारी केली त्यावेळेस हिवाळ्याअगोदर आपण मॉस्को काबीज करू अशी योजना होती पण ते जमू शकले नाही. कारण जर्मन सैन्य पुढे जात असताना प्रबंध योजनेचा व्याप वाढत होता, अंतर वाढत होतं त्यामुळे प्रबंध योजना कोसळली व उशीरं झाला. रशियन हिवाळ्याकरिता जर्मन सैन्य सज्ज नव्हते. प्रबंध योजना अयशस्वी झाल्याने जर्मन सैन्याला माघार घ्यावी लागली.

**(१०) प्रचारतंत्र** (Publicity) : युद्धसज्जतेत प्रचारतंत्राचं महत्व फार मोलाचं आहे. आझाद हिंद फौजेने प्रचारतंत्राचा उपयोग योजनाबद्ध पद्धतीने अत्यंत प्रभावीरीत्या केला. प्रचार युनिट स्थापण्यात आले. युनिटचे कार्य कशा स्वरूपाचे राहील यावर सविस्तर चर्चा झाली. भारताच्या स्वातंत्र्यलढ्याकरिता इंग्रजांविरुद्ध भारतीय सैन्यामध्ये प्रचार करून त्यांना स्वातंत्र्यलढ्यात सामील करून घेणे हा उद्देश ठेवून पत्रके छापण्यात आली. प्रचारतंत्रासाठी मेजर ब्रार प्रॉपोगंडा युनिट असे नाव देऊन फेररचना करण्यात आली. प्रचारतंत्रासाठी प्रशिक्षणाची देखील योजना होती. हे प्रशिक्षण संपताच काही जणांची नेमणूक खास युद्ध आघाडीवर ब्रिटिश इंडियन फौजेमध्ये प्रचार करण्याकरिता व प्रचारपत्रे वाटण्याकरिता केली जात असे. काहींना सीमेवरून भारतात पाठवून प्रचारपत्रके विमानाद्वारे भारतात टाकण्यात आली. काही पदवीधर तरुणांना

जपानी भाषा शिकवून बर्मा युद्ध आघाडीवर जपानी लष्करी अधिकाऱ्यांबरोबर आय. एन. ए. शी संबंध ठेवून दुभाषाचे काम करावे लागत असे. प्रचारपत्रके विविध भाषांतून छापण्यात आली. त्याचप्रमाणे प्रचाराकरिता आकाशवाणीचा वापर करण्यात आला. श्री. रासबिहारी बोस व नेताजींनी आकाशवाणीवरून बरीच भाषणे दिली. आझाद हिंद फौजेबद्दल, सैनिकांबद्दल इत्थंभूत बातमी मिळावी म्हणून व जगातील युद्धवार्ता व विशेषकरून भारतात आपल्या राजकीय नेत्यांनी चालविलेल्या स्वातंत्र्य चळवळीची माहिती देण्यास्तव सिंगापूर येथून 'आझाद हिंद' नावाचे एक वर्तमानपत्र सुरू करण्यात आले. हे दैनिक इंग्रजी, मल्याळम, तामिळ, गुजराती व उर्दू भाषेत प्रसिद्ध केले जात होते.

आझाद हिंद फौजेत झपाट्याने भरती सुरू झाली. दररोज शेकडो जवान फौजेत दाखल होत होते व त्या सर्वांना सलेतर या प्रशिक्षण केंद्रात पाठवण्यात येत असे. हे लोक बहुभाषी असले तरी प्रसंगी दुभाष्यांची मदत घेऊन त्यांना हिंदी भाषेतूनच प्रशिक्षित केले जाई. नवीन आलेल्या जवानांकरिता विशेष प्रशिक्षण कार्यक्रम असे. हे सर्व प्रशिक्षण लवकर सुरू होणाऱ्या युद्धाकरिता होते. यात कुठल्याही प्रकारची हयगय केली जात नसे. प्रशिक्षण काळ हा ७५ दिवसांचा असे. यात पी. टी., परेड, रूटमार्च, शस्त्र चालविणे, स्वातंत्र्याचा अर्थ, स्वातंत्र्याचे मोल आणि स्वातंत्र्यलढ्याचं महत्व या गोष्टींवर विशेष भर दिला जात असे.

आझाद हिंद फौजेत भरती झालेल्या स्त्रियांना झाशीराणी रेजिमेंट मध्ये दाखल करून घेतले जाई. कॅप्टन लक्ष्मी या रेजिमेंटच्या नेतृत्वपदी होत्या. या रेजिमेंटचे दोन प्रमुख भाग होते. संग्राम विभाग व उपचार विभाग (Fighting Section and Nursing Section). युद्धात राणी झाशी रेजिमेंटनेही अत्यंत महत्वाची कामगिरी बजावली. भारतीय नारी ही शौर्य गाजविणारी आहे हे झाशी राणी रेजिमेंटच्या वेगवेगळ्या तुकड्यांनी या युद्धात सिद्ध केले. शेवटी जेव्हा आझाद हिंद फौज माघार घ्यायला लागली तेव्हा झाशी राणी रेजिमेंटच्या सांस्कृतिक विभागाने 'झाशी की रानी लक्ष्मीबाई' हा नाट्यप्रयोग सर्व सैनिकांसमोर दाखवला. सैनिकांचं खचत चाललेलं मनोबल उंचावण्याचा हा प्रयत्न होता. देशाकरिता आत्मबलिदान करण्यास आपण तयार असावं हा तो संदेश होता. या नाट्यप्रयोगाचा योग्य तो परिणाम सैनिकांवर झाला.

नेताजी एक प्रतिभाशाली, प्रभावी व लोकप्रिय नेते होते. नेताजी हा बहुमान त्यांच्या ठायी असलेल्या नेतृत्वशैलीमुळेच लोकांनी त्यांना बहाल केला होता. नेताजींच्या चेहऱ्यावर विलक्षण तेज होतं. नेता हा लष्करी असो वा कुठलाही असो तो कसा असावा ? 'A leader is he who knows the way, shows the way and goes the way.' नेताजी हे अगदी असेच होते. त्यांच्याजवळ ज्ञान होतं, दूरदृष्टी होती, स्पष्ट विचार होते व तार्किक विचारशैली होती. आपले विचार व्यक्त करण्यासाठी ते अत्यंत प्रभावी व तडफदार भाषणं देत. त्यांच्या भाषणांनी जनसमुदाय मंत्रमुग्ध होत असे. त्यांच्या प्रत्येक आवाहनाला प्रतिसाद मिळत असे. कोणतेही काम करण्याची कुशल पद्धत नेताजी सांगत असत. ' बोले तैसा चाले ' या उक्तीप्रमाणे त्यांनी स्वतःच्या कृतीतून लोकांना प्रेरणा दिली. एकदा सैनिकांबरोबर जेवताना जेव्हा त्यांना समजलं की त्यांच्याकरिता वेगळं जेवण बनवलं आहे तेव्हा ते अत्यंत चिडले. आझाद हिंद फौजेत आपण सर्व एक आहोत याची ते जाणीव करून देत. उच्चनीच हा भेदभाव जिथे होत असे तेथे ते जातीने आळा घालीत. नेताजींचे सर्व कार्यक्रम योजनाबद्ध होते.

कामाचा उत्साह नेताजींमध्ये अतिशय दांडगा होता. अविश्रांत श्रम करीत ते सतत भ्रमंतीवर असत. कामाचा अफाट पसारा असताना जबाबदारीची जाणीव ठेवून, शांतचित्ताने नेताजी कार्यरत होते. नेताजींसमोर फक्त एकच ध्यास होता तो म्हणजे स्वातंत्र्य. खंबीर भूमिका हा नेताजींच्या नेतृत्वाचा एक महत्वाचा पैलू होता. हिटलरशी झालेल्या संवादानंतर नेताजींनी खंबीर भूमिका घेतली. जपानबरोबर देखील नेताजींनी आपली मते ठामपणे मांडली होती. आझाद हिंद सेना कुठल्याही प्रकारे कमी नाही व त्यांना दुय्यम वागणूक देता कामा नये ही भूमिका नेताजींनी मांडली होती. नेताजी नेहमी योग्य तोच निर्णय घ्यायचे. त्यांच्यात कमालीचे निर्णयकौशल्य होते. नेताजींच्या ज्वलंत राष्ट्रप्रेमाची प्रचिती वेळोवेळी येत असे. १९४४ साली जपानी लष्कर प्रमुखांनी नेताजींना म्हटले की आता कलकत्त्यावर बॉम्बहल्ले करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. त्यावेळी नेताजी त्वरित उत्तरले की, माझ्या सुंदर कलकत्त्यावर बॉम्बहल्ला करून त्याला नष्ट केलेलं मला मुळीच आवडणार नाही. त्याचा विध्वंस करू नये.

कोहिमाच्या लढाईत जपानी फौजांबरोबर आझाद हिंद फौजेने लक्षणीय काम केले ज्यामुळे कोहिमा सर करण्यात आले. मात्र इंफाल सर करण्याच्या प्रयत्नात बरेच अडथळे येऊ लागले. पावसाळ्यापूर्वी कोहिमा व इंफाल सर

करावयाचे ही योजना होती. तथापि बर्मामधील घनदाट जंगलात प्रचंड पावसाने थैमान घातले व पर्वतीय नदी नाले वेगाने वाहू लागले. ज्यामुळे सैन्याला ते पार करणे कष्टसाध्य होत होते. पावसामुळे सैन्यात रोगराई पसरली. कॉलरा व मलेरियाने सैन्याला हैराण केले. औषधे कमी पडू लागली. रसद पुरेनाशी झाली. त्यामुळे पुष्कळदा जंगलातील कंदमुळांवर सैन्याला विसंबून रहावे लागले. अशा बिकट परिस्थितीत देखील आझाद हिंद फौजेने घेतलेली माघार ही योजनाबद्ध होती. काही टोळ्या शत्रूला थोपवून ठेवीत असत त्याचवेळी उरलेल्या टोळ्या मागे जात असत. नंतर मागील टोळ्या शत्रूला तोंड देत असत व पुढील टोळ्या मागे येत. जर्मनीवर मित्रराष्ट्र व रशिया यांच्या हल्ल्यामुळे बर्लिन पडण्याच्या मार्गावर होते. या सर्व आक्रमणाच्या वेळेस नेताजी पुढे होते. नेताजींसोबत असल्याने सैनिकांचे मनोबल वाढत असे. अखेर सिंगापूरपर्यंत माघार घेण्यात आली. नेताजींनी यावेळी तीन मुद्यांवर चर्चा केली. इंग्रजांसमोर शरणागती पत्करायची काय? इंग्रजांसोबत जीवात जीव असेपर्यंत लढा द्यायचा काय? जंगलात भूमिगतरीत्या राहून इंग्रजांशी लढा द्यावयाचा काय? ही चर्चा होत असताना नेताजींना टोकियोत जाणे आवश्यक होते. १८ ऑगस्ट १९४५ ला या प्रवासात नेताजींच्या विमानाचा दुर्दैवी अपघात झाला.

सामान्य माणसांच्या प्रवृत्तीत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणून नवचैतन्याने बहरलेली अचाट स्फूर्ती निर्माण करण्याची अजब किमया एक नेताजीच करू जाणे! त्यांच्या शब्दात नि व्यक्तिमत्वात कुणालाही मंत्राप्रमाणे मोहून टाकण्याचे दिव्य सामर्थ्य होते. यःकश्चित रबर लागवडीच्या मळ्यात काबाडकष्ट करणाऱ्या निकृष्ट मजुरातून नेताजींनी हिंमतबहादूर शूरवीर अल्पावधीत तयार केले. इतकेच नव्हे तर इंफाल व आराकान आघाडीवर इंग्रज सैन्यावर मात करून विजय मिळवून दाखवला. धन्य ते नेताजी आणि धन्य ते त्यांचे अद्वितीय, अजोड कर्तृत्व!

● ●

*************************

# सहकाऱ्यांच्या शब्दात नेताजी

**प्रा. डॉ. विजय इंगळे**

*************************

माझ्या परिचयात नागपुरात एकूण तीन आझाद हिंद सेनानी होते. त्यातले माझे वडील नारायणराव इंगळे आज हयात नाहीत. ते सुभाषबाबूंचे जर्मनीमधील सहकारी. त्यांचे व्यक्तिमत्व थोडेसे ध्यानयोग्याचे होते. अत्यंत प्रसन्न, हसरे व सर्वांना हवेहवेसे वाटणारे असे व्यक्तिमत्व. पण सुभाषबाबू या विषयावर ते हेतुपूर्वक अबोल राहत. त्याचे रहस्य अजूनही मला उलगडले नाही. ते अपवादात्मक खुलत, पण अपवादात्मकच. पण एक गोष्ट मात्र लाखमोलाची सांगत, " आम्ही नेताजींचे, विनम्र साथी तेवढे होतो. नेताजींवर भाष्यकार म्हणून बोलण्याची लायकी मात्र फक्त गोविंदराव किरडे यांचेजवळ आहे ! " दुसरे साथी शेख मौलाना. हे आझाद हिंद सेनेत शिपाई होते. वार्धक्यामुळे बव्हंशी स्मृतिभ्रंश झालेला. त्यामुळे ते बोलण्यास असमर्थ दिसले. सुभाषबाबू उच्चारल्याबरोबर त्यांच्या डोळ्यांच्या कडा ओलावून गेल्यात. काहीही न बोलता सुभाषबाबूंबद्दल बरेच काही बोलून जाणारी त्यांच्या डोळ्यातील चमक आजही माझ्या डोळ्यांपुढून हटत नाही. त्यांनीही लेफ्टनंट किरडेजींकडेच बोट दाखविले. या दोहोंच्या म्हणण्याचा प्रत्यक्ष प्रत्यय मला किरडेजींसोबत बोलताना आला.

"क्रांतिकारी तत्त्वचिंतन, प्रयोगशील क्रांतिकारकता व विशाल हृदयाची बैठक या तीन गोष्टी एकत्र आल्याशिवाय युगपुरुष अवतरू शकत नाही. नेताजींच्या व्यक्तिमत्वात या तिन्ही गोष्टी जुळून आल्या होत्या. त्यामुळे ते संपूर्ण व स्वयंपूर्ण युगपुरुष होते." - किरडेजींनी नेमक्या शब्दात नेताजींच्या व्यक्तिमत्वाचे सार प्रस्तुत लेखकासमोर ठेवले. नुसते प्रमेय मांडून ते थांबले नाहीत. नेताजींच्या व्यक्तिमत्वाचे सर्वंकष पैलू माझ्यासमोर ठेवून त्यांनी ते

साधार पटवून दिले. किरडे बोलताना उफाळलेल्या समुद्रागत हेलकावत होते. पण बुद्धिप्रामाण्याचा धागा मात्र कुठे तुटला, असे क्षणभरही जाणवले नाही. ते म्हणाले,

"नेताजींचा तत्त्वचिंतक म्हणून जो अभ्यास व्हायला पाहिजे, तो हेतुपूर्वक या देशात होऊ दिलेला नाही. जगात जसे गांधीवाद, मार्क्सवाद, रॉयवाद, नाझीवाद त्याकाळात आपले पाय रोवीत होते, किंवा रोवून त्याची पाळेमुळे फैलावीत होते. त्याच काळात सुभाषवादही आपल्या संपूर्ण शैलीनिशी व्यक्त होत होता. स्फुट स्वरूपात सुभाषबाबूंचे सर्व विचार एकत्र बांधून त्याकाळातला त्यांचा प्रभाव आजही टिपता येण्यासारखा आहे. नाझीवाद व मार्क्सवाद या दोन विचारसरणींच्या पार्श्वभूमीवर सुभाषवादाचा उदय नेताजींनी घडवून आणला आहे."

सुभाषवादाचा उदय व्हावा, अशी परिस्थिती त्या काळी होती, असे किरडेजींचे म्हणणे. ते म्हणाले,

"संपूर्ण जग वसाहतवादाच्या सावटाखाली होते. अंतर्गत समस्या तीव्रतर असूनही मूळ सार्वभौम स्वायत्तता व कायद्याचे राज्य नसल्याने राजकीय स्वातंत्र्यासाठी आवाज बुलंद करणे हा एकमेव पर्याय होता. गांधी काय, सरफरोश धर्मवेडे क्रांतिकारक काय व सुभाषजी काय सर्वांचे उद्दिष्ट एकच होते - स्वातंत्र्य !... प्रत्यक्षात मात्र ध्येय-धोरण, साधने, कार्यक्रम, तत्त्वे सर्वच बाबतीत तिन्ही प्रवाहांमध्ये कमालीचे मतभेद दिसतात.

एका बाजूला संस्थानिकांबद्दलचे प्रेम व दुसऱ्या बाजूने धर्मवेड या दोहोतून क्रांतिकारकांची चळवळ आकारास येत होती. या चळवळीत पुढे भगतसिंह, सुखरामसारखे वेगळ्या अर्थाने जाणारे बंडखोरही झालेत. पण छुटपुट उठावापलीकडे त्यांना काही साधता आले नाही. ते झपाटल्यागत, वेड्यागत स्वातंत्र्ययज्ञात स्वतःची आहुती द्यायला जणू दिवाणे झाले होते. सबुरी, संयम, वैचारिक बैठक, योजनाबद्ध कार्यक्रम व क्रांतीचे सामाजिकीकरण या क्रांतिवीरांना करता आले नाही. त्यांचे मोठेपण वादातीत आहे. पण ते बव्हंशी व्यक्तिगत किंवा सहकारगत तेवढेच ठरते. नेताजींच्या संपूर्ण जनक्रांतीच्या तुलनेत ते वेगळे आहे.

दुसऱ्या बाजूला गांधीवाद व त्या वादाने उभारलेली राष्ट्रीय चळवळ होती. गांधींबद्दल प्रचंड आदर बाळगणाऱ्या नेताजींचा प्रत्यक्षात मात्र आध्यात्मिक

बैठकीवर उभारलेल्या अहिंसात्मक चळवळीवर विश्वास नव्हता. मानसिक क्रांतीपुरते अध्यात्म हे पूर्णसत्य आहे. पण भौतिक क्रांतीसाठी साधनशुचितेसह चळवळ राबवणे हा प्रकारच सुभाषजींना मान्य नव्हता. त्यांच्या विचाराला काँग्रेसमधल्या जहालवादी परंपरेचा आधार होता; असे म्हणण्यापेक्षा जहालवाद्यांना तात्त्विक बैठक मिळवून देण्याचे कार्य त्यांनी केले असे म्हणावे लागेल.''

'सत्य मोठे कटु असते' हे सांगताना किरडेजींनी त्या काळातल्या गांधीवादी चळवळींची संपूर्ण समीक्षाच नेताजींच्या विचाराधारे सादर केली. गांधीवाद अमूर्त, आदर्शवादी व जास्तीत जास्त भविष्यवेडावर आधारलेला होता. त्यामुळे व्यवहाराच्या पातळीवरचे त्यांचे पाय अनेकदा सुटत. सर्वप्रथम त्यांनी स्वातंत्र्याचा हा एकमेव मार्ग नव्हे, असे सांगितले. दूरगामी ध्येय, आखलेले धोरण, साधनांची शक्याशक्यता व इतिकर्तव्यता या चतुःसूत्रीचे महत्त्व सांगून ही संपूर्ण गांधीवादी चळवळ बाल्यावस्थेत वावरते आहे, असे नेताजींचे म्हणणे होते. गांधींना त्यांनी तुमचे नेमके ध्येय काय हे विचारले होते. तेव्हा गांधींनी त्यांना 'आझादी के बारे में मैं खुद साशंक हूँ।' - असे उत्तर दिले होते. संपूर्ण स्वराज्याचा ठराव १९२८ च्या कराची अधिवेशनातही नेताजींना संमत करून घेता आला नाही. मवाळवाद्यांनी तो त्यांना मांडू दिला नाही हे एक नग्नसत्य होते, असे किरडेजी म्हणाले. त्यासाठी १९३० पर्यंत लाहोरच्या काँग्रेस अधिवेशनाची त्यांना वाट पहावी लागली. 'कंप्लीट फ्रिडम'च्या घोषणेमागे सुभाषबाबूंचे तत्त्वचिंतन, प्रयोग, फलश्रुती या साऱ्यांची मूलभूत बैठक उभी होती. या सर्वांचा परिणाम इतका झाला की इतके स्फोटक वातावरण काँग्रेसमध्ये निर्माण झाले की १९२९ साली कलकत्त्याचा मंडप भडकलेल्या लोकांनी जाळून टाकला. शेवटी आपल्या या तत्त्वचिंतनाचे प्रात्यक्षिक जगासमोर सादर करण्यासाठी, तसेच फलश्रुतीची पक्की हमी भारतीयांना देण्यासाठी नेताजी देश सोडून गेले व पुढे आझाद हिंद सेनेचा इतिहास घडला. पुढेही बँकॉकवरून गांधीजींना १९४६ साली जे पत्र नेताजींनी लिहिले होते. त्यातील शब्द न् शब्द सुभाषवाद काय ताकत होती, हे सांगण्यासाठी पुरेसे आहेत :-

''पूज्य बापूजी आझादी के सिलसिले में समझोते नहीं, लढाई हुआ करती है। संधियां नहीं, बलिदान हुआ करते है। आझादी दी नहीं जाती, खून देकर मोल ली जाती है।''

सुभाषवाद हे कालिक सत्य नाही, ते स्वातंत्र्यापुरतीचेही सत्य नाही. ती माणसासाठी असलेली सर्वांगीण वैचारिकता आहे. त्याला 'वैज्ञानिक समाजवाद' असे नाव किरडेजी देतात. "देशात जातीपाती, वर्णव्यवस्थेचे, स्त्री-पुरुषभेदांचे संपूर्ण सामंतशाही वातावरण होते. दुसऱ्या बाजूने ब्रिटिश राजकारणाने उफाळणारा भांडवलवाद गांधीजींच्या चळवळीला 'कॅश' कसे करून घ्यायचे, यासाठी टपलेला होता. अशावेळी समझौते, सौदेबाजी होणे अपरिहार्य होते. 'मैं हिंदु हूं, लेकिन मुसलमानों का आदर करता हूं' - असे म्हटल्याबरोबर माझा धर्म क्रमांक एकवर येणार हे निश्चित होते. अनेक गोष्टी आहेत, ज्या स्वतंत्र संशोधनाचा विषय आहे की ज्याचे पर्यवसन पुढे देशाच्या फाळणीत झाले. देशात कायदा उच्चभ्रूंचा, जमीनदार-सावकार, स्मगलर्स-बिल्डर्स यांचा बटिक होऊन बसला. नेताजींनी या साऱ्या शक्यता आपल्या वेळोवेळीच्या बोलण्यातून मांडून दाखविल्या होत्या. त्यांना 'राष्ट्र' या संकल्पनेसाठी लढणारी मानसिकता निर्माण करावयाची होती. अंधश्रद्धेपोटी, मैदानी वक्तृत्वाच्या पोटी निर्माण होणारा भोळा राष्ट्रवाद त्यांना नको होता. म्हणून वैज्ञानिक समाजवादाच्या सर्वंकष पायावर त्यांनी आपला राष्ट्रवाद उभारला. नुसत्या स्वातंत्र्यासाठीच नाही, स्वातंत्र्यानंतरच्या व त्याहीनंतरच्या अशा व्यापक फलकानिशी एक राष्ट्रीय चळवळ त्यांना उभी करावयाची होती. त्यामुळे गांधींसारखा 'कॉंग्रेस विसर्जन करा', 'घटना बनवा' वगैरे प्रकार सुभाषवादाला करण्याची जरूरी पडली नसती." असे कॅप्टन किरडेंनी सांगितले.

"सुभाषबाबूंच्या वैज्ञानिक समाजवादामागे मार्क्स किती उभा आहे, ते शोधणे ही काळाची गरज आहे. पण दुसऱ्या बाजूने 'फॅसिझम'चा त्यांच्यावर किती प्रभाव होता, हे सत्यही सुभाषवादाच्या प्रकाशात तपासले पाहिजे. नेताजी हिटलरला मिळाले, या गोष्टीचा तात्त्विक अर्थ नीट समजून घेतला पाहिजे. हिटलर सामंतशाही, साम्राज्यवाद, व्यक्तिपूजा यांच्या विरोधात ठामपणे उभा होता. आंतरराष्ट्रीय स्तरावर पारंपरिक व लादलेल्या व्यवस्थेविरुद्ध उभा ठाकणारा बंडखोर म्हणून ते त्याकडे पाहत. पण जसजसे हिटलरचे विचित्र व विक्षिप्त रूप पुढे यायला लागले तसतसे सुभाषजी अस्वस्थ झाले. रशियाविरुद्ध लढण्याची वेळ आली, तेव्हा सुभाषबाबूंनी आपल्या सेनेला हटविले, उतरू दिले नाही, याचाच अर्थ 'फॅसिझम'वरचा त्यांचा विश्वास वादातीत नव्हता. संघटन, शिस्त, चारित्र्य, एक उद्दिष्ट या संदर्भात वातावरण उभारण्याची शक्ती

फॅसिझममध्ये आहे. तेवढीच त्यांना मान्य होती. हिटलरबरोबर मतभेद होणे, याचा अर्थ त्याचा साथ सुटणार होता असा होतो. सुभाषवादाचे उद्दिष्ट नेमके लक्षात घेतले की सुभाषवाद हा फॅसिझममध्ये जास्त मोठा व विधायक प्रकार आहे, हे आपल्या लक्षात येईल.'' असे सांगत किरडेंनी 'आझाद हिंद सेना' हे सर्वस्व नाही, हे या संदर्भात पटवून दिले. अधिक भाष्य करताना, ''नेताजींना आशियातून साम्राज्यवादाची पूर्ण हकालपट्टी करावयाची होती. ए. बी. सी. डी. अर्थात् अमेरिकन, ब्रिटिश, चायनिज व डच हे ते साम्राज्यवादी होत, त्यांच्याविरुद्ध लढा उभारायला 'एशियाटिक लिबरेशन आर्मी' ही संघटना त्यांनी उभारली. त्याचे 'जनरल' व भाष्यकार तेच होते. त्या त्या टप्प्यावर आपल्या चिंतनाचे व्यवहारातले प्रयोग करणे, हा सुभाषवादाचा खास खाक्या होता. सुभाषवादातील नेणीव व प्रयोग याविषयी अनुमान करायला त्यांच्या योग्यतेचा तत्त्वचिंतकच लागेल.'' असे कॅप्टन किरडेंनी आग्रहाने सांगितले.

ते पुढे म्हणाले, ''तत्त्वचिंतनाच्या पक्क्या पायावर सुभाषबाबू उभे असल्यामुळे त्यांच्या प्रयोगशीलतेला निश्चित एक भविष्य होते. ते अफगाणमार्गी जर्मनीला गेले. ध्येय-धोरण-साधने-इतिकर्तव्यता या चतुःसूत्रीपैकी साधनांचा प्रश्न सर्वात बिकट होता. भारतात स्वातंत्र्याचे स्वप्न पाहणारे शेख महंमद अनेक झालेत. काहींनी ध्येय-धोरणापर्यंत प्रत्यक्ष मजलही गाठली. पण तत्त्वज्ञानाची जोड नसल्याने त्यांचा उठाव राष्ट्रव्यापी होऊ शकत नव्हता. काहींनी साधनांच्या बाबतीत थोडीबहुत मजल गाठण्याचा प्रयत्न केला. पण ती गाठण्याअगोदरच इंग्रजांनी त्यांना फासावर तरी लटकवले नाहीतर काळ्या पाण्यावर तरी पाठवले. सुभाषबाबू चिंतक असल्यामुळे उताविळीचा प्रश्नच नव्हता. धोरण आखण्यासाठी प्रथम सलग कार्यक्रमाची जोड द्यावी लागते. प्रचंड कष्टांची तयारी ठेवावी लागते. पण साधनांशिवाय सारे मुसळ केरात जाऊ शकते. नेताजींनी उभारलेली साधने, त्यातली मानवी संपत्ती, भौतिक चल-अचल संपत्ती हा जगातला एक चमत्कार आहे. भारताबाहेर जाऊन भारताबाहेर वसलेल्या भारतीयांमध्ये उदात्त ध्येयबुद्धी निर्माण करणे हा प्रकार सुभाषबाबूंसारखा प्रभावी व्यक्तिमत्वाचा माणूसच करू शकत होता. हजारो वर्षांपासून मानसिक गुलामगिरीची चटक लागलेला भारतीय माणूस आपसातील कलह, पोटपाणी व ध्येयहीन जगण्यात फार हरवून गेला होता. अशा माणसाला एकदम तिसऱ्या संस्कृतीत नेऊन ठेवणे हा एक चमत्कार होता. अन्न-वस्त्र-निवारा, वैज्ञानिक

शास्त्रे, भौतिक अस्मिता व आध्यात्मिकीकरण अशा मानवी जीवनाच्या विकासाच्या चार पायऱ्या सांगितल्या जातात. अशावेळी राष्ट्रीय अस्मितेच्या वेगळ्या पातळीवर नेऊन ठेवण्याचा प्रकार व तोही भारताबाहेर नेताजींनी करून दाखविला. त्यांनी ब्रिटिश सैन्यातल्या भारतीयांना वळवले. नागरी भारतीयांना देशासाठी संपत्ती, पैशाचा त्याग करायला शिकविले. सामान्य माणसामधला ध्येयनिष्ठ सैनिक जागा केला. इतकेच काय या सर्व कार्यात सुसंगतता व सुसंबद्धता असावी म्हणून पुढे आझाद हिंद सरकार स्थापन केले. हे सरकार ब्रिटिश सत्तेला नाकारणारे प्रत्युत्तर होते. सरकार अपदस्थ आहे व भलत्या परकियांनी सत्ता लाटली आहे, हे सुभाषबाबूंना जगाला दाखवून देता आले. या सरकारचे ते स्वतः राष्ट्राध्यक्ष व सेनाप्रमुख होते. त्यांनी मंत्रिमंडळ, कचेऱ्या, कर्मचारी या सर्व यंत्रणा कार्यरूपात आणल्या. या सरकारने स्वतःचे चलन, बँका, टपाल, संदेशयंत्रणा, रेडियो साऱ्या साऱ्या उभारल्यात.''

या सरकारस्थापनेमागेही नेताजींचे तत्त्वचिंतन उभे होते. किरडेजींनी ते नेमके समजावून सांगितले, ''राज्य प्रस्थापित करण्याचे चार मार्ग असतात. सैनिकीकरणाचा, हस्तांतरणाचा, व्यक्तिवादाचा व जनक्रांतीचा. सैनिकी उठाव दडपशाहीकडे वळतो. हस्तांतरणाने व्यवस्था तशीच राहते. व्यक्तिवाद जुलुमी हुकुमशहाला जन्म देतो. जनक्रांती मात्र एक 'कल्चर' निर्माण करून आपले सर्वंकष उन्नयन व विकास करण्याची संधी देते. सुभाषजींचा चौथा मार्ग होता, ती क्रांती निश्चित केंद्राविना अमूर्त वाटू नये, म्हणून त्यांनी २१-१०-१९४३ ला सरकार स्थापण्याची घोषणा केली व लगोलगच ब्रिटिश सेनेविरुद्ध युद्धही पुकारले.''

नेताजी जिथे जिथे गेले, तिथे तिथे त्यांनी लोक, पैसा, मदती मिळविल्या. त्याचे कितीतरी हृदयंगम किस्से किरडेजींनी ऐकवले. नेताजींची सुवर्णतुला करून लोकांनी पैसे दिले. एका सुरेंद्रसिंह नावाच्या श्रीमंताने संपूर्ण मालमत्ता आझाद हिंद सेनेला दिली. तो व त्याची पत्नी दोघे सेनेत सामील झाले. लक्ष्मीद्वार नावाच्या स्त्रीने पुढे इतिहास घडवला. इ. पुढे किरडे म्हणाले,

''सुभाषबाबूंच्या आझाद हिंद सेनेत एक, मुस्लिमांचे बहुसंख्य असणे व दोन, स्त्रियांचे स्वतंत्र युनिट असणे या दोन घटनांना विशेष अर्थ होता. सुभाषबाबू ज्या ज्या देशातून हिंडले व त्यांना जो जबरदस्त प्रतिसाद मिळाला, त्यापैकी बव्हंशी देश मुस्लिम होते. आझाद हिंद सेनेत बहुमत मुस्लिमांचे होते.

कॅ. पी. के. सहगल

ले. क. रामसिंह

कॅ. हरिसिंह

क. ठाकुरसिंह

क. महबुब अहमद

कॅ. चंद्रभान अहमद

जी. आर. नागर

क. जी. एस. ढिल्लन

मे. ए. सी. चटर्जी

डॉ. श्रीश जोशी

ए. डी. लोकनाथन

अज्ञाताच्या शेवटल्या प्रवासातील शेवटले छायाचित्र
सायगांव १७ ऑगस्ट १९४५

वरिष्ठ पदावरही मुस्लिम होते. शहनवाझ, हबीबुर्रहमान, अबीद हसन इ. मुस्लिमच काय ख्रिश्चन, अँग्लो इंडियन, पारशी यांचाही समावेश होता. सेनेत दक्षिण भारतीय क्रमांक दोन वर होते. या साऱ्यांचा वैज्ञानिक अर्थ लावला पाहिजे. काँग्रेसपासून मुस्लिम दुरावले जात असताना आझाद हिंद सेनेच्या राष्ट्रीय उठावात मुस्लिम आघाडीवर राहिले, याची काही निश्चित कारणे आहेत. गांधीजींचा राष्ट्रवाद उदार हिंदुत्वनिष्ठेवर आधारित होता हे कबूल. पण 'हिंदु' शब्द आल्याबरोबर मुस्लिमांना तो विश्वसनीय वाटला नाही. सुभाषबाबूंच्या चिंतनात निव्वळ शुद्ध राष्ट्रवादाला स्थान होते. याबाबतीत त्यांचे जे धर्माचे आकलन होते, ते विज्ञानवादावर उभारलेले होते. माणसाने देव, धर्म, निष्ठा निर्माण केल्या, त्यामुळे माणूस मोठा असल्याचे ते अनेकदा बोलून दाखवीत. माणूस, त्याच्या सामाजिक संघटना, त्याचा ध्येयवेडेपणा यांना ते अधिक मान देत. राष्ट्र जगले व लोकांना बुद्धिनिष्ठ संस्कृती लाभली, तर धर्माधर्मातील कलहापेक्षा सामंजस्यांना आपोआपच पाऊलवाट मिळेल, याची त्यांना खात्री होती. त्यांच्या या सिद्धांताची प्रयोगशाळा म्हणजे आझाद हिंद सेनेची मने होती. सेनेत जातपात, उच्चनीच, स्पृश्य-अस्पृश्यता हा प्रकारच नव्हता. भोजनाचे लंगर देखील एक होते. संकटाच्या छायेत माणूस कृत्रिम भेदाभेद विसरतो, याचा अनुभवही अनेक सैनिकांनी घेतला होता. अनुभूतींचा, विचारांचा परीघ मोठा केला की आझाद हिंद सेनानी तयार होतो, असे काहीसे त्यांना दाखवून द्यावयाचे होते.

या संदर्भात काही खास गोष्टी किरडेजींनी सांगितल्या. त्यातल्या काही इथे खास संस्कृतीवैशिष्ट्य सांगणाऱ्या असल्यामुळे नमूद करीत आहे :-

सुभाषबाबूंच्या संस्कृती वळणाचे अनेक विशेष आजही भारतीयांनी नकळत जोपासून ठेवले आहेत. उदाहरणार्थ - गांधींना 'राष्ट्रपिता' हा त्यांनी दिलेला सन्मान, जयहिंद ही उद्घोषणा, तिरंगी झेंडा वगैरे. त्यातील 'जयहिंद'चा व 'राष्ट्रगीता'चा किस्सा त्यांच्या धार्मिक-सांस्कृतिक सामंजस्यावर प्रकाश टाकायला पुरेसा आहे. राष्ट्राचा जयघोष सुचविणारे घोषविधान नेताजींना हवे होते. त्यांनी डॉ. अबीदहसन प्रमुख असलेली एक समिती नेमली. या समितीने 'फते हिंद', 'जय भारत' असे दोन नारे सुचविले. त्यांनी पहिल्या मुस्लिम वळणाच्या घोषणेतील 'हिंद' शब्द निवडला व खास

हिंदू घोषणेतील 'जय' शब्द निवडला. पाहता पाहता 'जयहिंद' असा खास आझाद हिंद सेनेची संस्कृती सांगणारा नारा तयार झाला. राष्ट्रगीत म्हणून रवींद्रनाथांच्या 'जन गण मन' या गीतापेक्षा, या गीताचा अवमान न करता, व त्याच चालीवर दुसरे राष्ट्रगीत तयार केले. त्याचे ध्रुवपद व त्यातील मधल्या ओळी त्यांच्या विशाल हृदयाची साक्ष देणाऱ्या आहेत :-

सुधा सुख चैन की बरखा बरसे
भारत भाग है जागा.....
सबके दिलमें प्रीत बसाये
तेरी मिठी बानी
हर सुभके रहनेवाले
हर मजहब के प्राणी
सब भेद फर्क मिटाये
सब गोदमें तेरी आके
गुंथे प्रेमकी माला...

बर्माची गोष्ट आहे. तिथे डॉ. बावामा प्रमुख असलेले स्वातंत्र्योत्तर बर्मा सरकार होते. जनरल भोसले यांची नेताजींना सैनिकांना जवळून पाहता यावे, त्यांचे बरोबर जेवण घेता यावे, अशी मनीषा होती. नेताजींनी निमंत्रण स्वीकारले. तिथल्या रंगून पालिकेने त्यांच्या आतिथ्याचे उत्तरदायित्व स्वीकारले. राजघराणातल्या किंमती कमानी, शिल्पे, आभूषणे इत्यादींनी उंचावर एक व्यासपीठ उभारण्यात आले. त्यावर नेताजी जेवतील व इतर सैनिक ओळींनी खाली बसतील अशी व्यवस्था करण्यात आली. काही मिनिटात कार्यक्रम आटोपून आपली व्यस्तता सांभाळायला मोकळे होता यावे म्हणून त्यांचा येण्याचा मार्ग वेगळा करण्यात आला. नेताजींनी व्यासपीठाकडे पाहताच 'या सामंतशाही प्रदर्शनाचे मला काय ? यावर बसलो तर माझी लेकरे तुटतील' - असा अभिप्राय व्यक्त करून सैनिकांमधून जाणारा मार्ग स्वीकारला. त्यांना थोपटले. त्यांच्याशी चर्चा केली. त्यांचे दुखणे-खुपणे विचारले. इतकेच काय प्रत्येकाच्या पात्रातून हा तो पदार्थ उचलून गोड करून घेतला... त्यावेळी अनेक सैनिक लहान मुलागत रडले, भारावून गेले. आपण सुभाषजींचे सैनिक आहोत, याचा अभिमान वाटावा अशी माया व ममता त्यांना नेताजींनी लावली होती. त्यांनी निर्माण केलेल्या

राष्ट्रीय चारित्र्यापोटी आझाद हिंद सेना अडीच हजार मैल पायी चालली, उपाशी राहिली, ऊन-पाऊस-बर्फाच्या संकटाशी झुंजू शकली. दलदलीतून, बॉम्बवर्षावातूनही स्वतःला वाचवू शकली. त्यांच्या शिपायात एक मानसिक अनुशासन व अंतर्बाह्य सभ्यता दिसते असे म्हणावयाचे, ते यासाठीच! मरतानाही चेहऱ्यावर हसू व अंतःकरणात स्वाभिमान ठेवून 'जयहिंद' या शब्दांनिशी ही माणसे मरणाला आलिंगीत. पुढे नेताजी बेपत्ता झाल्यावर व आझाद हिंद सेनेने शरणागती पत्करल्यानंतर बहादुरगढ येथे कैदेत असलेल्या अधिकाऱ्यांनी देहाची तटबंदी करून किल्ल्यावर तिरंगा फडकाविला. तो फडकवल्यानंतर इंग्रजांनी जो अंदाधुंद गोळीबार केला, त्यालाही त्यांनी भीक घातली नाही. सेनापती नसतानाही शिपाई लढतात, हा इतिहास शिवाजीनंतर दुसऱ्यांदा घडला.

तिसरी आणखी एक घटना आहे ती अशी. आझाद हिंद सेना मजल दरमजल करीत पुढे सरकते आहे. इंग्रजांच्या लाखोंच्या फौजेला हजारानिशी व साधने अपूर्ण असतानाही पुरून उरते आहे. त्यातही महिला आघाडीच्या झाशी राणी रेजिमेंटने मोलमेन, मारतासन या शहरावरील व सिंटाग, साल्विन व चिट्टविन या नद्यांच्या परिसरातील आघाड्यांवर शत्रूंचा पराभव केला. स्त्रीया लढत आहेत, आपण मात्र भारतीय असून इंग्रजांच्यावतीने लढत आहोत व पराभूतही होत आहोत, याची लाज वाटून ब्रिटिश सैन्यातील अनेक गट सेनेला येऊन मिळाले. त्यावेळी नेताजी 'ब्लड इज कॉलिंग टू ब्लड' हे एकच वाक्य बोलले, ज्यात महाकाव्य सामावले आहे. सुभाषजींच्या सेनेच्या बलिदानाचा आकडा हजारोंमध्ये आहे. 'सुईसाईड ग्रुप' नावाचा किशोरांचा विभाग तर शरीराभोवती बॉम्ब गुंडाळून शत्रूंवर व त्यांच्या मर्मस्थानांवर तुटून पडायचा. आराकन नावाच्या ब्रह्मदेशाच्या सीमेवर हजारोंच्या संख्येत आझाद हिंद सेना उपस्थित होती. यावरून त्यांच्या कर्तृत्वाची थोरवी लक्षात यावी.

सुभाषजी व गांधीजी या दोन्ही युगपुरुषांची तुलना करताना सुभाषजींचे व्यक्तिमत्व किती धीरोदात्त व उंचीचे होते, ते सहज लक्षात येते. गांधीजींचीही महानताही तितकीच डोळ्यात भरते. ते दोघेही महापुरुष एकमेकांचा सन्मान करीत. 'राष्ट्रपिता' हे शब्द नेताजींचेच. स्वतःच्या एका रेजिमेंटचे नावही त्यांनी गांधी ठेवले होते. गांधींनी भारतात राष्ट्रीय पातळीवर इंग्रजांची मुस्कटदाबी केली

होती, त्याची महतीही त्यांना मान्य होती. इतकेच काय ९ ऑगस्ट १९४५ ला जेव्हा गांधींना अटक करण्यात आली, तेव्हा ते बालकागत रडले होते, गांधीजींच्या पत्नी राष्ट्रमाता बांच्या निधनानंतर सुभाषजींच्या सरकारचा राष्ट्रध्वज तेरा दिवस अर्ध्यावर उतरविण्यात आला होता. गांधीजी सुभाषजींचा तितकाच मान करीत. 'मी फक्त नेता आहे. प्रत्यक्षात जादूगार मात्र नेताजी आहेत.' अशा शब्दात गांधींनी त्यांच्या सेनेच्या कर्तृत्वाची थोरवी व्यक्त केली होती. गांधीवादाबद्दल मात्र सुभाष साशंक होते. परिणामस्वरूप काँग्रेसमध्ये काही मधल्या तत्त्वांनी सतत या वैचारिक मतभेदांचे निमित्त करून सुभाषजींबद्दल वैयक्तिक द्वेषबुद्धीचे वातावरण निर्माण केले, जोपासले व वाढवीत नेले. मूळ सत्याचाही त्यामुळे अपलाप करण्यात आला."

सुभाषबाबूंच्या व्यक्तिमत्वाची समीक्षा त्याच काळातील धुरंधरांनी कशी केली होती, याविषयीही कॅ. किरडेंनी माहिती दिली ती अशी :-

हिटलरचे नेताजींबद्दलचे काय आकलन होते, ते तपासले पाहिजे. गांधींनी हिटलरला भेटण्याची इच्छा दर्शविली होती. ती धुडकावताना 'तुम्हाला भेटून मला वेळ वाया घालवायचा नाही' असा अभिप्राय व्यक्त करणारा हिटलर नेताजींना भेटायला मात्र कमालीचा उत्सुक होता. नेताजींसमक्ष त्यांच्याविषयी सर्वांसमक्ष बोलताना हिटलरने वापरलेले शब्द सुवर्णाक्षरात गिरवून ठेवण्यासारखे आहेत. तो बोलला, "आपण पाच करोड आहोत, तुम्ही एका हिटलरचा सन्मान करीत आहात. नेताजी चाळीस करोड भारतीयांचे प्रतिनिधित्व करीत आहेत, तेव्हा त्यांचा आठ पट सन्मान तुम्ही केला पाहिजे. कारण ते खऱ्या अर्थाने जननेते आहेत!"

चर्चिलने नेताजींचा उल्लेख 'विद्रोही' असा केला होता. त्यावर तर सुभाषबाबूंनी स्वतःचीच स्वतः समीक्षा करणारी एक कविता केली होती, ती अशी -

विद्रोह का बाना है
आंखों में आशा के सपने
हाथ में मौत के फूल
और दिल में आझादी का तुफां
हां मैं विद्रोही हूं, विद्रोही हूं।

नेताजींचे सेक्रेटरी होते, डॉ. अबीद हसन. गांधीजींचेही ते चौदा वर्ष पी. ए. राहिले होते. नागपूरात नारायणराव इंगळे गुरुजी व गोविंदराव किरडे या आझाद हिंद सेनेतील ज्येष्ठ अधिकाऱ्यांनी आझाद हिंद दल स्थापन केले होते. त्याची पाठराखण करायला २१ ऑक्टोबर १९४६ ला डॉ. हसन नागपूरला आले होते. सकाळी पत्रकार परिषदेत त्यांना पत्रकारांनी 'तुम्ही दोहोंचेही पी. ए. होता, तेव्हा तुम्हाला श्रेष्ठ कोण वाटतात?' असा प्रश्न विचारला. 'या प्रश्नाचे उत्तर, मी संध्याकाळच्या चिटणीस पार्कातील जनसभेत देईल' असे ते म्हणाले. रात्री भाषणात अगदी शेवटी त्यांनी या मुद्याला हात घातला. ते म्हणाले, 'गांधीजी इतने बुलंद, मानो आस्मा. लेकिन नेताजी अपने लगे. जमीनपे चलते थे' - या अभिप्रायावर भाष्य करण्याची गरज नसावी.

आणखी एक प्रसंग आहे. तो नेताजींच्या उंचीवर नेमका प्रकाश टाकतो. जपानचा राजा तानोहायका हा सहसा कुणाला भेटत नसे व भेटला तर भेटणाऱ्याला दुरून व तेही अधोमुख होऊन बोलावे लागे. या राजाने स्वतःहून सुभाषजींशी भेटण्याची इच्छा व्यक्त केली. इतकेच नाही, नेताजी आल्यावर सारे राजशिष्टाचार गुंडाळून तो नेताजींना घ्यायला बाहेर आला. दोन तीन दिवस त्यांचे आतिथ्य त्या राजाने केले. आपल्या वागण्याचे समर्थनही मागाहून केले. आंतरराष्ट्रीय स्तरावर सुभाषजींचा काय मान होता, याची कल्पना या प्रसंगावरून येते.

परिस्थिती, नियती, फासे बऱ्याच अज्ञात गोष्टी असतात, त्या व्यक्तिमत्वाचा निकाल लावीत असतात. अणुबॉम्ब पडला. हिटलरचा पराभव झाला. नेताजींचा पत्ता लागेनासा झाला. ते यशस्वी झाले असते तर भारतच इंग्रजमुक्त करून ते थांबले नसते, देशाची मानसिक गुलामगिरीतूनही सुटका केली असती. इतिहास वेगळा झाला असता. या गोष्टीचा धसका तत्कालीन सत्ताधाऱ्यांनी घेतला. सुभाषबाबू या देशाचे महानायक तर होणार नाहीत याची धास्ती त्यांनी घेतली. विभाजनाच्या पश्चात्तापापेक्षा नेताजींचे अधिनायकत्व त्यांना अधिक खुपत होते.

नेताजींचा पराभव हा भारताच्या आजच्या शोकांतिकेला कारणीभूत ठरला. त्यांच्या विचाराचा फारसा प्रसार झाला नाही. परिणामी जे एक 'कल्चर' राष्ट्रात निर्माण झाले असते, त्यापासून भारत वंचित राहिला. देशात कायद्याचे

राज्य निर्माण होऊ शकले नाही. सामंतशाही, भांडवलशाही दोन्ही एकाचवेळी फोफावल्या. भारतीय माणूस मुर्दाड, बेफिकीर, मुजोर, नकारवादी, सिनिकल बनला. मानसिक गुलाम तयार करण्याची फॅक्टरी अख्खा देश होऊन बसला." या देशाला सीतेचे पुढे काय झाले, राधेचे कृष्णाशी काय नाते होते, याच्या चर्चा महत्वाच्या वाटतात. पण लाहोरला अश्फाक उल्लाला फाशी दिल्यानंतरही त्याच्या देहाची इंग्रजांनी कशी विटंबना केली, त्याचा तपशील मात्र माहीत नसतो. याचाच अर्थ या देशाला भविष्य नाही, असा होतो!"

कॅ. किरडे भावविवश होऊन बोलत होते. या वयोवृद्ध स्वातंत्र्य सैनिकाची चिंता मी ऐकत होतो.

● ●

*************************

# मराठी साहित्यात सुभाषचंद्र

**डॉ. वीणा मुळे**

*************************

काही व्यक्ती अशा असतात की त्यांचे आयुष्य आणि कर्तृत्व लेखकांना कायम खुणावत असतात. लिहायला प्रवृत्त करतात. अशा व्यक्तींपैकी एक म्हणजे नेताजी सुभाषचंद्र बोस. त्यांचे झुंजार अष्टपैलू व्यक्तिमत्त्व आणि रोमांचपूर्ण घटनांनी भरलेले आयुष्य याचा मोह कुठल्याही लेखकाला पडावा. भारतीय राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळीतले त्यांचे महत्त्वपूर्ण कार्य तर इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवावे असे आहे.

मराठी इतिहासकारांनी त्याची दखल आदरपूर्वक घेतली आहे. ''स्वातंत्र्यसमर : सत्तावन ते सुभाष'' (बाळशास्त्री हरदास), ''जयहिंद : आझाद हिंद'' (वि. स. वाळिंबे) आणि ''सत्तावन ते सत्तेचाळीस भाग १ व २'' (वि. स. वाळिंबे) ही इतिहासाची पुस्तके त्याची साक्ष देतील.

अनेक लेखकांनी सुभाषचंद्रांची चरित्रे लिहिली आहेत. मराठीतल्या या चरित्रांचे कुमारवाचकांसाठी आणि प्रौढ वाचकांसाठी असे स्थूलमानाने वर्गीकरण करता येईल. ''आमचे नेताजी '' (दा. वि. कुळकर्णी), ''नेताजी सुभाष'' (अनुयायी), ''वंगवीर सुभाषचंद्र (अमरेंद्र), ''नेताजींच्या सहवासात'' (पुरुषोत्तम नागेश ओक), ''नेताजी जीवनप्रसंग'' (वि. के. फडके), ''नेताजी सुभाषचंद्र बोस'' (रामकृष्ण गोपाळ भिडे), ''स्वातंत्र्य सिंह सुभाषचंद्र'' (माधव राजाराम कानिटकर), ''हिंदच्या स्वातंत्र्याचे जनक नेताजी सुभाषचंद्र बोस'' (वा. दा. गोखले), ''सुभाषकथा'' (ह. न. जोशी), ''जयहिंद : नेताजी सुभाष'' (पां. श्री. टिल्लू व ग. का. रायकर), ''मुलांचे नेताजी'' (दिनकर द. भागवत) ही चरित्रे कुमारवाचकांसाठी लिहिलेली आहेत. याशिवाय ''माझे पुढारी''

(शिवनेरकार बावळे), "१०१ श्रेष्ठ मानव" (रा. प्र. कानिटकर), "भारतीय स्वातंत्र्याचे रणझुंजार" (संपा. शंकर रामचंद्र दाते), "काँग्रेसचे अध्यक्ष" (भीमराव गोपाळ देशपांडे) ह्या चरित्रसंग्रहात सुभाषचंद्रांचेही संक्षिप्त चरित्र संग्रहित केलेले आहे. कुमारवाचकांसाठी लिहिलेल्या या चरित्रात नेताजींच्या आयुष्यातील काही ठळक आणि मुलांना आवडतील अशा घटनांचे वर्णन करण्याकडे लेखकांचा कल आहे. सुभाषचंद्रांची देशभक्ती, शौर्य, धैर्य, औदार्य, परोपकार इ. गुणांचा ठसा मुलांच्या मनावर उमटावा, सुभाषचंद्रांबद्दल मुलांच्या मनात आदर उत्पन्न व्हावा असे हे सगळे लेखन आहे.

प्रौढ वाचकांसाठी लिहिलेल्या चरित्रांत "सुभाष" (भा. कृ. केळकर), "सुभाष कथा" (प्र. के. अत्रे), "गरुडझेप" (वि. स. वाळिंबे), "शृंखला खळाखळा तुटल्या" (वि. श्री. जोशी), "कहाणी सुभाषचंद्रांची" (पूर्वार्ध) (य. दि. फडके), "कहाणी नेताजींची (उत्तरार्ध)" (य. दि. फडके) यांचा उल्लेख करावा लागेल. यांपैकी य. दि. फडके यांनी सुभाषचंद्रांचे चरित्र दोन भागात विभागले आहे. पूर्वार्धाला त्यांनी 'कहाणी सुभाषचंद्रांची' असे नाव दिले, कारण आझाद हिंद सेनेची स्थापना होण्यापूर्वी 'सुभाषचंद्र' याच नावाने चरित्रनायक ओळखले जात होते. आझाद हिंद सेनेच्या निर्मितीपूर्वीच्या सुभाषचंद्रांच्या जीवनाची आणि कर्तृत्वाची ओळख या पहिल्या भागात य. दि. फडक्यांनी करून दिली आहे, तर आझाद हिंद सेनेच्या स्थापनेपासून सुभाषचंद्रांच्या मृत्यूपर्यंतच्या सुभाषचंद्रांच्या आयुष्याचा भाग त्यांनी उत्तरार्धात निवेदिला आहे. आझाद हिंद सेनेत सुभाषचंद्रांना 'नेताजी' या नावाने ओळखले जात होते आणि मग बाहेरही हेच नाव लोकांत रूढ झाले म्हणून या भागाला त्यांनी 'कहाणी नेताजींची' असे नाव दिले आहे.

प्रौढ वाचकांसाठी लिहिलेली ही सर्वच चरित्रे परिश्रमपूर्वक संदर्भग्रंथांचा, पुराव्यांचा शोध घेऊन, अभ्यास करून लिहिलेली आहेत. या चरित्रांतून नेताजींचे जीवनदर्शन तर होतेच पण त्याबरोबरच त्या काळातल्या राजकीय सामाजिक परिस्थितीचेही चित्र आपल्यापुढे उभे राहते.

चरित्राखेरीज इतर वाङ्मयप्रकारातही सुभाषचंद्रांवर लिहिले गेले आहे. कवितेमध्ये वीरपूजक व राष्ट्रवादी वृत्तीच्या बहुतेक कवींनी सुभाषचंद्रांना मानाचा मुजरा केला आहे. कुसुमाग्रजांनी नेताजी हयात असतानाच 'नेताजी' आणि

'सुभाष' अशा दोन कविता लिहिल्या होत्या. पैकी 'नेताजीं'मध्ये त्यांनी नेताजींचा जयजयकार केला आहे.

जयोऽस्तु ते! जयोऽस्तु ते!
जय जयोऽस्तु ते ध्वजधारी

अशी सुरुवात असलेल्या या कवितेत चहूबाजूला मृत्यूचे तांडव चालू असताना शांतपणे, गंभीरपणे आपल्या सेनेचे नेतृत्व करणाऱ्या नेताजींच्या 'मेघापरि गंभीर मूर्तीचे' वर्णन कवीने केले आहे. तर 'सुभाष' या कवितेत सुभाषचंद्रांच्या पराक्रमाने मातृभूमी हर्षित झाल्याचे आणि जग स्तिमित झाल्याचे सांगून कुसुमाग्रज सुभाषचंद्रांचे वर्णन करतात :

अधनेसाठी अमरवनीची फुले खुडायास
हिरावलेली परत आणण्यास रत्नांची रास
एकाकी जासी झुंजत वैऱ्यांवर
घन रात्रीत जैसा घुसतो अग्नीशर
तिमिरावर फुलवित तेजाचा मोहर

अशा वर्णनाची व्यक्ती निश्चितच गौरवाला पात्र आहे. कुसुमाग्रज ग्वाही देतात :

अमरत्वाच्या सारंगीवर छेडुनिया तांत
काळा होऊनी शाहिर गाईल तव गौरवगीत

ग. दि. माडगूळकर यांनी "पोचल्या दिल्लीला पलटणी..." या कवितेत नेताजींचे दिल्ली काबीज करण्याचे स्वप्न साकारले आहे अशी कल्पना केली आहे. नेताजींचे हे स्वप्न म्हणजे

"अहिंसकाच्या पदी वाहिली हिंसा नेताजींनी"

- असा अर्थ माडगूळकर करतात.

वसंत बापट यांनी 'जय सुभाष'मध्ये सुभाषचंद्रांच्या आझाद हिंद सेनेने अतिशय प्रतिकूल परिस्थितीत भारताच्या स्वातंत्र्याचा ध्यास घेतला होता त्याचे वर्णन करून

"बेचाळिस क्रांतिलागि दिव्य शक्ति भेटली, धन्य नृपति तू"

असा सुभाषचंद्रांच्या कामाचा गौरव केला आहे.

ग. ह. पाटील यांनी 'इंफाल' ही आझाद हिंद सेनेच्या पराक्रमावर आधारलेली कविता लिहिली आहे. त्यातला सैनिक म्हणतो,

"स्वातंत्र्य रवीला द्यायाला अर्घ्य हे!
रक्ताला आहे बोलावित रक्त हे!
ही हाक कुणाची? मातेची हाक ही
ऐकून संचरे मनी - चेतना नवी॥"

शाहीर प्रल्हादराय जामखेडकर यांनी ऐतिहासिक वीर पुरुषांबरोबर आधुनिक काळातील अनेक राष्ट्रपुरुषांवर ओजस्वी पोवाडे रचले आहेत. त्यातला एक नेताजी सुभाषचंद्र बोसांवरही रचला आहे. याशिवाय 'आझाद सेने'चाही एक पोवाडा त्यांनी लिहिला आहे. दोन्ही पोवाडे कल्पनाचातुर्य, भाषाप्रभुत्व आणि शब्दचमत्कृती यांनी युक्त आहेत.

शाहीर पांडुरंग दत्तात्रय खाडिलकर यांनीही सुभाषचंद्रांवर अतिशय ओजस्वी व श्रवणीय पोवाडा लिहिला आहे.

लोककवी मनमोहन यांनी सुभाषचंद्रांवर दोन कविता लिहिल्या आहेत : 'बावटा अर्धा अधिक घ्या खाली' आणि 'फिल्ड मार्शलची सलामी'.

त्यापैकी 'बावटा अर्धा अधिक घ्या खाली' या कवितेत आझाद हिंद सेनेतील वीरमरण आलेल्या पाच सैनिकांना अखेरची सलामी देणारे सुभाषचंद्र कवीने दाखवले आहेत. या कवितेतील सुभाषचंद्र म्हणतात :

भारत भूमीच्या विमोचनासाठी....
खांद्याला लावून खांदा। केली कुरवंडी कडोनिकडीला
लढताना एक - भाकरीला एक - जेवढे भारतीय सारे एक॥

- समानहिताच्या प्रश्नावर या देशातील सर्वांना संघटित होता येते असा संदेश या कवितेतून सुभाषचंद्रांच्या मुखातून कवीने दिला आहे. तर दुसऱ्या म्हणजे 'फिल्ड मार्शलची सलामी' या कवितेत 'माझी मायभूमी माझे सर्वस्व' आहे असे मानणारे सुभाषचंद्र रेखाटताना कवीने त्यांच्या तोंडी पुढील ओळी घातल्या आहेत :

तू मातृभूमी माझी - तू कर्मभूमी माझी
ही युद्धभूमी माझी - ही नाशभूमी माझी

असे मातृभूमीला सर्वस्व मानणारे सुभाषचंद्र इतर देशभक्तांच्या कार्याचेही कृतज्ञतेने स्मरण करतात :

'घर मानिले तुरुंग' गळफास माळ झाले
लाठीत मारलेले - ते लाल लाल गेले....

... जी अन्दमानमध्ये होती विनायकाची
ती चित्तरंजनाची, 'फडके' जतिंद्र यांची
झाशीतल्या 'धडां'ची कल्पितल्या 'शिरांची'
ती रंगदार केली - स्वप्ने तुझी उद्याची॥

कवितेच्या अखेरीस कवितेतला सुभाष जो आशावाद प्रगट करतात तो हृदयाला भिडणारा आहे :

मातीमध्ये मिळाला - जरि आज हा सुभाष
राहील तो स्मृतीने - झाला जिथे विकास॥

सरोजिनी बाबर यांनी 'व्यर्थ नसे बलिदान' या कवितेत स्वातंत्र्याच्या अभिलाषेने सुभाषचंद्रांनी केलेले बलिदान व्यर्थ गेले नाही अशी ग्वाही दिली आहे. तर हरीष मानधना यांनी 'जय नेताजी - जय सुभाष.' या कवितेत सुभाषचंद्रांच्या कार्याची माहिती देऊन

क्रांतिवीर तू सुपुत्र सच्चा भारतमातेचा
कलियुगातिल अर्जुन तू श्रीकृष्णाच्या गीतेचा!
स्वातंत्र्याविण कधी न धरला -
दुजा कोणता ध्यास!

असे त्यांचे मोठेपण वर्णिले आहे.

काही कवींनी सुभाषचंद्रांचा गौरव करीत असतानाच स्वातंत्र्यकाळात झालेला अपेक्षाभंगही व्यक्त केला आहे. राजा बढे यांनी 'क्रांतिमाला' या कवितेत सुभाषचंद्र आणि त्यांचे आझाद हिंद सैनिक यांनी केलेल्या कार्याची दखल घेऊन

'विसरलो तयांना स्वातंत्र्याच्या काली
तो त्याग तयांचा स्मृतीतही ना उरला
विसरलो सुभाषा - देश गौरवासाठी
तो कृष्णदास लागला जयाच्या पाठी
गगनात आज जो चंद्र सुखे मिरवावा
ते तेज घेऊनि करिती काजवे कावा

अशी खंत व्यक्त केली आहे.

अशीच खंत 'मला नेताजी भेटले' या कवितेत रमेश मानकर यांनीही

व्यक्त केली आहे. कवीने सुभाषचंद्र आपल्याला भेटले अशी कल्पना केली आहे. त्या भेटीत त्यांनी माझा स्वतंत्र देश काय म्हणतो असे विचारल्यावर कवी सांगतो :

कोठले स्वातंत्र्य.... कसले स्वातंत्र्य
बुरखा तो स्वातंत्र्याचा
नेताजी... दुर्दशा आहे
दानवाचे राज्य चालूच आहे
गरिबीच्या तालावर श्रीमंतांचा तोल आहे
नेताजी तुम्ही पाहिजे होता

हे ऐकल्यावर नेताजी संतप्त होतात. म्हणतात :

कृतिविना बडबड करतोस
आणि गहिवरून म्हणाले
ही घे ज्वाला... पुढे चला...
क्रांतीचा मंत्र दिला...
आणि म्हणाले "चलो दिल्ली"

सद्यकालीन स्थितीचे खेदाने वर्णन करताना क्रांतीचा मंत्र देणारे सुभाषचंद्र कवीने इथे रेखाटले आहेत.

शरद कळणावत यांनी मात्र 'नेताजी' ह्या कवितेत स्वार्थांध झालेल्या देशातील राज्यकर्त्यांच्या आणि जनतेच्या वागण्यामुळे आलेली ओशाळगत व्यक्त करताना अशा लोकांबद्दल सुभाषचंद्रांना आपुलकी वाटूच शकणार नाही अशी खात्री व्यक्त केली आहे :

"आम्ही शरमिंदे आहोत
स्वार्थांध सत्तेच्या पालख्या वाहणाऱ्या
ह्या गुलाम हातांचा सलाम
तू स्वीकारणार नाहीस....

याशिवाय सुभाषचंद्रांची देशभक्ती, त्यांचा दृढनिश्चय, निःस्पृहता याही गुणांचा कवीने कौतुकाने गौरव केला आहे.

कवितेकडून नाटकांकडे वळलो तर नाटकांमध्ये भा. वि. उर्फ मामा वरेरकर यांच्या 'सिंगापुरातून' या नाटकाचा उल्लेख करावा लागेल. वरेरकरांना सुभाषचंद्रांच्या कार्याने लिहिते केले खरे; पण सुभाषचंद्रांची भूमिका त्यांना पटलेली दिसत नाही. परकीयांच्या मदतीने इंग्रजांविरुद्ध सशस्त्र उठाव करणे ही

सुभाषचंद्रांची भूमिका गांधींजींच्या भूमिकेपेक्षा अगदी वेगळी असल्यामुळे वादग्रस्त ठरली होती. भारतात तीवर टीका होत होती. या टीकेचे पडसाद या नाटकात उमटलेले दिसतात. जपानने सिंगापूर काबीज केले, ब्रह्मदेशावर कब्जा केला, इंग्रज फौजांचा धुव्वा उडवला, हिंदी युद्धकैद्यांना मोकळिक देऊन भारतावर चालून जाण्यासाठी स्वतंत्र फौज उभी करण्याची सवलत दिली. या घटनांवर हे नाटक लिहिले आहे. या सर्व घटनांच्या मागे सुभाषचंद्रांची प्रेरणा होती. पण त्यांच्या नावाचा प्रत्यक्ष उल्लेख नाटककाराने कोठेही केलेला नाही. नाटकात सुभाषचंद्रांचा संदर्भ आहे हे त्यातल्या पुढील काही वाक्यांवरून लक्षात येते :

"संघटना म्हणे! ही कसली संघटना? फितुरी आहे ही. अन् तो एक माथेफिरू मिळालाय त्यांना पुढारी म्हणून. तोच झुलवतोय या लोकांना! तिकडे जर्मनीत होता ते बरं होतं. आम्हा हिंदी लोकांचा बुद्धिभेद करायला कशाला आलाय हा इकडे?" (पृ. २९) "फौजा उभारताहेत रडवे! आणि लढणार आहेत कुणाबरोबर? आग पाखडणार आहेत कुणावर? संहार करणार आहेत कुणाचा? आपल्या भाईबंदांचा ना? बंदुका देताहेत ना? घ्या म्हणावं आता हाती अन् झाडा गोळ्या या पिवळ्या माकडांवर" (पृ. ३१)

ही वाक्ये सुभाषचंद्रांबाबत आहेत हे जितके स्पष्ट आहे तितकेच ती सुभाषचंद्रांच्या भूमिकेला विरोध करण्यासाठी लिहिली आहेत हेही स्पष्ट आहे. किंबहुना हे नाटकच सुभाषचंद्रांच्या भूमिकेबाबतची प्रतिकूल प्रतिक्रिया व्यक्त करण्यासाठी लिहिले गेले आहे याबाबत शंकेला जागा रहात नाही. खुद्द नाटककारानेच हे नाटक करमणुकीसाठी नसून प्रचारासाठीच आहे असे नाटकाच्या प्रस्तावनेत जाहीर केलेले आहे. परंतु या नाटकातल्या कुठल्याही मताची जबाबदारी त्याने घेतलेली नाही. "कुठल्याही कथानकासाठी विशिष्ट मनोधर्माचे पात्र योजणे एवढीच लेखकाची जबाबदारी, पुढे पात्रांच्या मनोरचनेच्या अनुरोधाने लेखक जे विचार मांडतो ते त्या त्या विशिष्ट पात्राचे असतात." असे मत लेखकाने मांडले आहे. अर्थातच प्रस्तुत नाटकातील शांतारामच्या सुभाषचंद्रांच्या विरोधी असलेल्या विचारांची (आधी उद्धृत केलेली वाक्ये या शांतारामच्याच तोंडी लेखकाने घातली आहेत.) जबाबदारी घ्यायला लेखक तयार नाहीत.

नाटक प्रचारासाठीच असले तरी कोणत्याही काळात या नाटकाचा प्रयोग

हमखास परिणामकारक होईल अशी हमी लेखकाने दिली आहे. प्रयोगाचे हक्कही त्याने आपल्याकडे राखून ठेवले नव्हते. तरीही या नाटकाचे प्रयोग झाल्याचे दिसत नाही. याचा अर्थ असा की मराठी वाचकांना-प्रेक्षकांना वरेरकरांची ही सुभाषविरोधी भूमिका आवडली नाही.

नाटकापेक्षा कादंबरी-वाङ्मयात वेगळे चित्र दिसते. १९५५-५६ मध्ये ना. सी. फडके यांनी 'शोनान', 'अस्मान' आणि 'तुफान' या तीन कादंबऱ्या सुभाषचंद्रांनी जपानच्या सहकार्याने दूर पूर्वेत जो सशस्त्र उठाव केला त्याची समग्र हकीकत देण्याच्या हेतूने लिहिल्या. "या तीन कादंबऱ्या वाचून सुभाषचंद्रांच्या अवतारी थोरवीविषयी वाचकांना कल्पना आली आणि त्यांच्या अंतःकरणात नेताजींविषयी पूज्य भावनेची ज्योत पेटली तर एक गद्यकाव्य लिहिण्याच्या महत्त्वाकांक्षेचे, प्रयत्नाचे आणि लेखनगुणाचे सार्थक्य झाल्यासारखे आपल्याला वाटेल" असे फडक्यांनी या कादंबऱ्यांच्या प्रस्तावनेत नमूद केले आहे.

या कादंबऱ्या लिहिण्यापूर्वी फडक्यांनी दूरपूर्वेत प्रवास केला, नेताजींच्या कमीअधिक निकट सहवासात आलेल्या व्यक्तींशी भेटीगाठी घेतल्या, (वरेरकरांनी हे असे काही केले नव्हते.) तसेच सुभाषबाबूंच्या सशस्त्र उठावाचा अभ्यासही केला. या सर्वांतून नेताजी हे एक अवतारी पुरुष होते अशी भावना लेखकाच्या मनात उत्पन्न होत गेली. त्यांच्या कादंबऱ्यांतूनही ती प्रगट झालेली दिसते.

फडक्यांच्या कादंबरीत्रयीतली पहिली कादंबरी 'शोनान'. दुसरे महायुद्ध सुरू झाल्यानंतर दोन वर्षांनी म्हणजे १९४१ साली जपानने युद्धाची घोषणा केली आणि दूर पूर्वेतील अनेक ठाणी झपाट्याने काबीज करायला सुरुवात केली. सुभाषचंद्रांनी दूर पूर्वेत जो सशस्त्र उठाव केला त्याचे पहिले पर्व इथपासून सुरू होते. सयामच्या मुलखातून मलायात उतरून सिंगापूरच्या रोखाने जपानी फौजा निघाल्या. फेब्रुवारी बेचाळीस मध्ये सिंगापूर पडले. जवळजवळ चाळीस हजार गोरे आणि ऐंशी हजार हिंदी सैनिक युद्धबंदी झाले. जपान्यांनी युद्धबंदी हिंदी सैनिकांना स्वतंत्र सेना बनवून हिंदुस्थानावर चढाई करण्याची योजना सांगितली, शक्य ती मदत देण्याचे कबूल केले. हिंदी सैनिकांनी या योजनेचे स्वागत केले. त्यादृष्टीने हालचाल सुरू झाली. पण जपान्यांच्या या योजनेमागे स्वार्थी हेतू दडले आहेत हे लक्षात आल्यामुळे या कामाला गती आली नाही. परंतु २३ जुलै १९४३ ला सुभाषबाबू सिंगापुरात दाखल झाले. जर्मनीहून टोकिओला जपानी मुत्सद्यांशी आणि लष्करी अधिकाऱ्यांशी वाटाघाटी करूनच ते आले होते.

त्यांच्या सिंगापुरातल्या आगमनामुळे हिंदी स्वातंत्र्यसेनेची योजना प्रत्यक्षात येईल अशी आशा हिंदी लोकांना वाटू लागली. इथे सुभाषबाबूंच्या चळवळीचे पहिले पर्व संपते.

या पर्वावर ना. सी. फडके यांनी 'शोनान' ही कादंबरी लिहिली. जपान्यांनी सिंगापूर घेतल्यावर त्याला 'शोनान' हे नाव ठेवले. म्हणून या कादंबरीला फडक्यांनी 'शोनान' हे नाव दिले.

पहिले पर्व सुभाषबाबू सिंगापूरला येऊन दाखल झाले तिथे संपते, तिथूनच दुसरे पर्व सुरू होते. नेताजींच्या संघटनचातुर्यामुळे, धडाडीमुळे आणि लोकप्रियतेमुळे हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीत चैतन्य संचारले. स्वतंत्र हिंदी सरकारची स्थापना झाली. नऊ स्वतंत्र राष्ट्रांनी या सरकारचे सार्वभौमत्व मान्य केले. अंदमान आणि निकोबार बेटांवर या स्वतंत्र हिंद सरकारचा झेंडा फडकला. स्वतंत्र हिंद सरकारची बँक स्थापन झाली. शस्त्रसुसज्ज आझाद हिंदी फौज उभी राहिली. त्यात स्त्रियांचेही एक स्वतंत्र पथक सामील करण्यात आले. ही सेना 'चलो दिल्ली'ची घोषणा करत सिंगापूरहून निघाली. ब्रिटिश फौजेचा पाडाव करत करत तिने इंफालला वेढा घातला. त्यात विजय मिळेल अशी खात्री आझाद हिंद सेनेला वाटत होती. या वेढ्यावर सुभाषचंद्रांच्या सशस्त्र उठावाचे दुसरे पर्व संपते.

या पर्वाचे एक सबंध वर्ष हे नेताजींच्या व हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीच्या विजयाचे, आनंदाचे आणि उत्साहाचे वर्ष होते. आझाद हिंद सेनेला मिळालेल्या विजयामुळे नेताजींना, त्यांच्या अनुयायांना आणि सैनिकांना 'अस्मान' ठेंगणे वाटू लागले होते. म्हणून या दुसऱ्या पर्वावर आधारलेल्या कादंबरीला फडक्यांनी 'अस्मान' असे नाव दिले आहे.

इंफालच्या वेढ्यापर्यंत विजयाच्या लाटेवर स्वार असलेल्या आझाद हिंद सेनेच्या दुर्दैवाला या वेढ्यातच सुरुवात झाली. ठिकठिकाणी जपानचा पराभव होऊ लागला. आपल्या राष्ट्राचा बचाव कसा करावा या विवंचनेत जपानला आझाद हिंद सेनेच्या गरजांकडे लक्ष देणे अवघड होऊ लागले. जपानची मदत घटू लागली. नेताजींना चढाईची मोहीम तात्पुरती स्थगित करावी लागली. आझाद हिंद सेनेची पीछेहाट सुरू झाली. सर्वत्र विजयी होणाऱ्या दोस्त राष्ट्रांच्या वेढ्यात आझाद हिंद सेना पुन्हा पुन्हा सापडू लागली. पावसाळा संपल्यावर पुन्हा इंफालवर चढाई करण्याचा बेत नेताजींनी केला होता. पण त्याला अनुकूल असे

काही घडून येण्याची चिन्हे दिसत नव्हती. नेताजी तरी सुरक्षित राहतात की नाही याची त्यांच्या सहकाऱ्यांना काळजी वाटू लागली. त्यांनी नेताजींना रंगून सोडून बँकॉकला जाण्याचा आग्रह केला. याच वेळेस रशियानेही जपानविरुद्ध युद्धाची घोषणा केली. हिरोशिमावर बॉंब पडला. जपान शरण गेले. तरीही नेताजी हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी काय करता येईल हे बघण्यासाठी सिंगापूर ते बँकॉक आणि बँकॉक ते सिंगापूर अशा फेऱ्या घालत होते. पण काळ आणि दैव अनुकूल नव्हते. चारी बाजूने दुर्दैवाचे तुफान माजल्यासारखे झाले. शेवटी जपानशी अखेरच्या वाटाघाटी करण्यासाठी नेताजी बँकॉकच्या विमानतळावरून निघाले. याच प्रवासात १८ ऑगस्ट १९४५ ला विमान अपघातात नेताजींचा अंत झाला. नेताजींच्या मृत्यूने त्यांनी उभ्या केलेल्या चळवळीला जबरदस्त तडाखा बसला. या चळवळीचे तिसरे पर्व तिथे संपते. या पर्वावरच्या कादंबरीचे नाव 'तुफान'.

या तीन कादंबऱ्या मिळून दूरपूर्वेत १९४१ ते १९४५ या वर्षात हिंदी स्वातंत्र्यासाठी जी चळवळ झाली, त्यात सुभाषचंद्रांचा जो महत्त्वाचा वाटा होता त्याची माहिती देण्याचे काम ना. सी. फडके यांनी केले आहे. ही माहिती देताना फडक्यांनी सत्य घटना आणि व्यक्ती यांचे कल्पित प्रसंग व व्यक्ती यांच्याशी बेमालूम मिश्रण केले आहे. इतिहासाशी इमान राखले आहे, त्याच्याबरोबरच कल्पित प्रसंग आणि व्यक्ती यांची योजना करताना संभाव्यतेचे तत्त्व पाळले आहे. कल्पित पात्र आणि प्रसंग योजताना सत्य व इतिहासाला बाध न येता फक्त कलात्मक उठाव मिळेल याची काळजी फडक्यांनी घेतली आहे.

या तिन्ही कादंबऱ्या नायक किंवा नायिका-प्रधान नाहीत. यात व्यक्तींना तसे प्राधान्य नाही. साऱ्या चळवळीचे सूत्रधार नेताजी. परंतु त्यांचेदेखील चरित्र लिहिणे हा लेखकाचा हेतू नाही. या तिन्ही कादंबऱ्यांत महत्त्व दिले आहे ते त्या त्या वेळच्या परिस्थितीला, वेगवेगळ्या व्यक्तींच्या मनावर त्या परिस्थितीच्या ज्या प्रतिक्रिया घडल्या त्यांना, उलटसुलट आंदोलनांना, प्रक्षोभाला, वातावरणाला.

असे असले तरी या कादंबऱ्यांतून सुभाषचंद्र साकारतातच. आणि ते साकारतात एक लोकप्रिय असामान्य व्यक्तिमत्व म्हणून! हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळवून देण्याचे ध्येय समोर ठेवणारे एक अवतारी पुरुष म्हणून! त्यांची देशभक्ती, त्यांची धडपड, प्रतिकूल परिस्थिती, पुढे न झुकणारी त्यांची अशरण

वृत्ती, आपल्या सेनेतल्या लोकांबद्दल त्यांना असलेली आपुलकी, अगदी क्षुल्लक गोष्टींबाबतही जागरूक असण्याचा आणि ती नीट पार पडावी यासाठी काळजी घेण्याचा काटेकोरपणा या सर्वांची कल्पना या चित्रणातून येते.

सुभाषचंद्रांच्या अमाप लोकप्रियतेचेही दर्शन या कादंबऱ्यांतून घडते. त्यासाठी लेखकाने अनेक प्रसंग उभे केले आहेत. ते उभे करताना भावनेचा आणि भक्तीचा गहिवर असा व्यक्त होतो की सुभाषचंद्र अवतारी पुरुष होते याची लेखकालाही खात्री असल्याचे वाचकांना जाणवावे.

फडक्यांची हीच खात्री त्यांच्या 'निर्माल्य' या कादंबरीतही प्रगट झाली आहे. ही कादंबरी सुभाषचंद्रांवर नाही किंवा सुभाषचंद्रांच्या चळवळीचा इतिहास सांगण्यासाठीही लिहिलेली नाही. एका सामान्य प्रवाहपतित माणसाच्या सफल प्रेमाची कहाणी फडक्यांनी या कादंबरीत सांगितली आहे. हा माणूस आपल्या आईच्या मृत्यूचे दुःख विसरण्यासाठी आणि मुळीच प्रेम नसताना जिच्याशी एकांत घडला अशा स्त्रीपासून सुटका करून घेण्यासाठी आझाद हिंद सेनेत भरती होतो. म्हणून या कादंबरीत आझाद हिंद सेनेच्या मोहिमांची आणि सुभाषबाबूंच्या व्यक्तिमत्वाच्या काही पैलूंची माहिती येते. सुभाषबाबूंच्या मृत्यूनंतर आझाद हिंद सेनेची वाताहत होते. कादंबरीचा नायक भारतात परत येतो. इकडे त्याची भेट आझाद हिंद सेनेतल्या सुभाषबाबूंच्या एका निकटवर्ती अधिकाऱ्याशी होते. त्याच्याबरोबर त्याच्या वर्तमानपत्रासाठी काम करताना पुन्हा एकदा सुभाषबाबूंच्या आठवणींना उजाळा मिळतो.

त्या सर्वांतून सुभाषबाबू प्रतीत होतात ते लोकप्रिय, झुंजार आणि कनवाळू नेता म्हणून. पण या कादंबरीच्या नायकाला सुभाषचंद्रांचे चरित्र लिहिण्यासाठी सामुग्री गोळा करताना त्यांचा एक वेगळा विशेष जाणवतो. तो सांगतो, "नेताजी विद्वान होते, पंडित होते, देशभक्त होते हे सगळं झालं. परंतु अंतर्यामी ते होते परमेश्वराचे भक्त आणि उपासक." पुढे तो असेही म्हणतो, "म्हणूनच त्यांची खरी साक्षात्कारी मूर्ती घडवणं फार कठीण आहे. त्यांच्या मुद्रेवर शौर्य दिसलं पाहिजे, करार दिसला पाहिजे, आत्मविश्वास प्रगट झाला पाहिजे, मायदेशाच्या स्वातंत्र्याचे स्वप्न पाहणारे एक थोर साहसी पुरुष ते होते याची साक्ष त्यांच्या मुद्रेवर दिसली पाहिजे. परंतु सगळ्यात महत्त्वाची गोष्ट ही की त्यांची नजर परमेश्वरावर श्रद्धा ठेवणाऱ्या कर्मयोगी भक्ताची वाटली पाहिजे." (पृ. २१६)

या कादंबरीत आणखी एक गोष्ट दाखवली आहे. नेताजींच्या हयातीत

त्यांच्या शब्दाखातर त्यांच्या व्यक्तिमत्वाने प्रभावित होऊन लोक आझाद हिंद सेनेत सामील होत. सेनेला भरघोस साह्य करीत. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्यावरील प्रेमाच्या समान धाग्याने लोक एकत्र येतात. कादंबरीचा नायक नेताजींच्या मृत्यूनंतर क्यानी नावाच्या नेताजींच्या निकटवर्ती सेनाधिकाऱ्याला भेटतो. त्यांच्या 'जय हिंद' या वर्तमानपत्रात काम करू लागतो. क्यानींनी हे वर्तमानपत्र नेताजींसंबंधीचे लोकांचे गैरसमज दूर करण्यासाठी काढलेले असते. क्यानींची नेताजींवर इतकी श्रद्धा आणि प्रेम असते की आपल्या काही खाजगी आणि काही सार्वजनिक समस्यांवर सल्ला मागण्यासाठी ते जेव्हा प्लँचेटचा प्रयोग करतात, तेव्हा ते सुभाषचंद्रांच्या आत्म्याला प्लँचेटवर बोलावतात. सुभाषचंद्रांचा आत्मा येतो आणि प्रश्नांची उत्तरेही देतो. अशाच एका प्रश्नाच्या उत्तरात "आपण जिवंत नाही, आपल्याला जिवंत समजणं हा वेडेपणा आहे" असे तो सांगतो.

प्लँचेटच्या या प्रयोगातून सुभाषबाबूंबद्दल लोकांना किती प्रेम आणि भरवसा होता हे दाखवत असतानाच फडक्यांनी सुभाषचंद्रांच्या मृत्यूबाबत चालू असलेल्या वादालाही एकप्रकारे पूर्णविराम देण्याचा प्रयत्न केला आहे.

सुभाषचंद्रांच्या मृत्यूबाबत एक निर्णायक मत प्रगट करण्यातले वेगळेपण सोडले तर 'निर्माल्य'मध्ये सुभाषचंद्र आणि आझाद हिंद सेनेतले सैनिक यांचे कर्तृत्व दाखवणारे जे अनेक प्रसंग आणि वर्णने येतात ती फडक्यांच्या 'शोनान', 'अस्मान' आणि 'तुफान' या कादंबरीत्रयात आधीच येऊन गेली आहेत. परंतु ती तिथे जशी परिणामकारक होतात तशी ती या कादंबरीत होत नाहीत. याबाबतीत 'युगप्रवर्तक फडके' या ग्रंथाच्या लेखकद्वयाने दिलेला अभिप्राय अगदी योग्य आहे. ते लिहितात, "वस्तुतः सुभाषबाबूंच्या अतिपूर्वेतील उठावावर 'शोनान', 'अस्मान', 'तुफान' अशा ज्या तीन कादंबऱ्या फडक्यांनी लिहिल्या त्यांच्याच जातीतली ही कादंबरी. मात्र त्या कादंबऱ्यांत स्वातंत्र्यार्थ झगडलेल्या जीवांची जी अविस्मरणीय चित्रे फडक्यांनी रंगवली त्यांचा अभावच या कादंबरीत आहे. किंबहुना असेही म्हणावयास हरकत नाही की सुभाषपूजेसाठी जी गेंदेदार फुले फडक्यांनी जमवली ती मनसोक्त वाहिल्यानंतर उरलेल्या फुलापानांचा हा पाचोळा आहे, निर्माल्य आहे. जिवंत रसरशीत असे यात काही नाही." (पृ. ४०१)

फडक्यांच्या आतापर्यंत बघितल्या त्या चारही कादंबऱ्यांत नेताजींचे व्यक्तिचित्र रेखाटले गेले असले तरी नेताजी हे काही त्या कादंबऱ्यांचे नायक

नाहीत. वि. स. वाळिंबे यांनी लिहिलेल्या 'नेताजी' या चरित्रात्मक कादंबरीत मात्र सुभाषचंद्र हेच नायक आहेत. सुभाषचंद्रांच्या शाळेच्या पहिल्या दिवसापासून सुरू होणारी ही कादंबरी नेताजींच्या मृत्यूने संपते. पत्रे, भाषणे, वृत्तपत्रांतील बातम्या इत्यादी ऐतिहासिक साधनसामुग्रीचा उपयोग करून नेताजींचे सबंध आयुष्य वाळिंब्यांनी वाचकांसमोर ठेवले आहे.

नेताजींची स्वदेशातील आणि परदेशातील विद्यार्थीदशा, भारतातील राजकारण, सुभाषचंद्रांचा त्यात प्रवेश, गांधी-नेहरू-वल्लभभाई प्रभृतींनी सुभाषचंद्रांच्या नेतृत्वाबाबत दाखवलेला अन्याय्य अविश्वास, काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून काम करताना या नेत्यांनी त्यांच्या मार्गात उभे केलेले अडथळे, त्याविरुद्ध सुभाषबाबूंनी दिलेली एकाकी झुंज, इंग्रज सरकारने त्यांच्याबाबत सतत व्यक्त केलेली सूडबुद्धी, सरकारची दडपशाही, सुभाषबाबूंना त्यापायी पुन्हा पुन्हा भोगाव्या लागलेल्या तुरुंगवासाच्या शिक्षा, तुरुंगवासाचे शारीरिक-मानसिक परिणाम, इंग्रज सरकारच्या नजरकैदेतून सुभाषबाबूंचे पलायन, काबूल मार्गे जर्मनीत प्रवेश, आझाद हिंद सरकारची स्थापना, इंग्लंडविरुद्ध लढणाऱ्या जर्मन-जपानी-इटली या राष्ट्रांचे सहकार्य मिळवण्यासाठी सुभाषचंद्रांनी केलेले प्रयत्न, जर्मनीतून जपानपर्यंत पाणबुडीतून केलेला प्रवास, सिंगापूरला येऊन आझाद हिंद सेनेसाठी मिळवलेली मदत, सेनेचे नेतृत्व, इंफालच्या पराभवानंतर घेतलेली माघार या सर्वांची तपशीलवार माहिती या कादंबरीत येते.

या माहितीतूनच नेताजींची बुद्धिमत्ता, दूरदृष्टी, मानसशास्त्रात असलेला रस, देशभक्ती, स्वातंत्र्यप्रेम, निर्भयपणा, झुंजारपणा, गुणग्राहकता, लोकसंग्राहकता, आशावाद, उत्साह, ढासळलेल्या प्रकृतीपुढे किंवा प्रतिकूल परिस्थितीपुढे न झुकण्याचा निर्धार, प्रसंगांना सामोरे जाण्याची जिद्द, अध्यात्माकडचा ओढा असे त्यांच्या व्यक्तिमत्वाचे पैलू प्रगट होतात.

खरे म्हणजे हे लेखन कादंबरीपेक्षा चरित्रात्मक अधिक आहे. कारण ऐतिहासिक पुराव्यांचा इथे कटाक्षाने उपयोग केला आहे. कल्पनेचे साह्य लेखकाने घेतले आहे, पण फारच थोडे. वास्तविक नेताजींच्या खाजगी आयुष्यातील त्यांचा विवाह, कन्यारत्नप्राप्ती यासारखे प्रसंग लेखकाला कल्पनेने खुलवून सविस्तर लिहिता आले असते. पण हे दोन्ही प्रसंग लेखकाने इतिहासकाराच्या तटस्थतेने आणि पुराव्यांचा आधार घेऊनच लिहिले आहेत हे पुढील उताऱ्यांवरून लक्षात येईल :

(१) "सुभाषबाबू बर्लिनला परतले. येताना ते व्हिएन्नाला जाऊन एमिलीला बरोबर घेऊन आले.

युरोपमधल्या मागच्या वास्तव्यात ती त्यांची सचिव होती. आता सहचारिणी होणार होती.

सुभाषबाबूंनी एमिलीशी नोंदणी पद्धतीने विवाह केला. साक्षीदार होते डॉ. ट्रॉट आणि डॉ. धवन.

सुभाषबाबूंनी प्रथम 'हॉटेल कैसरहॉफ'मध्ये आपला संसार मांडला. लवकरच केपलर यांनी त्यांना शार्लटनबर्ग भागातला बंगला बहाल केला. पूर्वी तेथे अमेरिकन दूतावासातील लष्करी सचिव रहात असे. महायुद्ध सुरू झाल्यापासून तो बंगला रिकामाच होता. सुभाषबाबू अजून 'ओर्लान्दो माझोता'तच होते. बंगल्याच्या प्रवेशद्वारावर तोच नामफलक झळकू लागला.

तरुणपणी सुभाषबाबू विवेकानंदांच्या कर्मयोगाने प्रभावित होऊन गेले होते. आता त्यांना प्रेमयोगाची महती जाणवत होती.

सूर्योपासकालाही कधीमधी चंद्रधुंद व्हावेसे वाटते.

हीही बेहोषी, तीही बेहोषी. दोन्ही तेवढ्याच उत्कट, अथांग." (पृ. ४०३)

(२) "सुभाषबाबू बर्लिनला परत आले. आपले पूर्वेकडचे प्रस्थान लांबले, याचे सुभाषबाबूंना एका परीने बरे वाटले.

एमिली गरोदर होती. अपत्यमुख पाहून युरोप सोडावा असे सुभाषबाबूंनी ठरवले.

प्रसूतीसाठी एमिली व्हिएन्नाला गेली. नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात सुभाषबाबूंना कन्यारत्न झाले - अनिता.

१९४२ चा नाताळ सुभाषबाबूंनी व्हिएन्नामध्ये एमिलीच्या सहवासात आणि अनिताला डोळे भरून पाहण्यात व्यतीत केला.

पत्नी आणि नवजात कन्या पुन्हा केव्हा भेटतील हे सांगणे कठीण होते." (पृ. ४३३)

अशा रीतीने नेताजींच्या खाजगी आयुष्यातील उत्कट क्षण जे कल्पनेने उभे करायचे ते लेखकाने थोडक्यात वर्णिले असले तरी स्वातंत्र्यसंग्रामाचे सरसेनानी नेताजी यांचे चित्र मात्र त्यांनी विस्ताराने, मनःपूर्वक आणि उत्कटतेने रेखाटले आहे.

अगदी अलीकडे म्हणजे १९९७ मध्ये 'धर्मभास्कर'च्या वर्षारंभ विशेषांकात डॉ. कल्याणी हर्डीकर यांनी सुभाषचंद्रांवर लिहिलेली 'स्वप्नमग्न' या नावाची एक लघुकादंबरी प्रकाशित झाली आहे.

या कादंबरीत सुभाषचंद्रांच्या जन्मापासून ते कलकत्त्याच्या त्यांच्या निवासस्थानातून वेषांतर करून ते बाहेर पडलेत इथपर्यंतच्या घटनांचे चित्रण लेखिकेने केले आहे. कादंबरी लघु असल्यामुळे सगळ्या घटनांचे वर्णन संक्षिप्त आहे.

कादंबरीचे नाव 'स्वप्नमग्न' असले तरी सुभाषचंद्रांच्या चित्रणात त्यांचे स्वप्नाळू किंवा स्वप्नमग्न असे रूप फारसे प्रगटत नाही. अत्यंत विचारपूर्वक निश्चित केलेल्या ध्येयाच्या प्राप्तीसाठी सतत संघर्ष करणारा कर्मवीर अशी सुभाषबाबूंची प्रतिमाच या कादंबरीतून साकारते.

आतापर्यंत सुभाषचंद्र आणि त्यांचे कार्य यांचे चित्रण मराठी साहित्यात जिथे तिथे झाले आहे त्याचा विचार केला. विचारात घेतलेले साहित्य १९३९ ते १९९७ या काळातले आहे. म्हणजे सुभाषचंद्रांच्या हयातीत त्यांच्याबद्दल लिहायला मराठी लेखकांनी प्रारंभ केला आणि त्यांच्या मृत्यूला पन्नासाहून अधिक वर्षे लोटल्यावरही त्यांच्यावर ते लिहिताहेत. याचा अर्थच हा की अलौकिक व्यक्तिमत्वे आणि कार्ये ही कालातीत असतात. म्हणून ती नेहमीच प्रेरणादायी असतात, सृजनशील मनाच्या चिंतनाचा विषयही होतात.

● ●

**************************

# देश नायक

**रवींद्रनाथ ठाकूर**

**************************

सुभाषचंद्र,

मी एक बंगाली कवी, आज वंगदेशाच्या वतीनं तुला देशनायक ही पदवी देऊन तुझं स्वागत करतो आहे. गीतेत म्हटलं आहे की सत्कृत्यांच्या रक्षणासाठी आणि दृष्कृत्यांच्या विनाशासाठी संरक्षक वारंवार अवतीर्ण होत असतात. राष्ट्र जेव्हा अधोगतीच्या जाळ्यात अडकून पडतं तेव्हा पीडित देशाच्या अंतर्वेदनेतूनच देशाचा नायक निर्माण होत असतो. राज्यशासनाच्या शोषणानं आणि परस्परकलहातून निर्माण होणाऱ्या गलितगात्र अवस्थेमुळं वंगदेशाच्या आकाशात आज काळेकुट्ट मेघ दाटले आहेत. आपली शक्ती कमी होत चालली आहे आणि विरोधी शक्ती बलदंड होते आहे. आपल्या आर्थिक धोरणात, कामकाजात आणि श्रेयस्कर नीतिमत्तेत अनेक छिद्रं निर्माण झाली आहेत, आपल्या राजकारणात कशाचाच कशाशी मेळ नाही. जीर्ण शरीराला रोगानं पोखरावं तशी विनाशकालीन विपरीत बुद्धी एकदा डोक्यात शिरली की भेदभावांचं काहूर उठतं. जवळच्यांना दूर लोटलं जातं, आपल्यांना परकं मानलं जातं, आदरणीय गोष्टींचा अवमान केला जातो, स्वपक्षालाच मागून मारून दुर्बळ केलं जातं. अस्मितेच्या उचित मान्यतेसाठी श्रद्धेची वेदी स्थापन करून स्वतःच्या समाजाला सर्व जगासमोर डोळ्यात भरेल अशा उच्च स्थानावर नेऊन स्वाभिमानाचं रक्षण करायचं असतं, तेव्हा त्याच वेदीवरून संशयग्रस्त आत्मघातक मूर्खपणा परस्परनिंदेची छिद्रं खणत राहतो, आपल्या माणसांचा द्वेष करून शत्रुपक्षाच्या आक्रमकतेला सबळ करत असतो.

बाहेरून घाव बसल्यामुळे झालेली जखम जेव्हा शरीरावर पसरत जाते तेव्हा आपल्या शिरांमधलं सगळं सुप्त विष जागृत होऊन परिस्थिती गंभीरतेकडे जाऊ लागते. आणि आतल्या व बाहेरच्या या एकत्र आक्रमणामुळे गळून गेलेलं मन स्वतःला निरोगी करण्याची पूर्ण शक्ती कार्यान्वित करू शकत नाही. अशा कठीण परिस्थितीत अशा एका प्रतिष्ठित सामर्थ्यवान पुरुषाचा हात अतिशय आवश्यक असतो की जो विजयाच्या मार्गात येणाऱ्या प्रतिकूलतेला तेजस्वीपणे दूर सारू शकेल.

सुभाषचंद्र, तुझ्या राष्ट्रीय साधनेच्या आरंभकाळात मी तुला दुरून बघत होतो. अंधार-उजेडाच्या त्या अस्पष्ट मुहूर्ताच्या वेळी तुझ्याबद्दल माझ्या मनात खूप संशय होता, तुझ्यावर संपूर्ण विश्वास बसत नव्हता. कधीकधी तुझ्या मनातले गोंधळ, तुझा दुबळेपणा जाणवून वाईट वाटत असे. पण आज तू ज्या उज्ज्वल प्रकाशात तेजाळून निघाला आहेस त्यात अजिबात संदिग्धता नाही, आज मध्यान्ही तुझी ओळख पूर्णपणे पटली आहे. जीवनात तू खूप अनुभव घेतले आहेस, कर्तव्याच्या बाबतीत तुझी निष्ठा म्हणजे तुझ्या आत्मशक्तीची साक्षच होय. या शक्तीची अतिशय कठीण परीक्षा होत गेली. कारावासातल्या दुःखातून, बहिष्कारतेतून आणि असाध्य रोगाच्या आक्रमणातून. पण या कशानंच तुझ्यावर काही परिणाम केला नाही, उलट तुझं मन अधिकाधिक विस्तारत गेलं, तुझी दृष्टी देशाची संकुचित सीमा पार करून इतिहासाच्या अतिविस्तृत क्षेत्रावर जाऊन पोहोचली. दुःखाला तू एक चांगली संधी मानलंस, विघ्नांमधून सोपान तयार केलास. कुठल्याच पराभवाला तू कधीही हेच संपूर्ण सत्य असं मानलं नाहीस म्हणूनच हे सर्व शक्य झालं. तुझ्या व्यक्तित्वाच्या या शक्तीलाच वंगदेशाच्या अंतरंगात संचारित करणं हीच आजची सर्वात महत्वाची गरज आहे.

निरनिराळ्या कारणांमुळे स्वकीयांच्या व परकीयांच्या हाती पडून वंगदेशाला काही संधी लाभल्या नाहीत. या दुर्भाग्यालाच स्वतःच्या पौरुषाच्या आकर्षणशक्तीनं सौभाग्याच्या आशीर्वादात परिवर्तित करायला हवं आहे. तात्पुरत्या पराभवाला अमान्य करण्यासाठी जी शक्ती निर्माण होते ती खूप हिंमत देणारी असते आणि म्हणूनच ती पराभवाला विजयपथावर नेऊ शकते. मला आज चहूकडे असं दिसतंय की वंगदेशाचं निर्दय दुर्दैव या शक्तीला ग्रहणच करू इच्छित नाही. या अनिच्छेला झटकून टाकून जर वंगदेश खंबीरपणे आत्मसंरक्षक

दुर्ग तयार करण्याची साधनं आमच्या स्वतःच्या चारित्र्यातच आहेत असं म्हणू शकला, ही साधनं ज्या भांडारगृहात बंद होऊन बसली आहेत त्या भांडाराची कुलुपं फोडून ती साधनं पुन्हा हस्तगत करू शकला तरच तो वाचेल. या हिंस्र अशुभकाळाच्या पाठीवर चढूनच या भयंकर काटेरी मार्गावरून पार व्हावं लागेल. या भयानक धाडसी मोहिमेला तूच उत्साह देऊ शकतोस या आशेनंच तुला आपल्या या यात्रेच्या नेतृत्वपदावर मी आवाहन करीत आहे.

या अशक्य आणि असाध्य वाटणाऱ्या लक्ष्याकडे पोहोचणं जर आपण सर्व एकत्र आलो तरच शक्य आहे. आपली सर्वात कठीण समस्या हीच आहे. पण जर-तर ची भाषा वापरून संशय व्यक्त करण्यात काय अर्थ आहे! एकत्र यावंच लागणार आहे. कारण देशाला वाचवायचं आहे. बंगाली समाज नियतीपुढे नतमस्तक होऊन मरणार नाही अशी आशेची ज्योत तू जागव, भयंकर आघात सोसूनही वंगदेश आघातांवर मात करून ताठ मानेनं उभा राहील. तुझ्यात दुर्दम्य तारुण्य आहे, दाराशी आलेल्या संकटातही आशेचा अंकुर जागृत ठेवण्याची अनिवार शक्ती आहे तुझ्या व्यक्तिमत्वात. त्या द्वंद्वमुक्त मृत्युंजय आशेचा ध्वज तू वंगदेशाच्या जीवनक्षेत्रात घेऊन येशील अशी इच्छा मनात धरूनच मी आज देशनायकाच्या पदावर तुझं अभिनंदन करतो आहे - खड्या स्वरात आणि असंदिग्धपणे आज बंगाली समाजानं एकमुखानं म्हणावं की तुझ्यासाठी हे आसन सिद्ध आहे. तुझ्या नेतृत्वामुळे बंगाली समाजातील परस्परविरोधी गाठी सैल होवोत, तुझ्या आदर्शांमुळे या समाजातील हीनता व दीनता लज्जित होऊन धिक्कार पावो, विजयात अथवा पराजयात स्वतःचा स्वाभिमान अखंडित ठेवून हा समाज तुझा आब राखो.

बंगाली माणूस मूलतः तार्किक स्वभावाचा आहे. अतिशय क्षुद्र बाबींवर तर्कवितर्क करून कुठल्याही कार्याला सुरवातीपासून शेवटपर्यंत भलत्याच विपरीत मार्गावर नेण्यात त्याला स्वतःच्या वंध्या बुद्धीचा अभिमान वाटतो, विरोध करण्यात विचित्र आनंद वाटतो. संपूर्ण प्रश्नाकडे समग्रपणे बघण्यापेक्षा लहानलहान छिद्रं शोधण्यात जास्त उत्साह वाटतो. अशी तार्किकता म्हणजे कर्महीन बुद्धीचा निष्फळ विलास असतो ही गोष्ट तो विसरून जातो. आज तर्कटतेची नव्हे तर कर्तव्यनिष्ठेतून निर्माण होणाऱ्या इच्छाशक्तीची जास्त आवश्यकता आहे. बंगाली माणसानं स्वतःच्या ऐक्यबद्ध इच्छेनं तुझं नेतृत्वपदावर स्वागत करावं आणि त्यांच्या या इच्छाशक्तीतून तुला तुझ्या महान जबाबदारीची

जाणीव व्हावी. त्यांची इच्छाशक्ती तुझ्या व्यक्तित्वतेजाच्या सहाय्यानं समग्र देशाचं आत्मरूप जागृत करो.

वंगदेशाची इच्छाशक्ती किती तीव्र आहे हे मी वंगभंग-विरोधी चळवळीच्या वेळी प्रत्यक्ष पाहिलं आहे. वंगदेशाचं शरीर द्विखंडित करण्यास उचललेल्या तलवारीला या इच्छाशक्तीनं पराभूत केलं होतं. अतिशय सामर्थ्यवान शक्तीविरुद्ध बंगाली माणूस ज्यावेळी ऐक्यबद्ध झाला होता त्यावेळी त्यानं राजशक्तीच्या या निर्णयावर वादविवाद केले नाहीत, पांडित्यपूर्ण चर्चा केल्या नाहीत, फक्त मनःपूर्वक इच्छेच्या प्रेरणेनंच तो कार्यप्रवृत्त झाला होता.

त्यानंतरच्या पिढीनं या इच्छाशक्तीचं अग्निगर्भरूप दाखवून दिलं, बंगाली तरुणांच्या मनाचं ते रूपही मी पाहिलं आहे. देशात तेजाचा दीप उजळण्यासाठीच ते जन्मले होते पण चुकून त्यांनी आग लावून टाकली, स्वतःलाच जाळून घेतलं, जो मार्ग सुपथ होऊ शकला असता त्याला विपरीत रूप देऊन टाकलं. त्या भयंकर चुकीमुळे विफलता निर्माण झाली पण तीतूनही त्यांच्या वीर हृदयाची थोरवी प्रकट व्हायची ती झालीच. साऱ्या भारतवर्षात त्यावेळी अशी वीरता इतरत्र कुठेही मला दिसली नाही. त्या तरुणांचा तो त्याग, दुःखामागून दुःख सोसण्याची ताकद, ते बलिदान, सर्वच निष्फळ आणि भस्मसात् झालं खरं पण त्यांनी निर्भय मनानं ही झेप घेऊन वंगदेशाच्या अजेय इच्छाशक्तीचं प्रतीक नेहमीकरता दाखवून दिलं आहे. इतिहासाच्या या अध्यायात असहिष्णु यौवनाची जी हृदयविदारक उन्मत्तता दिसली, त्यावर कायद्यानं कितीही काळिमा फासण्याचा प्रयत्न केला तरी त्यांच्या अंतरंगातील तेजस्वितेवर कलंक लागू शकला का!

आपल्या देशात दुबळेपणाची लक्षणं खूप दिसतात पण ज्याठिकाणी सबळता दिसते तिथूनच आशेचा अंकुर फुटतो भविष्याच्या भूगर्भात. या प्रत्येक आशेच्या अंकुराला प्राणवंत व फलप्रसू करण्याचा भार तुला घ्यावा लागेल; बंगाली समाजाच्या स्वभावात जे काही श्रेष्ठ गुण आहेत - त्याची कल्पनाशक्ती, त्याची सहृदयता, अपरिचित संस्कृतींचं दान सहजपणे ग्रहण करण्याची शक्ती - या सर्व गुणांना भावनाप्रधानतेकडून कर्तव्यनिष्ठेच्या मार्गावर घेऊन जावं लागेल. देशातल्या जुनाट जीर्णतेला दूर सारून, तामसीपणाच्या आवरणातून मुक्त करून, नवीन वसंतऋतूत नवीन प्राण अंकुरित करण्याचं सृजनव्रत तू ग्रहण कर.

तू म्हणशील की इतकं मोठं कार्य कोणी एक माणूस करू शकत नसतो.

गोष्ट खरी आहे. अनेक माणसंसुद्धा तुटकपणे करू शकत नाहीत. एखाद्या केंद्राच्या आकर्षणात देशातली सर्व माणसं ऐक्यबद्ध होऊ शकली तरच हे कठीण कार्य सिद्धीला जाऊ शकेल. जे देशाचे स्वभावसिद्ध खरेखुरे प्रतिनिधी असतात ते कधीच एकटे नसतात. ते सार्वजनिक असतात आणि संपूर्ण काळावर त्यांचा अधिकार असतो. ते वर्तमानाच्या गिरिशिखरावर उभे राहून भविष्याच्या सूर्योदयाच्या किरणांना नतमस्तक होऊन प्रथम अर्घ्यदान करतात. ही गोष्ट मनात ठेवूनच मी आज तुला वंगदेशाचा राष्ट्रनेता म्हणून आवाहन करतो आहे आणि त्याबरोबरच तुझ्या पार्श्वभूमीवर समग्र देशालाही.

याचा अर्थ चुकूनही असा होऊ नये की वंगदेशाला मी प्रादेशिकतेच्या जाणीवेनं भारतवर्षापासून वेगळा मानू इच्छित आहे, अथवा राष्ट्रधर्माच्या बाबतीत ज्या महात्मा पुरुषानं साऱ्या जगात एक नवीन युग निर्माण करून भारतवर्षाला संपूर्ण जगात प्रसिद्ध केलं आहे त्याच्या कार्याशी प्रतिस्पर्धा करू शकणारं स्थान निर्माण करू इच्छित आहे. समग्र भारतवर्षाशी वंगदेशाचं पूर्णपणे मीलन व्हावं, हे मीलन मूल्यवान व फलप्रसू व्हावं, वंगदेश शक्तिहीन होऊन मागे पडू नये, म्हणूनच माझं हे आवाहन आहे. भारतवर्षात राष्ट्रमीलनाचा जो महायज्ञ आज सुरू झाला आहे, त्यात आहुती देण्यासाठी प्रत्येक प्रदेशाला काही उपयुक्त सामग्री सजवून आणावी लागणार आहे. तुझ्या प्रयत्नानं वंगदेशाची ती आत्माहुतीची सामग्री शोडषोपचारांनी सिद्ध होवो, ओजस्वी होवो - तिचं स्वतःचं वैशिष्ट्य उज्ज्वल होवो.

अनेक दिवसांपूर्वी एका सभेत मी बंगाली समाजाचा अनागत अधिनायक कसा असावा त्याचं स्वप्नरूप रंगवलं होतं. त्यानंतर अनेक वर्षांनी आज मला वंगदेशाच्या त्या अधिनायकाचा सन्मान व स्वागत करण्याची प्रत्यक्ष संधी प्राप्त झाली आहे. तन-मन-धन अर्पण करून त्याच्या कार्यात सहभागी होण्याची माझी वेळ निघून गेली आहे, शक्तीही उरलेली नाही. आज फक्त शेवटचं कर्तव्य म्हणून मी वंगदेशाच्या इच्छाशक्तीला आवाहन करू शकतो. ती इच्छाशक्ती तुझ्या इच्छाशक्तीची मीलित होऊन पूर्णशक्ती होऊन उठो अशी मनोकामना व्यक्त करू शकतो. यानंतर फक्त आशीर्वाद देऊन निरोप घेतो तो ह्याच जाणीवेनं की देशाच्या दुःखाला तू स्वतःचं दुःख मानलंस, देशाचं अर्थपूर्ण स्वातंत्र्य तुझं सर्वोच्च पारितोषिक हाती घेऊन अग्रसर होत आहे. ● ●

(मूळ बंगाली लेखाचा अनुवाद : डॉ. वीणा आलासे)

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

# शृंखल - झंकार

**डॉ. वीणा आलासे**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

वीणा दास ही भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामात सक्रियपणे भाग घेऊन अनेक वर्ष कारावासात राहिलेली महिला. बंगालमधील स्वातंत्र्यसंग्रामाच्या अग्नियुगातील एक अग्निकन्या. वयाच्या विसाव्या वर्षी दीक्षान्त सभागृहात पदवी घेण्यासाठी जाऊन हिने दीक्षांत समारंभाचे भाषण देत असलेल्या गव्हर्नर जॅक्सन यांच्यावर गोळी झाडली होती. १९३२ सालच्या फेब्रुवारी महिन्यातली ही घटना. गोळी हुकली पण या विलक्षण धाडसामुळे तत्कालीन संग्रामी तरुण-तरुणींच्या जीवनात खळबळ झाली आणि वीणा दास यांच्या आयुष्याचं भवितव्यही काही प्रमाणात निश्चित होऊन गेलं. १९३२ ते १९३९ पर्यंत कारावास, त्यानंतरच्या बदललेल्या राजकारणातील सहभाग, पुन्हा १९४२ ते १९४५ कारावास, नौखालीच्या दंग्यानंतर समाज संघटनाचे काम, अनेक सत्याग्रह व संप यांच्यातील नेतृत्व आणि शेवटी स्वातंत्र्याच्या महिनाभर आधी लिहायला घेतलेलं 'शृंखल-झंकार' हे आत्मचरित्र. आठ जुलैला लिहायला सुरुवात करून १० ऑगस्ट १९४७ या दिवशी हे चरित्रलेखन संपलं त्यावेळी लेखिकेचं वय पस्तीस वर्ष होतं.

या आत्मचरित्रात नेताजी सुभाषचंद्र बसु यांच्या सहवासातले काही क्षण लेखिकेने फार सुंदर चित्रित केले आहेत. त्यांच्याच शब्दात पुढे काही उतारे दिले आहेत. लेखिकेच्या घरी सुभाषचंद्रांचं जाणं-येणं होतं कारण लेखिकेचे वडील सुभाषचंद्रांचे शिक्षक होते.

"आमच्या घरात स्वातंत्र्यसंग्रामाची लाट अगदी पहिल्यांदा आली तेव्हा मी लहानच होते. १९२१ सालच्या चळवळीचे पडसाद आमच्या घरात उमटले

होते. आमचा एक भाऊ शिक्षण सोडून व सत्याग्रह करून जेलमध्ये गेला. घरात चरखा शिरला. बाबांनी विकत आणलेली एक चटईपेक्षाही जाडजूड खादीची लाल साडी नेसून मी फ्रॉकमधून साडीत शिरले. तेव्हापासूनच घरात जवळजवळ नेहमीच सुभाषबाबूंबद्दल चर्चा होत असे. सुभाषबाबूंनी आय. सी. एस. सोडून दिलं, सोडण्यापूर्वी बाबांना एक पत्र पाठवून त्यांचं मतही विचारलं, बाबांनी काय की उत्तरही दिलं वगैरे गोष्टी दीदीच्या तोंडी नेहमी ऐकू येत. सुभाष बाबांचे फार लाडके विद्यार्थी होते, आणि त्यांचेही बाबा फार लाडके शिक्षक होते. आईच्या पेटीत सुभाषबाबूंच्या हस्ताक्षरातलं बाबांना लिहिलेलं एक खूप भावनाप्रधान पत्र होतं, "आपल्याशी असलेला माझा संबंध कधीच तुटणार नाही. नाहीतर झोपेतही आपणच स्वप्नात कसे येता ? जागेपणीही आपल्याच मूर्तीचे ध्यान का करतो मी ?"

"१९२१ सालची चळवळ जरा मंदावल्यानंतर एका रात्री घरी येताच बाबा आईला म्हणाले - मिटिंगमध्ये सुभाषची भेट झाली. जेवायला बोलावलंय त्याला, लवकर स्वयंपाक तयार कर. यापूर्वी सुभाषबाबूंना कधी प्रत्यक्ष बघितल्याचं मला आठवत नव्हतं, त्यामुळे प्रथमच त्यांना पाहण्याच्या कल्पनेनं मी मनातल्या मनात खूप अधीर होऊन गेले होते. पण ते आल्यानंतर मात्र मी जी खोलीत दडी मारून बसले ती बोलावूनही बाहेर येईना. शेवटी खूपच हाकाटी झाल्यावर कशीबशी गेले. आईनं हातानं जवळ ओढत म्हटलं - माझी ही धाकटी मुलगी तुझी खूपच चाहती आहे बरं का सुभाष. त्यानंतर काही दिवसांनीच बंगाल ऑर्डिनन्सनं सुभाषबाबूंना अटक केली. तेव्हा मी शाळेत होते, मैत्रिणींशी नेहमीच या विषयावर चर्चा होत. सुभाषबाबू माझ्या बाबांचे विद्यार्थी, त्यामुळे या गप्पांमध्ये माझंच वर्चस्व असायचं. बाबांकडून ऐकलेल्या गोष्टी मी खूप रंगवून रंगवून मैत्रिणींना सांगत असे. आणि शेवटी म्हणत असे - आम्हीपण असेच होणार."

* * *

वीणा दास यांच्या 'शृंखल-झंकार'मध्ये सुभाषचंद्रांशी असलेला लहानपणचा हा संबंध हळूहळू अधिकाधिक विकसित होत गेलेला दिसतो. त्यात काहीसे विभूतिपूजक असले तरी त्याबरोबरच मोकळी प्रश्नोत्तरेही आहेत. आणि या प्रश्नोत्तरांमधून सुभाषबाबूंच्या व्यक्तित्वाचे काही फार महत्वाचे पैलू प्रकाशित झाले आहेत. हा एक प्रसंग पहा -

"याच सुमारास सुभाषबाबू सुटून आले होते. १९२८ साली सायमन कमिशन बायकॉट करण्याची धूम सुरू होती. आम्ही मैत्रिणी बेथ्यून कॉलेजमध्ये हरताळ करण्याचा प्रयत्न करू लागलो. वर्गावर्गात जाऊन मुलींना सांगणं, बोर्डवर लिहिणं वगैरे सुरू झालं. हरताळ खूप यशस्वी झाला. गव्हर्नमेंटच्या शाळा-कॉलेजातला हाच पहिला हरताळ. प्रिन्सिपॉल डे-स्कॉलर्सना काही बोलल्या नाहीत पण बोर्डिंगमध्ये राहणाऱ्या मुलींना म्हणाल्या की अॅपॉलॉजी द्या नाहीतर बोर्डिंग सोडून जा. काही मुली निघूनही गेल्या, पण ज्यांची घरं दूर होती त्या काय करणार? त्यांनी आम्हाला निरोप धाडला. कॉलेज बंद. काय करावं सुचेना, सतत निरनिराळ्या लोकांचा सल्ला घेणं व चर्चा सुरू होत्या.

आमची ही अवस्था बघून बाबांनी सुभाषबाबूंना बोलावणं पाठवलं. ते येताच आम्ही सर्वांनी त्यांना घेरून विचारलं - काय करावं?

आमची सगळी उत्तेजित अवस्था बघून किंचित मिस्किलपणे हसत ते म्हणाले - कॉलेजच सोडून द्या ना.

आम्ही म्हटलं - तुम्ही शिकवणार असाल तर आत्ता सोडायला तयार आहोत.

ते हसत म्हणाले - आम्ही जेलमध्ये जायचं की मास्तरकी करायची?

* * *

अशा तऱ्हेनं ही सोळा वर्षाची धिटुकली नेताजींचं कार्य, त्यांचे विचार, त्यांची मतं जाणून घेण्याचा प्रयत्न करू लागली. एकदा तर एक फारच महत्त्वाचा प्रश्न तिनं सुभाषबाबूंना विचारला, तो हिंसात्मक आणि अहिंसात्मक चळवळींबाबतचा. १९२८ साली कलकत्त्यात जे कॉंग्रेस अधिवेशन झालं त्यावेळची ही घटना.

"निखिल वंग छात्र प्रतिष्ठान"ची स्थापना झाली. हीच बहुतेक बंगालमधील विद्यार्थ्यांच्या संघबद्धतेची पहिली पायरी. माझ्या दीदीच्या व तिच्या मैत्रिणींच्या प्रयत्नांनी पुढे विद्यार्थिनींचीही संघटना तयार झाली आणि त्यायोगे विद्यार्थिनींनाही निरनिराळ्या कामांमध्ये भाग घेण्याची संधी मिळू लागली, पहिल्यांदाच.

अशावेळी सुभाषबाबू एकदिवस सहजच आमच्या घरी आले होते. बाजूच्या खोलीतून आईचा आवाज आला - अरे बापरे, आज आमचं भाग्यच उजळलं म्हणायचं.

त्या दिवशी सुभाषबाबूंनी आमच्याशी खूप गप्पा मारल्या. मी अचानक प्रश्न केला - बरं, एक सांगा ना, तुम्हाला काय वाटतं, आपला देश स्वतंत्र होईल तो हिंसेच्या मार्गानं की अहिंसेच्या ?

सुभाषबाबू जरा वेळ गप्प बसले. मग सावकाश म्हणाले - महत्त्वाचं हे आहे की एखादी गोष्ट मिळवायची म्हटलं की त्यासाठी ते वेड लागावं लागतं. स्वातंत्र्य मिळवण्याचं असं वेड संपूर्ण देशात पसरवायला हवं. मग हिंसे-अहिंसेचा प्रश्न इतका मोठा वाटणार नाही.

त्यांनी सरळ उत्तर देणं टाळलं हे तर खरंच, पण मला मात्र अजूनही या प्रश्नाचं इतकं चांगलं उत्तर कोणाकडून मिळालेलं नाही. काही दिवसानंतर डिसेंबर महिन्यात कलकत्त्याला भरणाऱ्या काँग्रेसमध्ये आम्ही सर्वांनी स्वयंसेविका म्हणून नावं नोंदवली. सुभाषबाबू आमचे जी. ओ. सी. आणि मुलींची जबाबदारी श्रीमती लतिका घोष यांच्याकडे होती. माझ्या दीदीच्या संघटनातील बऱ्याचजणी महत्त्वाच्या अधिकाराच्या पदावर होत्या.

पहाटे बस येऊन आम्हाला घेऊन जात असे. घरी परतायला कधीकधी रात्रीचे बारा वाजून जात. ट्रेनिंग मुख्यतः मुलांकडूनच मिळत असे. आता ही माझ्या मनाची कल्पनाच आहे की नाही कोणास ठाऊक पण आजपर्यंत गेली वीस वर्ष मी कितीतरी स्वयंसेवकांची पथकं पाहिली, अगदी नुकतीच नेताजींच्या जन्मदिनी स्वयंसेवक पथकांची विराट मिरवणूकही पाहिली, पण १९२८ साली या पथकांमध्ये जी शिस्त, नियमबद्धता, गांभीर्य आणि उत्साह दिसला होता तो पुन्हा कधीही पहायला मिळाला नाही. त्यावेळची माणसंच जणू वेगळी होती. प्रत्येक मुलाच्या नि मुलीच्या डोळ्यात विलक्षण चमक आणि दृढनिश्चय दिसत असे. अगदी प्रत्यक्ष युद्धदेखील लोक इतक्या निष्ठेनं करतात की नाहीत कोण जाणे! फक्त मधूनमधून आमच्या मनात क्षोभाचा डोंब उसळत असे की आम्हाला शस्त्रास्त्रं का देण्यात येत नाहीत. आपसात आम्ही नेहमी म्हणायचो की शस्त्रास्त्रं मिळाली असती तर किती छान झालं असतं! कल्पना करायचो की सुभाषबाबू आमचे जी. ओ. सी. आहेत आणि आमचं हे सैन्यदळ इंग्रजांशी खरीखुरी लढाई करायला निघालं आहे.

पुढे नेताजींच्या आझाद-हिंद-फौजेच्या रूपानं आमचं ते रोमँटिक स्वप्न साकारही झालं होतं पण त्यावेळी आम्ही कुठेही जवळपास नव्हतो.

त्यावेळचा आमचा हा उत्साह बघून काही नातेवाईक चेष्टा करून

म्हणतही की ढाल नाही, तलवार नाही अशा परिस्थितीत तुमचं हे युद्ध चालणार कसं गं? तुमचे 'नेपोलियन' तर घोड्यावरही बसत नाहीत. त्या दिवशी मिरवणुकीतही मोटारीत बसून का गेले सांगा बरं!

या चेष्टेचं यथायोग्य उत्तर तेव्हाच नाही पण पुढे मिळालं - चट्टग्रामच्या शस्त्रागाराची लूट करणाऱ्यांमधला प्रत्येक वीर आमच्या त्या १९२८ सालच्या काँग्रेसचा स्वयंसेवकच होता.

* * *

यानंतर इंग्रजांच्या अत्याचारांमुळे चिडलेली व भारताच्या स्वातंत्र्याच्या वेडानं पछाडलेली ही तेजस्वी किशोरी हळूहळू मोठी झाली आणि १९३२ साली ६ फेब्रुवारीला गच्च भरलेल्या कॉन्व्होकेशन हॉलमध्ये उभी राहून तिनं दीक्षांत समारंभाचे भाषण वाचत असलेल्या त्यावेळच्या बंगालच्या गव्हर्नरवर पिस्तुलानं गोळी झाडली. मग १९३९ सालपर्यंत निरनिराळ्या तुरुंगांमध्ये बंदिवास भोगला. बाहेर पडल्यानंतर १९४० साली देशातलं राजकारण आमूलाग्र बदलून गेलेलं दिसलं. स्वातंत्र्याची इच्छा बहुजन समाजापर्यंत पोहोचली होती, मोर्चे निघत होते, एका नवीन समाजव्यवस्थेचं चित्र समोर ठेवून क्रांतिकारी मनं कम्युनिस्ट विचारसरणीकडे आकृष्ट होत होती. पण याबरोबरच देशातल्या राजकारणातले ताणतणाव वाढले होते. १९३४ साली एका अधिवेशनात पंडित जवाहरलाल नेहरूंनी काँग्रेसच्या धोरणात समाजवादाला स्थान देण्याचा इशारा केला होता आणि त्यानंतर हळूहळू हा विचार रुजतही गेला होता. जन-संघटना तयार होत होत्या आणि काही आदर्शवादी मंडळींना आशाही वाटत होती की खरोखरच जर काँग्रेसमध्ये देशाची संपूर्ण जनशक्ती एकवटून आली तर आपला स्वातंत्र्य-संग्राम आणि समाजवाद स्थापनेचा संग्राम एकत्र येतील आणि या दोहोंमध्ये काळाचं काहीही व्यवधान राहणार नाही. 'शृंखल-झंकार'ची लेखिका वीणा दास अशाच आदर्शवादी मंडळींपैकी एक महिला. माणसावर, माणुसकीवर आणि कर्मनिष्ठेवर विश्वास ठेवणारी, नव्या सामाजिक परिवर्तनवादी कार्यक्षेत्रात बेधडकपणे सामील होणारी. तिचा अनुभव तिच्याच शब्दात -

"ही नवीन योजना समोर ठेवून जोरदार काम सुरू करण्याच्या मार्गात पहिली अडचण आली ती बंगालमधल्या काँग्रेसच्या आपसातल्या कलहाची. या कलहाची सुरुवात त्रिपुरी काँग्रेसपासून झाली. सुभाषचंद्रांचा काँग्रेसच्या कार्यकर्त्यांशी बऱ्याच बाबतीत मतभेद होता. परिणामी काँग्रेसतर्फे नियमभंगाच्या

आरोपावर सुभाषचंद्रांवर 'बॅन' आणण्यात आला. तेव्हा सुभाषचंद्रांनी 'फॉरवर्ड ब्लॉक'ची स्थापना केली. त्यामुळे हे द्वंद्व आणखीच जटिल होऊन गेलं. सुभाषचंद्र आणि त्यांचे अनुयायी यांनी 'बॅन' असूनही बंगालमधल्या काँग्रेस कमिट्यांवरचे अधिकार सोडले नाहीत. तेव्हा वर्किंग कमिटीने एक ॲड हॉक कमिटी स्थापन करून त्या कमिटीवर बंगालच्या काँग्रेस कमिट्यांमध्ये नव्याने निवडणूका करवण्याचा भार सोपवला.

तेव्हा बंगालपुढे प्रश्न उभा राहिला तो असा की अखिल-भारतीय काँग्रेसशी संबंधित जी बंगाल-काँग्रेस होती तिला पाठिंबा द्यायचा की, भारतापासून तुटलेल्या पण बंगालच्या लोकप्रिय नेत्याच्याच नेतृत्वाची जी काँग्रेस कमिटी आहे तिला पाठिंबा द्यायचा. आधीच सांगितलं आहे की खूप आशा व विश्वास ठेवून आम्ही काँग्रेसमध्ये भाग घेतला होता. त्यामुळे अखिल भारतापासून तुटलेल्या स्वतंत्र व प्रांतीय काँग्रेस कमिटीत राहून काम करण्यात आम्हाला काही अर्थच वाटत नव्हता. त्या नव्या पक्षाला काँग्रेस म्हणावे की नाही याबाबतही आमच्या मनात शंका होती. चूक-भूल, न्याय-अन्याय वगैरे विचार न करता ॲड हॉक कमिटीतर्फे निवडून आलेल्या काँग्रेसमध्ये राहण्यास आम्हाला हेच कारण पुरेसं वाटत होतं. अर्थात् या कारणास्तव आम्हाला खूप विरोध सहन करावा लागला, बंगालमध्ये राहून काँग्रेसचं काम करणं त्यावेळी सोपं नव्हतं.

वैयक्तिक कारणांमुळेही हे काम करणं मला आणखीनच कठीण गेलं. कारण आमच्या कुटुंबाचा सुभाषबाबूंशी अतिशय जवळचा व जिव्हाळ्याचा संबंध होता. असं असताना मी अशा रीतीनं त्यांच्या विरोधी पक्षात सामील होणं घरी कोणालाच आवडलं नाही. मला स्वतःलाही मधूनमधून खूप अपराधी वाटायचं. विशेषतः आमच्या पक्षात जेव्हा सुभाषबाबूंवर खूप कडक टीका होत असे तेव्हा. राजकारणात बहुतेक आपल्या धोरणांसाठी, विश्वासार्हतेसाठी इतकं कठोर व्हावंच लागत असेल. पण मला मात्र वाटायचं की इतकं कडकडून आक्रमण न केलं तर बिघडलं कुठे!

यानंतर काही दिवसांनी सुभाषबाबूंशी माझी शेवटची भेट झाली. तो १९४१ सालचा जानेवारी महिना होता. सुभाषबाबू आजारी होते आणि घरीच होते. एक दिवस त्यांनी भेटायला ये म्हणून निरोप पाठवला. मी जेलमधून सुटून आल्यावर त्यांच्याशी भेट झाली नव्हती. तरी माझ्या राजकारणातील हालचालींवर त्यांचं लक्ष असावं असं वाटतं. म्हणूनच एकदम असा हा निरोप

आल्यामुळे मी आश्चर्यचकितच झाले. त्यांच्या घरी जाऊन सरळ माडीवर गेले. ते पलंगावर पडले होते. दाढी वाढल्यामुळे असेल पण खूप रोडावलेले दिसत होते. शिवाय मी खूप दिवसानंतर बघत होते, पण एकंदरीत ओळखणं कठीणच गेलं खरं!

सुभाषबाबू मला बघून हसत म्हणाले - बरीच बारीक झालेली दिसतेस! आणि मग आता मी काय करणार, काय विचार सुरू आहेत वगैरे चांगलं तासभर बोलणं झालं. खूप वाद घातला. तेही त्यांच्या बाजूनं जे सांगायचं ते सांगतच होते.

पण काही निर्णय मात्र झाला नाही. सहज निर्णय होण्याची आशा तरी कुठे होती? आशा नव्हती खरी, पण कुठेतरी मनाच्या कोपऱ्यात इच्छा मात्र होती. अर्थात् माणसाच्या या इच्छेला काही आगापिछा किंवा सीमा नसतेच म्हणा! पण आता उठायला हवं. त्यांना दुसरी कामं असणार. सुभाषबाबू हसत म्हणाले - इतक्या दिवसानंतर भेटलीस, बरं वाटलं. मी म्हटलं - पण सारा वेळ तर तुमच्याशी भांडण करण्यातच निघून गेला.

यानंतर चारपाच दिवसांनीच वर्तमानपत्रात सुभाषचंद्र अचानक अंतर्धान पावल्याचं वाचलं. पुष्कळदा वाटतं त्या दिवशी त्यांनी काय मनात ठेवून मला बोलावणं पाठवलं होतं कोणास ठाऊक! त्यावेळी तर देश सोडून जाण्याची त्यांची सगळी जय्यत तयारी झालेलीच असणार! त्याबाबतच मला काही सांगायचं असेल का? मला काही कामात सहभागी करून घेऊ इच्छित असतील का? असे कितीतरी अनुत्तरित प्रश्न आज मनात गर्दी करतात. उत्तरं मिळणं शक्यच नाही. या विशाल विश्वाच्या अपरिचित अंधारात सगळी उत्तरं नेहमीकरताच मौन धारण करून बसली."

● ●

**************************

# निर्भय महापुरुषाच्या सहवासात

**कॅ. लक्ष्मी सहगल**

**************************

माझी नेताजींशी पहिली भेट १९२८ मध्ये झाली. त्यापूर्वी आम्ही नेताजींविषयी वाचत होतो. ऐकत होतो. मी मद्रासमध्ये शिकत होते. आमच्या विद्यालयीन आणि महाविद्यालयीन जीवनात आम्ही, भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या एका भारलेल्या कालखंडातून जात होतो. त्याकाळात, 'लढल्याशिवाय भारताला स्वातंत्र्य मिळणार नाही' हा नेताजींचा विचार आम्हाला प्रभावित करीत होता.

त्याकाळात गांधीजी हिंदुस्थानी जनतेत जागृती करीत होते. गांधीजींचे कार्य व्यापक होते. कॉंग्रेसची 'केवळ इंटलेक्चुअल'साठीची प्रतिमा गांधीजींनी बदलवली. खादी, सत्याग्रह, दांडी यात्रा इ. वेगवेगळे कार्यक्रम गांधीजींनी दिले. पण गांधीजी एका मर्यादेपर्यंत आंदोलन नेत. नंतर अनाकलनीय पद्धतीने मागे घेत. या भूमिकेला सुभाषबाबूंचा विरोध होता. साहजिकच माझ्या वयाची तरुण पिढी सुभाषबाबूंकडे अधिक आकर्षिली जाई.

माझे वैद्यकीय शिक्षण आटोपून १९४० च्या आसपास मी सिंगापूरला डॉक्टरी करीत होते. त्यावेळेस दुसरे महायुद्ध सुरू झाले होते. त्या युद्धाचा इंग्रजांचा एक पक्ष होता. पण माझ्या मनात इंग्रजांविषयी रोष होता. तो रोष वाढण्याचे आणखी एक कारण होते. मलेशियात रबराचे मळे होते. त्या रबरमळ्यांची मालकी इंग्रजांकडे होती. हे इंग्रज मळेवाले मजुरांचे शोषण करीत. त्यांना अत्यल्प मजुरी देत. मजुरांवर दडपशाही करीत. या दडपशाहीविरुद्ध मजुरांनी आंदोलन केले. त्या आंदोलनाची मी सक्रीय सहानुभूतीवार होती. इंग्रज साम्राज्यवाद्यांबरोबर संधी मिळेल तिथे संघर्ष करण्याची माझी मानसिकता वाढत होती.

१५ फेब्रुवारी १९४२ च्या आसपास मोहनसिंगासारखे काही सैनिकी अधिकारी, जे दुसऱ्या महायुद्धात ब्रिटिशांच्या बाजूने लढत होते, रासबिहारी बसूंच्या संपर्कात आले. रासबिहारी बसूंनी अशा काही अधिकाऱ्यांचे हृदय परिवर्तन केले. अशा काही अधिकाऱ्यांना नि सैनिकांना घेऊन 'इंडियन नॅशनल आर्मी' काढली. 'इंडियन नॅशनल आर्मी'ला साह्य करण्याचे तोंडी आश्वासन जपान्यांनी दिले. पण लेखी करार केला नाही. पुढे तो केवळ सुभाषबाबूंच्या मुत्सद्देगिरीमुळे केला. सुभाषबाबूंच्या त्यावेळच्या मुत्सद्देगिरीची मी एक दूरस्थ प्रेक्षक आहे.

जपानने लेखी करार करण्यापूर्वी आय. एन. ए. ची संख्या तीस हजार होती. जपानने आणि जर्मनीने, ब्रिटिशांच्या बाजूने, लढणाऱ्या पण बंदी केलेल्यांचीच बहुतांशी आय. एन. ए. होती. या लोकांसमोर तेव्हा दोन पर्याय होते. जपानचे युद्धकैदी म्हणून राह्यचे की स्वतंत्र फौज म्हणून लढायचे. युद्धकैदी राहाण्यास काहींना सुरक्षितता वाटत होती. कारण त्यात जीवाला धोका नव्हता. समजा युद्धात इंग्रजांचा जय झाला तर हे सर्व युद्धकैदी सुटणार होते. त्यांचे पुनर्वसन होणार होते. हे हेरून काही बड्या अधिकाऱ्यांसह, काही जणांनी स्वतंत्र फौजेत सामील व्हायला प्रथम नकार दिला. पण असे थोडे होते. बहुतांशी लोकांनी रासबिहारींच्या स्वतंत्र सेना योजनेला मान्यता दिली. शिवाय, पूर्व आशियात त्याकाळी तीन लाख भारतीय राहात असत. त्यात अर्थात मीही होतेच. आमची सगळ्यांची मानसिकता रासबिहारींच्या योजनेला संमती देण्याची होती. तशात, एक दिवशी रासबिहारींनी, त्यावेळेस बर्लिनमध्ये असणाऱ्या सुभाषबाबूंना या सेनेचे सेनानायकत्व स्वीकारण्यात आमंत्रित केले. सुभाषबाबूंनी ते स्वीकारले. सुभाषबाबू सिंगापूरला आले. त्यांच्याच नेतृत्वाखाली आझाद हिंद फौजेची स्थापना झाली.

सुभाषबाबूंकडे नेतृत्व आल्यावर सेनेला नि राष्ट्रकार्याला गती आली. सुभाषबाबूंनी सिंगापुरातल्या अभियंत्यांना आणि डॉक्टरांना सेनेत प्रवेशण्याचे आवाहन केले. त्या आवाहनानुसार मी देखील प्रथम डॉक्टर म्हणून आझाद हिंद फौजेत प्रवेश घेतला.

सुभाषबाबूंच्या सहवासात मला त्यांच्या लोकोत्तर गुणांचा प्रत्यय येत गेला. सुभाषबाबूंनी शत्रूचा शत्रू तो आपला मित्र या सूत्रांनुसार जपानचे साह्य घेतले. पण त्यांच्या ध्यानात हे पक्के होते की राजकारणात कोणी कायम मित्र नसतो.

राजकारणात कोणी कायम शत्रू नसतो. याच भूमिकेतून जपानप्रमाणेच सुभाषबाबूंची हिटलरशी मैत्री होती. पण यहुदींबाबत हिटलरचे धोरण चुकीचे होते हे ठणकावयाला सुभाषबाबू कचरले नाहीत.

सुभाषबाबूंच्या सहवासात आमच्या मनातील जातिवाद नि धर्मवाद पूर्णपणे नाहीसा झाला. आमच्या मनात एकच भावना निर्माण झाली. आम्ही सारे भारतीय आहोत. गुलाम आहोत. इंग्रजांचे गुलाम आहोत. ही गुलामगिरी आम्ही उखडून फेकली पाहिजे.

सुभाषबाबू म्हणायचे की माझ्या वाट्याला आलेली फौज ही काही उपजत क्रांतिकारकांची फौज नाही. कालपर्यंत ही फौज इंग्रजांची गुलाम होती म्हणून या फौजेच्या ठिकाणी प्रथम क्रांतिभावना, स्वातंत्र्यभावना रुजवली पाहिजे. त्यादृष्टीने त्यांना शिक्षण दिले पाहिजे. म्हणून त्यांनी १९ वर्षावरील देशभक्तांची एक अप्रत्यक्ष पण समांतर फौज निर्माण केली. या फौजेवर क्रांतिकार्याचे संस्कार केले. मी याच तरुण फौजेत होती.

हिंदुस्थानच्या पहिल्या स्वतंत्र सरकारची सुभाषबाबूंची कल्पना कोऑलिशन गव्हर्नमेंटची होती. योगायोगाने १९४६ मध्ये सुभाषबाबूंची ही अपेक्षा, काही काळासाठी पूर्ण झाली. सुभाषबाबू ब्रिटन आणि अमेरिका या दोघांच्याही विरुद्ध होते. काही लोक त्यांना विचारीत की, 'तुम्ही अमेरिकेच्या विरुद्ध का?'

सुभाषबाबू उत्तर देत की, "ब्रिटनची साम्राज्यशाही तर कदाचित लवकर नष्ट होईल. पण त्यानंतर अमेरिकेची साम्राज्यशाही सुरू होईल. तिचे स्वरूप थोडे वेगळे असेल. पण असेल ती साम्राज्यशाहीच. हे युद्ध अमेरिकेच्या भूमिकेवर लढले जात नाही यामुळेही भविष्यात अमेरिकेची आर्थिक साम्राज्यशाही विस्तारेल."

दुर्दैवाने सुभाषबाबूंचे हे भाकित खरे झाले.

नेताजींच्या सहवासात वावरताना मला हे नेहमी जाणवत असे की आपण एका शूर, निर्भय महापुरुषाच्या सहवासात आहोत. मलाच काय, प्रत्येकाला वाटायचे की नेताजी संकटकाळात आपल्या समवेत आहेत. ते प्रत्येकाची काळजी घेत. जवानांची घेत, अधिकाऱ्यांची घेत. ते जसे बोलत तसे वागत. त्यांचे रॉशन देखील जवानांसारखेच असायचे. वेगळे किंवा वरच्या श्रेणीचे नसायचे. आम्हा सैनिकांना ते सांगत शत्रूविषयी मनात तिरस्कार आणि प्रतिशोधाची भावना

नसेल तर लढताच येणार नाही. भारताच्या विभाजनाची लक्षणे त्यांनी ओळखली होती. या लक्षणांवर वेळीच उपचार करून फाळणीच्या मानसिकतेचा हा रोग वेळीच गाडून टाकला पाहिजे असे ते म्हणत.

नेताजींच्या घरगुती राहाणीवर भारतीय दर्शनाचा प्रभाव मी अनुभवला होता. त्या प्रभावामुळेच ते एवढे निश्चिंत आणि निर्भय वाटत.

असा दुसरा महापुरुष आढळणे कठीण.

(दूरदर्शनच्या राष्ट्रीय वाहिनीवरून दि. २३.१.९७ रोजी प्रसारित झालेल्या मुलाखतीच्या आधारे.)

● ●

**************************

# स्वातंत्र्यवीर सावरकर आणि नेताजी सुभाषचंद्र

**प्रा. ह. त्र्यं. देसाई**

**************************

स्वातंत्र्यवीर ही गौरवपूर्ण पदवी एकतर वीर सावरकर आणि दुसरे सुभाषचंद्र बोस ह्या दोघांनाच शोभते. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यलढ्यातील या दोघांचीही कामगिरी सुवर्णाक्षरांनीच लिहिली गेली आहे. देशभक्ती ही या दोघांच्याही रोमरोमात मुरली होती. दोघेही अभिजात देशभक्त होते. त्यामुळेच दोघांच्याही तेजस्वितेनं ब्रिटिशांची राजधानी दिपली होती. तिथे जाऊन सावरकर झाले बॅरिस्टर, तर सुभाषबाबू झाले आय. सी. एस. परंतु दोघांनीही पदवी गौण मानली आणि मातृभूमीच्याच सेवेचं व्रत घेतलं.

१९२१ मध्ये सावरकर अंदमानातून हिंदुस्थानात आणले गेले, तर १९२१ मध्येच, सुभाषबाबू ब्रिटिश सरकारची सनदी नोकरी ठोकरून देऊन स्वदेशात परतले. तेव्हा गांधीजी हे मुंबईतच होते. म्हणून सुभाषबाबू आधी त्यांना भेटायला गेले. पण देशोद्धाराच्या मार्गाबाबत त्यांना गांधीजींचा मार्ग पटेना. सुभाषबाबूंचा भर होता स्वातंत्र्यासाठीच्या सशस्त्र लढ्यावर, तर गांधीजींना हवा होता अहिंसक सत्याग्रह. म्हणून सुभाषबाबूंनी देशबंधू चित्तरंजनदास यांचाच मार्ग अनुसरायचं ठरवलं.

वीर सावरकर हे १९२४ ते ३७ रत्नागिरीत स्थानबद्ध होते, तर १९२५-२६ ही दोन वर्षं सुभाषबाबू हे लोकमान्यांच्या वास्तव्यानं पावन झालेल्या मंडालेच्या कारागृहात स्थानबद्ध होते. पुढे, मंडालेहून सुटल्यावर १९३३-३[illegible] मध्ये सुभाषबाबूंनी युरोपमधल्या सर्व राष्ट्रांना भेटी दिल्या आणि तिथल्या प्रमुख पुढाऱ्यांचे हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याविषयीचे विचार नीट समजून घेतले. तिथल्या सत्ताधीशांनी केलेली आपापल्या राष्ट्राची प्रगती आणि त्या प्रगतीची साधनं ह[illegible]

पण त्यांनी अभ्यासली. पुनः एकदा १९३५ मध्ये ते युरोपात गेले, अनेक राजकीय नेत्यांशी त्यांनी विचारविनिमय केला आणि ब्रिटिशांच्या साम्राज्यशाहीच्या विरुद्ध असलेलं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यलढ्याचं सत्य स्वरूप त्यांनी त्यांना समजवून दिलं.

पुढे १९३६ मध्ये, जर्मनीचा सर्वेसर्वा हिटलर यालाही सुभाषबाबू आवर्जून भेटले. तेव्हा जर्मनीची युद्धाची सिद्धता अगदी जोरात चालू होती. सुभाषबाबूंनी जर्मनीचे परराष्ट्र-मंत्री रिबेन्ट्रॉप यांना सरळसरळ विचारलं की, 'ब्रिटनशी तुम्ही युद्ध केव्हा सुरू करणार आहात?' 'इतक्यात नाही' रिबेन्ट्रॉप म्हणाले. 'ठीक आहे. तुमचं सहाय्य हिंदुस्थानला लाभलं, तर चांगलंच. नाहीतर आम्ही एकटे लढूच ब्रिटनशी, कारण आमचा तो अगदी पिढीजात शत्रू आहे' सुभाषबाबूंनी आपलं म्हणणं स्पष्ट केलं.

इकडे १९३७ मध्ये, स्वा. सावरकर हे हिंदुमहासभेचे अध्यक्ष निवडले गेले, तर १९३८ मध्ये सुभाषबाबू हे काँग्रेसचे अध्यक्ष झाले. म्हणजे क्रांतिकारक विचार असलेले अध्यक्षच आता दोन्ही संस्थांना लाभले. आता सावरकर नि सुभाषबाबू ह्या दोघांच्याही जीवनाचा नवा कालखंड सुरू झाला. स्वातंत्र्य-संपादनाचं मुख्य साधन सशस्त्र क्रांतीच हे या दोघांचंही अगदी ठाम मत होतं. एवढंच काय, पण स्वातंत्र्यलाभ झाल्यानंतरच्या राज्यकारभाराचाही सावरकर नि सुभाषबाबू या दोघांनीही आधीच दूरदृष्टीनं विचार करून ठेवला होता.

हिंदुस्थानाच्या हिंदू-संस्कृतीविषयी दोघांनाही आदर होता. लंडनमध्ये कुठेही हिंदी सांस्कृतिक कार्यक्रम असता तर त्यावेळी सर्व अभिनव भारताच्या सदस्यांनी शिरोभूषण भारतीयच वापरावे असं सावरकर सांगत. १९०८ च्या डिसेंबर १९ ला जेव्हा अभिनव-भारताच्या सदस्यांनी लंडनमध्ये शिखांचे गुरू गोविंदसिंह यांचा जयंत्युत्सव साजरा केला, तेव्हा सर्व सदस्य साफा बांधूनच आले होते हे श्री. सोनपाटकी यांच्या 'दर्याकर' पुस्तकातल्या क्रमांक ५ च्या प्रकाशचित्रादरून कळू शकते.

श्री. जोग एन. जी. यांनी आपल्या 'इन फ्रीडम्स बेस्ट' पुस्तकात पृ. ११३ वर म्हटलंय की, सुभाषबाबू युरोपात जिथे जिथे जात तिथल्या जनतेला 'हिंदुस्थानचा वारसा' व्याख्यान देऊन समजावून सांगत आणि त्या सर्व ठिकाणी सांस्कृतिक कार्यक्रमांना तर, ते स्वतः कटाक्षाने भारतीय वेषातच जात, इतकंच नव्हे तर, तिथल्या भारतीय देशबांधवांनाही तसेच करायला लावीत.

युरोपमध्ये असताना, सुभाषबाबूंनी १९३४ मध्ये 'हिंदुस्थानचा लढा' (The Indian Struggle) हे पुस्तक लिहिलं. वीर सावरकरांनी ते वाचलं होतं आणि १८५७ चं 'स्वातंत्र्य-समर' हे सावरकराचं गाजलेलं नि सरकारने जप्त केलेलं पुस्तक सुभाषबाबूंना अतिशय आवडलं होतं. इतकंच काय, सुभाषबाबूंनी ते मुद्दाम छापवून घेतलं होतं, अन् त्यांच्या 'आझाद हिंद फौजेत' तर ते पाठ्य-पुस्तकासारखंच वापरलं जात होतं.

दुसरं, १९३८ मध्ये जेव्हा सुभाषबाबू काँग्रेसचे अध्यक्ष होते, तेव्हा एकदा ते गुप्तपणे वीर सावरकरांना जाऊन भेटलेही होते. त्यामुळे दोघांनाही एकमेकांच्या विचारांचा तसा परिचय होताच. तेव्हा भेट झाली होती, पण योग्य वेळ आली नव्हती.

१९३७ पासून सतत ६ वर्षे वीर सावरकरच अ. भा. हिंदू महासभेचे अध्यक्ष म्हणून निवडले जात. तसंच सुभाषबाबूही १९३९ मध्ये, म. गांधींचा तीव्र विरोध असूनही, काँग्रेसचे दुसऱ्यांदा अध्यक्ष निवडले गेले. पण तेव्हा 'गांधी बोले, काँग्रेस चाले' अशी स्थिती होती. ओघानंच, सुभाषबाबूंना निष्ठावंत काँग्रेस अनुयायांकडून प्रत्येक बाबतीत विरोध होई. म्हणून अवघ्या दीड महिन्यानं, सुभाषबाबूंनी काँग्रेसच्या अध्यक्षपदाचं त्यागपत्र दिलं, अन् झालं ते चांगलंच झालं. जर हट्टानं ते काँग्रेसमध्येच राहते, तर 'स्वातंत्र्य' १९४७ मध्ये मिळालं ते बहुधा मिळतं ना!

सुभाषबाबूंनी वेळ न घालवता काँग्रेसच्याच अंतर्गत, आपला 'पुरोगामी गट' (फॉर्वर्ड ब्लॉक) हा नवा पक्ष काढला, अन् तेच त्याचे अध्यक्षही निवडले गेले.

तिकडे युरोपात, सप्टेंबर १९३९ मध्ये, महायुद्ध भडकलं. 'शत्रूची जी आपत्ती तीच आपली सुसंधी' हे लोकमान्य टिळकांचं तत्त्व सावरकर नि सुभाषबाबू या दोघांनाही मान्य होतं. तेव्हा, स्वदेशात त्याच वेळी जोरदार उठाव करून स्वातंत्र्याची चळवळ चेतवली पाहिजे असं दोघांनाही तीव्रपणे वाटत होतं. उलट, इंग्लंड आपत्तीत असता स्वराज्यासाठी आपण आंदोलन करणं योग्य नाही असं गांधीजींचं मत होतं (पहा कीर : महात्मा गांधी, पृ. ६७०) आणि पं. नेहरूही गांधीजींचीच भूमिका घेत होते. म्हणून तर महात्माजी नेहरू हेच माझे राजकीय वारसदार असं प्रकटपणे म्हणत असत.

सुभाषबाबूंच्या पुरोगामी गटाचं अधिवेशन जून १९४० मध्ये नागपूरला

होतं, म्हणून ते तिकडे गेले होते. रा. स्व. संघाचे आद्य सरसंचालक यांच्याशी त्यांचा परिचयही होताच. कारण डॉ. हेडगेवार हे मध्यप्रांत काँग्रेसचे सदस्य म्हणून १९२८ मध्ये, कलकत्त्यास काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाला गेले असता, सुभाषबाबूंशी त्यांची भेट झाली आणि देशाच्या तत्कालीन परिस्थितीवर दोघांमध्ये विचारविनिमयही झाला होता. तेव्हा, वीर सावरकरांचे थोरले बंधू बाबाराव हेही तिथे होतेच. सुभाषबाबूंसारखा निष्ठावंत नि कर्तबगार देशभक्त हिंदू-मुसलमान ऐक्याच्या भुलाऊ भोवऱ्यातून बाहेर पडू शकत नाही याचं डॉ. हेडगेवारांना सखेद आश्चर्य वाटे (ना. ह. पालकर : डॉ. हेडगेवार पृ. १९७). दि. २० जून ४० ला सुभाषबाबू हे डॉ. हेडगेवारांना भेटायला गेले. पण त्यांची भेट व्हायचा योग नव्हता. डॉक्टर मृत्यूशय्येवर होते. त्यामुळे दोघांचं बोलणं होऊच शकलं नाही. यावेळी सुभाषबाबूंना डॉक्टर हेडगेवारांचं सहकार्य हवं होतं पण तो योग नव्हता.

नागपूरच्या पुरोगामी गटाच्या अधिवेशनात असं ठरलं होतं की, 'युरोपीय युद्धाच्या सद्यस्थितीत हिंदुस्थानला लौकरात लौकर स्वातंत्र्य कसं मिळेल हेच आपण पाहिलं पाहिजे. म्हणून हिंदी जनतेला स्वदेशाचं हंगामी सरकार स्थापू द्यावं नि ब्रिटननं आपली इथली सत्ता त्याच्या हाती सोपवून निघून जावं, अशी आपण जोरदार नि एकमुखी मागणी केली पाहिजे.' या ठरावाप्रमाणं, मुस्लिम लीगची त्याला संमती मिळवायला सुभाषबाबू नागपूरहून मुंबईस गेले.

बॅ. जिना हे तेव्हा मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते, तर बॅ. सावरकर हे होते हिंदुमहासभेचे अध्यक्ष, सावरकर नि सुभाषबाबू यांच्या अनुभवात, ज्ञानात नि ओघानंच विचारातही एक मोठा भेद होता. वीर सावरकरांचं मत होतं की, हिंदू-मुसलमान एकीवाचूनही, हिंदू हे एकटेही स्वराज्य मिळवू शकतील. पण त्यांचं हे मत अजून सुभाषबाबूंच्या गळी उतरत नव्हतं. सावरकरांना मात्र तसा ठाम आत्मविश्वास होता आणि त्याला स्वानुभवाचा नि इतिहासाचाही आधार होता. एकाच वेळी पाच मुस्लिम शाह्या चालू असूनही, ज्यांनी हिंदवी स्वराज्य स्थापन केलं त्या शिवाजी महाराजांचाच त्यांच्यापुढे आदर्श होता. सुभाषबाबूही शिवाजीचाच आदर्श मानीत होते. ते तर वारंवार म्हणतही की, "हिंदुस्थानच्या इतिहासात शिवाजीराजांइतकं तेजस्वी चरित्र दुसऱ्या कुणाचंच नाही. शिवाजीचाच आदर्श समग्र हिंदुस्थानपुढे ठेवला गेला पाहिजे (विजयरत्न मुजुमदार यांचा लेख, 'भारतवर्ष' अंक जानेवारी १९३६).

बर्लिनचे जवाहिरे श्री. यशवंतराव नाईक हे नेताजींच्या 'आझाद हिंद फौजेत' स्वयंसैनिक होते. त्यांनी नेताजींची आठवण नागपूरच्या 'तरुण भारत' फेब्रु. १९७३ च्या अंकात दिली आहे. ते म्हणतात की, 'बर्लिनमध्ये नेताजी मराठीतही बोलत, तसंच शिवाजीमहाराजांचं अन् वीर सावरकरांचं चरित्र सांगत असत.' (भा. गं. देशपांडे : 'क्रांतिसूर्य सावरकर पृ. ३२४).

सुभाषबाबूंचा दुसराही एक ग्रह झालेला होता. वास्तविक, युद्धाची संधी हातची जाऊ नये यासाठीच वीर सावरकर हे सैनिकीकरणाचा धूमधडाक्यानं प्रचार करीत होते. पण त्याचा खरा आशय न समजल्यामुळेच, त्यांना 'रिक्रूटवीर' म्हटले जाई. या प्रचाराचा सुभाषबाबूंवर पगडा होता. मुसलमानांच्या विषयीचं काँग्रेसचं धोरण राष्ट्रघातक वाटल्यामुळेच सावरकर हे मिळेल ती संधी साधून 'राजकारणाचं हिंदूकरण करा' असं प्रचारीत असत. परंतु मुसलमानी मनोवृत्तीचा अभ्यास नि अनुभव स्वतःच्या अनुभूतीमुळे असल्यामुळे, सुभाषबाबू हे त्या बाबतीत सावरकरांवर टीका करीत असत. पण -

नियतीनंच ह्या दोघा सच्च्या देशभक्तांना आता एकत्र आणायचं ठरवलं. २२ जून १९४० ला नागपूरहून मुंबईस येताच, एकमुखी मागणीच्या विचारानं भारलेले सुभाषबाबू प्रथम गेले डॉ. आंबेडकरांकडे. त्यांच्याशी विचारविनिमय केल्यावर ते गेले बॅ. जिनांना भेटायला. पण, जिना पडले महाचाणाक्ष! ते सुभाषबाबूंना म्हणाले, 'सुभाषबाबू, जरा स्पष्ट बोलतो, माफ करा. तुम्ही हिंदू-मुस्लिम ऐक्याच्या तडजोडीची बोलणी करायला आला आहात खरे, पण ते कोणाच्या वतीनं?' 'अर्थात काँग्रेसच्या' हे सुभाषबाबूंचं उत्तर ऐकताच जिना ताडकन् म्हणाले, 'पण तुम्हाला तर काँग्रेसनं बहिष्कारलं आहे' 'पण मी फॉर्वर्ड ब्लॉकचा प्रमुख म्हणून तुमच्याशी बोलू शकतो.'

ह्या त्यांच्या उत्तरावर धूर्त जिनांनी पुन्हा विचारले, 'मी मुसलमानांचा पुढारी म्हणूनच जसे तुम्ही माझ्याकडे आलात तसेच जो हिंदुस्थानातल्या हिंदूंचा पुढारी किंवा निदान अधिकृत प्रतिनिधी तरी असेल, त्याच्याशी बोलण्यात काही अर्थ आहे. तुमचा तो फॉर्वर्ड ब्लॉक ही हिंदूसंस्था आहे का?' 'नसेना का' सुभाषबाबू म्हणाले, 'पण मी स्वतः एक हिंदू म्हणून तरी तुमच्याशी बोलू इच्छितो.' पण मुत्सद्दी असलेले जिना कुठले तेवढ्यानं बधायला. ते बाबूंना म्हणाले, 'मग असं करा, तुम्ही प्रथम सावरकरांना भेटून या. ते आहेत हिंदूंचे प्रमुख पुढारी. एक हिंदू व्यक्ती म्हणून तुमच्याशी बोलून काय उपयोग?

त्यापेक्षा, सावरकरांना घेऊन या. ते आले, तर मात्र आपण अवश्य चर्चा करू.'

म्हणून जिनांच्या घरून निघून, सुभाषबाबू तडक सावरकरसदनात आले. एकदम येणाऱ्याला, मग तो माणूस केवढाही मोठा असो, वीर सावरकर कधीच भेटत नसत. पण सुभाषबाबूंचं मात्र सावरकरांनी सहर्ष स्वागत केलं. ह्या अपूर्व भेटीचं वृत्त 'नवाकाळ' जून २३ च्या अंकातही होतं.

'हा मी आत्ता जिनांच्याकडून आलो.' असं सांगून आपण आज का नि कसे आलो ते सुभाषबाबूंनी सावरकरांना अगदी मोकळेपणानं सांगितलं. प्रथम, 'हिंदू-मुस्लिम ऐक्य' ह्या मुद्यावर दोघांत थोडी चर्चाही झाली. पण मग सावरकर मुख्य मुद्याकडे वळून त्यांना म्हणाले, 'सुभाषजी, इतर सर्व बाबी सध्या बाजूस ठेवा. आज ब्रिटन हे महायुद्धाच्या संकटात आहे ना? मग अशावेळी, तुमच्यासारख्या अग्रगण्य पुढाऱ्यानं, तो हॉलवेलचा पुतळा कलकत्त्यातून उखडण्याच्या बाबतीत का पुढाकार घ्यावा? समजा, उद्या ते स्मारक उखडलं गेलं तर त्याचा काय उपयोग? त्यापायी तुम्ही मात्र प्रदीर्घकाळ कारागृहात डांबले जाल!' त्यावर थोड्या निराशेनं सुभाषबाबू उद्‌गारले, 'पण काही ना काही करून, जनतेमध्ये ब्रिटिशांविरुद्ध क्षोभ चेतवायला नको का?'

'बाबूजी, तुमची तळमळ मी जाणतो. पण हा असला जनक्षोभ मात्र परिणामतः व्यर्थ आहे. कारण, ब्रिटिश राज्यकर्ते इथे नांदत असता, मेलेल्या दुष्ट ब्रिटिश अधिकाऱ्याचा निर्जीव पुतळा उखडूनही साधणार काय? अहो, शत्रू तर टपलेलाच आहे तुम्हाला अटक करायला. स्वतः बंदीत न पडता, शक्यतो शत्रूलाच बंदिगृहात डांबावं हे खरं राजकारण!'

'आणि हे पहा, बाबूजी! जरा स्पष्टच विचारतो. सशस्त्र क्रांतिकारकांशी तुमचा संबंध थोडा होताच ना? सक्रिय नसेना. तुम्ही गुप्तता पाळता ते योग्यच आहे. पण एक सांगतो, मी हिंदूसभेच्या आडून जे भारतभर सैनिकीकरण चालवलंय ना, ते क्रांतिकारक आंदोलनच आहे खरं म्हणजे. काँग्रेसमधील मवाळांना नव्हे, तर तुम्हालाही वाटत असतं की, सैनिकीकरणानं मी ब्रिटिशांना युद्धाला मनुष्यबळच पुरवतोय म्हणून. पण वस्तुस्थिती नीट समजून घ्या. तुमच्यात ती क्षमता आहे नि दूरदृष्टीही आहेच.

असं म्हणून सावरकरांनी, पहिल्या महायुद्धात सशस्त्र क्रांतिकारकांनी जर्मनीशी कसा संधी केला आणि ब्रिटिशांच्या हिंदी सैन्यातल्या, परंतु युद्धबंदी म्हणून जर्मनीच्या हाती पडलेल्या हिंदी सैनिकांतूनच क्रांतिसैन्य तेव्हा कसं

उभारलं गेलं इत्यादि माहिती सविस्तर सांगितली. परंतु पहिल्या महायुद्धात न घडलेली अशी एक आपल्याला अत्यंत अनुकूल घटना दुसऱ्या महायुद्धात घडण्याचा बराच संभव आहे. जर्मनी हिंदुस्थानापासून तसा बराच दूर, पण जपान आहे अगदी जवळ. आणि ह्या युद्धात आता जपानही लौकरच भाग घेईल असं तेव्हा जपानमध्ये असलेल्या रासबिहारी बोसांचं ताजं पत्र एप्रिलच्या सुमारासच सावरकरांना आलं होतं. 'थांबा ते पत्र दाखवतोच तुम्हाला' असं म्हणून ते पत्र दाखवून, ते वाचताना सुभाषबाबूंचा चेहरा सावरकर न्याहाळीत होते.

सावरकर नि रासबिहारी हे दोघेही सशस्त्र क्रांतिकारकच. त्यामुळे दुसरं महायुद्ध सुरू होताच, त्या दोघांच्याही हालचालींवर ब्रिटिश हेर पाळत ठेवून होते. म्हणून पूर्वीसारखं टपालातून पत्र पाठवायच्या ऐवजी, आता विश्वासू व्यक्तीच्या हस्तेच ते एकमेकांना पत्र पाठवीत. रासबिहारींची शेवटची दोन पत्रं दोघा बौद्ध भिक्षूंच्या हस्ते सावरकरांकडे आली होती. पहिल्या पत्रात त्यांनी सुचवलं होतं की, 'ह्या महायुद्धात मागच्याप्रमाणेच जर्मनी, इटली नि जपान यांच्याशी संधी करील, त्यांच्याच द्रव्य, शस्त्रास्त्रं नि सेनापतींच्या साह्यानं आपली हिंदी क्रांतिसेना उभारली जात आहे. तिकडे हिंदुस्थानातही सज्जता असावी.'

तेव्हा सावरकरांनी सुद्धा तोंडीच निरोप पाठवून विचारलं होतं की, 'या वेळेला जपान ब्रिटिशांविरुद्ध स्वतः युद्ध पुकारणार आहे का?' रासबिहारींच्या नंतरच्याच पत्रात त्याला उत्तर होतं की, 'चालू वर्षाच्या आतबाहेर जपान ब्रिटिशांविरुद्ध निश्चितच युद्ध पुकारील.'

ते रासबिहारींचं पत्र सुभाषबाबूंनी वाचलं. त्यांना स्पष्ट आठवलं की, हेच रासबिहारी २३ डिसेंबर १९१२ ला दिल्लीतल्या मिरवणुकीत लॉर्ड हार्डिंजवर बॉंब भिरकावून स्त्रीवेशात निसटले होते. पुढे ते जपानला गेले. तिथे 'ब्लॅक ड्रॅगन' या क्रांतिकारकांच्या संस्थेचे अध्यक्ष प्रा. टायमा यांच्या मध्यस्थीनं ऐझोसोमा यांच्या कन्येशी त्यांनी लग्न केल्यानं ते जपानात, जपानी-नागरिक म्हणून राहू लागले. जपानातले वरिष्ठ अधिकारी आणि सेनाधिकारी यांच्याशी त्यांचे संबंध चांगले होते. त्यांच्याविषयी आदरभाव होता. तेव्हा रासबिहारींनी जपानमध्ये हिंदुसभासुद्धा स्थापिली होती, अन् तिचे अध्यक्षही तेच होते, इत्यादि बऱ्याच गोष्टी त्यांना सावरकरांकडून नव्यानंच कळल्या.

रासबिहारींचं ते पत्र सुभाषबाबूंनी वाचल्यावर त्यांना सावरकर पुनः म्हणाले, "ह्या पत्रावरून जपान ह्या वर्षातच ब्रिटनशी युद्ध पुकारील असं दिसतंय. अन् तसं झालं, तर जर्मनी नि जपान यांच्या अद्ययावत् युद्धसाहित्यानिशी अन् लढाईच्या अनुभव घेतलेल्या सहस्त्र सैनिकांनिशी, तुम्ही इथल्या ब्रिटिश सत्तेवर, बाहेरून चढाई करायची ही सुवर्णसंधी साधू शकाल असं मला तरी वाटतं. करा विचार नि ठरवा.

"पूर्वी रासबिहारींच्यासारखे क्रांतिकारक जसे इथून ब्रिटिशांना हुलकावणी देऊन परदेशात निसटून गेले, तसं मला वाटतं तुम्हीही करू शकाल आणि मग तिकडे जर्मनी, इटली यांच्या हाती पडलेल्या सहस्त्र सैनिकांचं पुढारीपण पत्करून हिंदुस्थानचं संपूर्ण स्वातंत्र्य उद्घोषित करा, आणि जपान युद्धात उतरताच, ब्रह्मदेशातून, बंगालच्या उपसागरातून नाहीतर जमेल त्या मार्गानं, इथल्या ब्रिटिश सत्तेवर बाहेरून चढाई करा. जर असा काही सशस्त्र नि साहसी पराक्रम नाही केला तर हा आपला हिंदुस्थान स्वतंत्र होणं शक्य नाही.

"अन् खरं सांगू सुभाषबाबू? हे साहस करायला आज या देशात जी दोन-तीनच समर्थ माणसं दिसताहेत, त्यात तुम्ही एक आहात आणि त्यातही, माझा तुमच्यावरच डोळा आहे! पहा, विचार करा या सगळ्याचा." इतकं बोलून सावरकर थांबले.

पण सुभाषबाबू विचारमग्न झाले. त्यांनाही सशस्त्र क्रांतीवाचून जगात कुठलाही परतंत्र देश कधीच स्वतंत्र झाल्याचं इतिहासात आढळलं नव्हतं. पण जपानात हिंदी क्रांतिकारकांनी आधीच करून ठेवलेल्या सिद्धतेची तोवर त्यांना कल्पनाच नव्हती. आता सावरकर भेटीमुळे ती माहिती त्यांना मिळाली. महायुद्धाची अशी संधी पुनः पन्नास एक वर्ष तरी येणार नाही, आणि हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्य-लढ्याला ब्रिटिशांच्या शत्रुराष्ट्रांचं आपल्याला सहाय्य घ्यावंच लागेल ह्याची त्यांना पूर्ण जाणीव होती.

तर मग, आपणच हिंदुस्थानातून बाहेर का जाऊ नये? पूर्वी, अगदी बादशहाच्या कडक पहाऱ्यातून, शिवाजी महाराज गेले नव्हते का निसटून? तीव्र इच्छा असली की मार्ग सापडतोच! सुभाषबाबूंचं विचारचक्र चालू झालं. थोड्या वेळानं ते म्हणाले, "सावरकरजी, अच्छा तर मग मी आता आधी कलकत्त्याला जातो, तिथे काय घडतंय ते पाहातो, नि मग माझा पुढचा बेत ठरवीन. इकडे आलोच, तर अर्थात पुन्हा आपल्याला भेटेनच येऊन. नमस्ते! धन्यवाद!"

सुभाषबाबू कलकत्त्याला पोचण्याचाच अवकाश! तिथे त्यांनी ते स्मारक उखडण्यापूर्वीच आदल्या दिवशीच त्यांना अटक झाली नि मग कारावास, तिथे उपवास, नंतर सुटका नि घरीच स्थानबद्धता इतक्या घटना घडल्या. पण आपल्या घराभोवती कडेकोट पहारा असूनही सुभाषबाबू शिवाजीमहाराजांचेच अनुकरण करून १७ जानेवारी ४१ ला राहत्या घरातून पार निसटून काबूलला गेले.

इथेच आता एक गौप्यस्फोट करायला काही आडकाठी नाही, त्यांना घरून गुप्तपणे निसटून काबूलपर्यंत पोचायला रा. स्व. संघाच्या सर्वश्री भाऊराव देवरस, बापुराव मोघे, राजाभाऊ पातुरकर या ज्येष्ठ निष्ठावंत अशा देशभक्त स्वयंसेवकांचे फार बहुमोल सहाय्य झालं. पेशावरपर्यंत हे त्यांच्या बरोबरच गेले होते. बापुराव मोघे तर पठाणाच्याच वेशात, झियाउद्दीन बनलेल्या सुभाषबाबूंच्या डब्यात, समोरच्याच 'बर्थ'वर होते. (ही सर्व माहिती श्री. वसंतराव वैद्य यांनी नागपूरच्या 'तरुण भारत'मध्ये छापून गतवर्षीच प्रसिद्ध केली होती.)

असो. स्वातंत्र्यवीर सावरकरांची प्रेरक भेट, रासबिहारींची गुप्त पत्रे आणि सुभाषबाबूंचं असामान्य साहसी कर्तृत्व या त्रिवेणीसंगमानं हिंदुस्थानात १९४७ मधे स्वातंत्र्यरवी उगवला!

स्वा. सावरकरांच्या सैनिकीकरणाच्या आंदोलनामुळेच प्रामुख्यानं आपल्याला स्वातंत्र्य-सेनेसाठी सैनिकांचा पुरवठा होऊ शकला ही गोष्ट २५ जून १९४४ ला 'आझाद हिंद नभोवाणी' वरून केलेल्या आपल्या भाषणात नेताजी सुभाषबाबूंनी मान्य केली होतीच.

● ●

(धर्मभास्कर वर्षारंभ विशेषांक १९९७ च्या सौजन्याने)

*************************

# बंगाली साहित्यातील सुभाष दर्शन

**श्री. विवेक गुहा / श्री. चंचल भट्टाचार्य**

*************************

हे महान वीर, हे चिर सैनिक
तुमी चिर निर्भिक।

नेताजी सुभाषचंद्र बोस! बंगाल प्रांतातील एक अविस्मरणीय नाव की जे भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाच्या संदर्भात वारंवार घेतले जात असे! "तुम मुझे खून दो, मैं तुम्हे आझादी दूंगा" या त्यांच्या प्रसिद्ध घोषणेमुळे लाखो लोकांना स्वातंत्र्य संग्रामात भाग घेण्याची स्फूर्ती मिळाली. नेताजींच्या नेतृत्वाखाली आझाद हिंद सेनेने बलाढ्य ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध स्वातंत्र्य लढा पुकारला होता. त्या सेनेच्या 'कदम कदम बढाये जा, खुशीके गीत गाये जा' या गीतामुळे असंख्य तरुणांना देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढण्याची प्रेरणा मिळाली. नेताजी सुभाषचंद्रांच्या जीवनाचे मुख्य उद्दिष्ट होते - सतत पुढे जाणे! म्हणूनच ते म्हणत असत की, "आपणास आवडो अगर न आवडो, वर्तमान युग हे औद्योगिकरणाचे युग आहे. जे नवे, नूतन आहे, सरस आहे आणि ज्याचा कोणीही स्वाद घेतलेला नाही त्याचे आम्ही उपासक आहोत."

सुभाषचंद्र बोस हे सर्वसामान्यांचे नेताजी, पुढारी होते. अशा महान चारित्र्याची व कर्तृत्वाची माणसे किती असतात? फारच थोडी! म्हणूनच सुभाषबाबूंचे जीवन आणि कार्य यावर बंगाली भाषेत विपुल लिखाण झालेले आहे. हे साहित्य नेताजींच्या अविस्मरणीय चरित्रावर आणि कार्याच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकते. त्यावरून सुभाषबाबूंनी देशाकरिता केलेल्या प्रचंड कार्याची व त्यागाची वाचकांना ओळख होते. बंगाली साहित्यातील 'सुभाष-दर्शन' वाचून स्वतः वाचकवर्ग गौरवान्वित होतो आणि नेताजींसमोर आदराने नतमस्तक होतो.

सुभाषचंद्र बोसांचे चतुरस्त्र व कर्तृत्वसंपन्न व्यक्तिमत्व आणि त्यांनी विविध क्षेत्रात केलेले मोलाचे कार्य यावर अनेक भाषांमध्ये लेखन आणि संशोधन झालेले आहे. त्यामुळे इंग्रजी, बंगाली व इतर भारतीय भाषांमध्ये अभ्यासपूर्ण ग्रंथ, लेख, कादंबऱ्या, काव्य, नाटके व इतर साहित्य आज उपलब्ध आहे. त्यात बंगाली भाषेतील साहित्याचा साहजिकच वरचा क्रमांक आहे.

बंगाली भाषेत सुभाषबाबूंवर विविध प्रकारचे लेखन झालेले आहे आणि त्याद्वारे बंगाली साहित्य समृद्ध झाले आहे. आझाद हिंद सेनेची निर्मिती, उद्देष्टे, धोरणे, कार्य, स्वातंत्र्य संग्रामातील या सेनेचे योगदान इ. बाबत बरेच साहित्य उपलब्ध आहे. काही लेखकांनी सुभाष बोस 'नेताजी' का व कसे झाले यासंबंधी लिहिले आहे. सुभाषबाबू भूमिगत कसे झाले आणि त्यांनी परदेशात गुप्तपणे कसे पलायन केले यासंबंधीची रोमहर्षक माहिती बंगाली भाषेतील काही पुस्तकांमधून मिळते. तसेच सुभाषचंद्रांचे धाडसी पलायन व नंतरचे ऐतिहासिक कार्य या विषयावर अनेक कविता लिहिण्यात आल्या आणि त्या सामान्य जनतेमध्ये खूप लोकप्रिय झाल्या.

देशाच्या स्वातंत्र्यासंबंधीचे नेताजींचे विचार, स्वप्ने आणि धोरणे यावरही बरेच साहित्य प्रकाशित झालेले आहे. काही लेखकांनी त्यांच्या विद्यार्थी जीवनावर प्रकाश टाकणारी पुस्तके लिहिली आहेत. तर काहींनी त्यांच्या सहधर्मचारिणीवर लिहिले आहे. भारताच्या स्वातंत्र्यलढ्यात भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने केलेले कार्य आणि त्यातील नेताजींचे योगदान या विषयावर बंगाली भाषेत बरेच लिखाण झालेले आहे. काही मान्यवर लेखकांनी आपल्या पुस्तकांद्वारे सुभाषबाबूंच्या अष्टपैलू व्यक्तिमत्वावर प्रकाश टाकला आहे.

सुप्रसिद्ध बंगाली कवी व साहित्यिक श्री. रवींद्रनाथ टागोर हे सुभाषचंद्र बोस आणि स्वामी विवेकानंद यांना 'कर्मयोगी' म्हणत असत. टागोरांनी सुभाष-बाबूंबद्दल एका ठिकाणी असा उल्लेख केलेला आहे की, " आपण जेव्हा राष्ट्रीय साधनेचा कार्यारंभ केलात तेव्हा आपणास आम्ही दुरून ऐकत-पाहात होतो. आज आपण ज्या तेजाने तळपत आहात त्यामुळे आपल्याबद्दल असलेला संशय व शंका दूर झाल्यात. आपल्या विचार व कार्यामुळे आज आपण स्पष्ट दिसत आहात. आपल्या शक्तीची व कर्तृत्वाची पूर्ण परीक्षा झाली आहे. आपला तुरुंगवास, गुप्तपणे केलेले परदेशागमन, आपले जीवावरचे दुखणे यांपैकी कोणतीही अडचण आपणास आपल्या अंगीकृत कार्यापासून रोखू शकली नाही. त्यामुळे

आपली दृष्टी व हृदय यांना विशालता लाभली. दुःख व अडचणींचे जणू सुयोग व सुसंधींमध्ये रूपांतरण झाले. कोणत्याही पराभवामुळे आपण खचला नाहीत."

"देशनायक सुभाषचंद्र" या मथळ्याच्या ग्रंथात बंगाली भाषेचे सुप्रसिद्ध लेखक श्री. निमाईसाधन बसु यांनी लिहिले आहे की, "भारताच्या स्वातंत्र्य-संग्रामाच्या इतिहासात सुभाषचंद्रांच्या जीवन-चरित्राला एक महत्वपूर्ण स्थान लाभले आहे. ते चरित्र जणू ऐतिहासिक आख्यायिकेसारखे आहे. परंतु ते सत्य घटना आणि वास्तवावर आधारित आहे. त्यामुळेच सुभाषचंद्र बोसांना देशाच्या इतिहासात आणि जनमानसात एक उज्ज्वल व प्रतिष्ठित व्यक्तिमत्त्व म्हणून मान्यता मिळाली. तरीपण, देशाच्या स्वातंत्र्यलढ्यातील त्यांची भूमिका व योगदान आजही तुलनात्मकरीत्या लोकांना परिचित नाही. जोपर्यंत त्यासंबंधी अभ्यास होऊन पूर्ण माहिती लोकांना उपलब्ध होत नाही तोपर्यंत त्यांच्या कार्याचा सार्थ परिचय होणार नाही. १९४१ पूर्वीचे सुभाषबाबू आणि त्यानंतरचे नेताजी सुभाषचंद्र बोस यांचे व्यक्तिमत्व व कार्य तेवढेच तेजस्वी आणि मोलाचे आहे. सुभाषचंद्र बोस आणि नेताजी सुभाषचंद्र बोस हे एकाच महान जीवन-नाट्याचे जणू दोन अंकच आहेत. आपला प्रचंड कार्यव्याप सांभाळून सुभाषचंद्रांनी 'An Indian Pilgrim' (भारत पथिक) नावाचे आत्मचरित्र इ. स. १९३७ साली ऑस्ट्रियातील बायगास्टाईन हेल्थ रिसॉर्टमध्ये लिहिले. पण ते पूर्ण होऊ शकले नाही. त्यांनी केवळ दहा दिवसात नऊ प्रकरणे लिहिलीत. परंतु जे लिहिले ते अमूल्य आहे. प्रस्तुत आत्मचरित्र काळजीपूर्वक वाचल्यानंतर सुभाषचंद्र 'नेताजी' का व कसे बनले त्याचे आकलन होते. त्यांचा ठाम विश्वास होता की माणसावर लहानपणी जे संस्कार होतात त्यांचा प्रभाव मोठेपणी बरेच दिवसपर्यंत कायम राहतो. लहानपणी जे चांगले-वाईट संस्कार झाले असतील त्यांचा परिणाम संबंधित व्यक्तीच्या पुढील जीवनावर होतो. नेताजींच्या जीवनाच्या बाबतीत ही गोष्ट पूर्णतः सत्य असल्याचे आढळून येते."

सुभाषबाबू जे बोलत तसेच वागत! त्यांचे बोलणे आणि वागणे यात फरक नव्हता. म्हणूनच ते भारतीय जनतेचा विश्वास संपादन करू शकले. सुप्रसिद्ध लेखक श्री. अमलेश त्रिपाठी यांनी आपल्या "स्वाधिनता संग्राम में भारतीय राष्ट्रीय काँग्रेस" या पुस्तकात असा उल्लेख केला आहे की - "भारतीयांना सुभाषचंद्र बोसांबद्दल पूर्ण विश्वास होता. कारण Thou are not purchasable and placed Indian interest ahead of everything else."

आजची युवा पिढी द्विधा मनःस्थितीत आहे. आपण काय करावे याबाबत युवकांचा निश्चय होत नाही. त्यामुळे युवा-वर्ग लवकर निराश होतो. सर्वच काळात अशा प्रकारचे वातावरण राहिलेले आहे. हताश झालेल्या युवकांना अंधारातून प्रकाशाच्या मार्गावर आणण्याचे मोलाचे कार्य सुभाषबाबूंनी केलेले आहे. युवक चळवळीचे उद्दिष्ट काय असावे यासंबंधी त्यांनी "समग्र रचनावली" (तिसरा खंड) या आपल्या ग्रंथात लिहिले आहे की - "युवा चळवळीचे पुढील पाच पैलू आहेत -

(१) राजकीय, (२) सामाजिक, (३) आर्थिक, (४) शारीरिक आणि (५) शैक्षणिक.

उपरोक्त पाच पैलूंची बंधने तोडून नवनिर्माण करणे हे माझ्या युवा-चळवळीचे प्रमुख उद्दिष्ट आहे. त्यानुसार जुने दोष नाहीसे करून युवा-चळवळीत काळानुरूप नावीन्य आणणे आणि रचनात्मक कार्याला चालना देणे आवश्यक आहे. विनाश आणि नवनिर्मिती ह्या क्रिया निसर्गात ज्याप्रमाणे बरोबरच होतात त्याप्रमाणे युवक चळवळीत एका बाजूने अनावश्यक गोष्टींचा नाश करणे आणि दुसऱ्या बाजूने काळानुरूप नवनिर्मिती करणे अगत्याचे आहे."

१९२१ च्या डिसेंबर महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात देशबंधु चित्तरंजन दास आणि इतर पुढाऱ्यांबरोबर सुभाषचंद्र बोस यांनाही ब्रिटिश सरकारने अटक केली. सुभाषबाबू सुमारे आठ महिने श्री. चित्तरंजन दास यांच्यांबरोबर तुरुंगात होते. ते चित्तरंजन दासांची काळजी घेत असत आणि त्यांच्याकरिता स्वयंपाकही करीत असत. म्हणून काही लोक गंमतीने "चित्तरंजन दास यांना एक आय. सी. एस. कुक मिळाला" असे म्हणत असत.

सुप्रसिद्ध बंगाली कादंबरीकार शरश्चंद्र चॅटर्जी आणि सुभाषचंद्र बोस यांचे संबंध मधुर होते. शरश्चंद्रांच्या मनात सुभाषबाबूंबद्दल अतीव श्रद्धा होती. सुभाषबद्दल ते एके ठिकाणी लिहितात की, "तुम्ही आमच्यासारख्या सामान्य व्यक्ती नाही. देशासाठी तुम्ही सर्वस्वाचा त्याग केला. तुमच्यासारख्या असामान्य आणि मोठ्या माणसांना पैलतीराला घेऊन जाण्यास आमच्या देशातल्या छोट्या छोट्या नौकांच्या कुवतीबाहेरचे आहे. शेवटी तुमचे तुम्हालाच पैलतीराला जावे लागणार आहे. सर्वसामान्यांचा मार्ग हा मुळी तुमचा मार्ग नाहीच. हमरस्ते खुज्या माणसांसाठी असतात. क्रांतिकारक महापुरुषांना स्वतःचा मार्ग स्वतःच तयार करावा लागतो. तुमचा मार्ग दुर्गम आहे. तुम्हाला मोठमोठे पहाड आणि पर्वत

उल्लंघावे लागणार आहेत. याची मला जाणीव आहे. तुम्हाला देशासाठी वारंवार कारावासात जावे लागत आहे. तुमच्या बेड्या याच तुमच्यासाठी गौरवाच्या फुलांच्या माळा आहेत.

"तुमची उपेक्षा कोण करू शकणार? ब्रिटिश साम्राज्यशाहीने तुमच्या पहाऱ्यासाठी तैनात केलेले शेकडो सैनिक हा तर आम्हाला तुमचा सन्मान वाटतो. मोठमोठ्या संकटांचे ओझे केवळ तुम्हीच सहन करू शकता म्हणून परमेश्वराने तुमच्यावर या संपूर्ण देशाचेच ओझे टाकले आहे. हे मुक्तिपंथाच्या अग्रदूता, परतंत्र देशाच्या बंडखोर महापुरुषा! तुला कोटी कोटी प्रणाम" [सुभाषस्मृती (बंगाली) संपादक विश्वनाथ डे - प्रकाशक - निर्मलकुमार साहा - साहित्यम / १८ / बी / श्यामाचरण डे स्ट्रीट, कलकत्ता १२]

विख्यात बंगाली कादंबरीकार ताराशंकर बंद्योपाध्याय हे देखील सुभाषबाबूंच्या व्यक्तिगत सहवासाने प्रभावित झाले होते. ताराशंकर बंद्योपाध्याय यांचे स्वतःचे मुद्रणालय होते. ते स्वतः राष्ट्रीय विचारांचे होते. त्यामुळे त्याच्या स्वतःच्या गावात त्यांना त्रास सहन करावा लागला. अशा वेळी सुभाषबाबूंनी त्यांना सहानुभूती आणि मदत केली. त्यांनी आपली पहिली कादंबरी, 'चैताली धरणी' ही सुभाषबाबूंना अर्पण केली. त्यांनी, 'आमार जीवने सुभाषचंद्र' (माझ्या आयुष्यात सुभाषबाबू) या पुस्तकात एका ठिकाणी लिहिले आहे की, "दुपारी तीनच्या सुमारास बोलपूर स्थानकावर जाण्याऱ्या येणाऱ्या गाड्यांचे एकाच वेळी आगमन होते. लाभपूरला माझ्या घरी जाण्यासाठी मी रेल्वेगाडीच्या प्रतीक्षेत होतो. मी स्थानकावर उभा होतो. तेवढ्यात मी पाहिले की एक कार रेल्वेस्थानकापाशी येऊन थांबली. त्या गाडीतून एक व्यक्ती उतरली. तीच सुभाष. खरोखर, सुभाष म्हणजे दैदिप्यमान तारुण्याची जिवंत मूर्ती. जणू काय त्याच्या आकृतीतून सर्वत्र तेजःशलाका बाहेर फेकल्या जात होत्या इतके तेजस्वी वलय त्यांच्या व्यक्तिमत्वात होते. सुभाषबाबू चालतचालत दुसऱ्या प्लॅटफॉर्मवर गेले. मला त्यांना भेटण्याची तीव्र इच्छा झाली. परंतु मनात शंका होती की ते मला ओळखतील की नाही? तेवढ्यात माझ्या लक्षात आले की सुभाषबाबू एकटक माझ्याचकडे पहात होते. माझ्या लक्षात आले की त्यांनी मला ओळखले. बहुधा त्यांच्या मनात आठवणींचे मंथन होऊन त्यांना माझी ओळख पटली असावी. मी भारावून गेलो. हजारो माणसात जे सतत वावरायचे, सगळ्या देशाची चिंता ज्यांच्या मनात अखंड चालू आहे, भूतकाळापासून तर भविष्यकाळापर्यंत ज्यांच्या

विशाल दृष्टीचा पल्ला आहे, ज्यांच्या स्वप्नात सुद्धा सदैव महान स्वतंत्र भारत साकार होत असतो, अशा व्यक्तीने माझ्यासारख्या अतिसाधारण चेहऱ्याच्या व्यक्तीला ओळखावे? ते सुद्धा केव्हातरी पंधरावीस मिनिटांच्या झालेल्या भेटीच्या आधारावर? हे शक्य आहे का? हो! आहे! प्रतिभासंपन्न महामानवाच्या संदर्भात हे शक्य आहे. यापूर्वी हे सामर्थ्य मी रवींद्रनाथांच्या ठिकाणी पाहिले. मग मी जास्त उशीर केला नाही. सुभाषबाबूंपाशी गेलो. त्यांना प्रणाम केला. त्यांच्याजवळ उभा राहिलो.'' (कित्ता पृ. २७-२८)

विख्यात लेखक, संगीतकार दिलीपकुमार रॉय हे सुभाषबाबूंचे मित्र होते. त्यांच्या साहित्याचे सुभाषबाबू चाहते होते. वेगवेगळ्या साहित्यिक आणि कलाविषयक मुद्द्यांवर त्यांचा परस्परांशी विचारविनिमय व्हायचा. दिलीपकुमार रॉय यांचे, 'आमार बंधू सुभाष - माझा मित्र सुभाष' हे पुस्तक अतिशय गाजले. या पुस्तकात एके ठिकाणी ते लिहितात, ''सुभाषचा स्वभाव अतिशय कोमल होता. त्यांच्या या मृदु स्वभावाचा गैरफायदा अनेक जण घेत. अनेक खोटी माणसे त्यांची अजीजी करत त्यांचा आधार घेत. त्यातील काहीजण तर पोलिसांचे खबरेही होते. वेळप्रसंगी त्यांनी सुभाषबाबूंना पकडवूनही दिले. हे सगळं माहीत असूनही, या सगळ्यांची प्रचिती येऊनही सुभाषबाबू अशा लोकांनासुद्धा त्यांच्या अडचणीच्या काळात मदत करीत. अर्थात, खरोखर गरजू असणाऱ्या असंख्य माणसांना सुभाषबाबूंनी वारंवार मदत केलीच. जे अनेक राजबंदी होते त्यांनी आपणहून सुभाषबाबूंना मदत मागितली नाही. तरीही सुभाषबाबूंनी आपणहूनच त्यांच्या कुटुंबियांना सर्वतोपरी मदत केली. या कामासाठी अनेकदा मी सुभाषच्या सूचनेनुसार संगीताचे कार्यक्रम आयोजित केले. त्यामधून मिळालेला पैसा राजबंद्यांच्या कुटुंबियांच्या कल्याणासाठी खर्च केला. हे सगळं पाहून सुभाषबाबू गहिवरून जात. जणू काय मी त्यांनाच मदत केली आहे अशी भावना त्यांच्या मनात येई.'' (असा बंधू सुभाष, विश्ववाणी प्रकाशन, ७९/१/म. गांधी रोड, कलकत्ता)

बंगालीतील एक लेखक पवित्रकुमार घोष यांनी सुभाषबाबूंवर काही महत्त्वाची पुस्तके लिहिली. त्यांनी लिहिलेला, 'सुभाषचंद्र' हा ग्रंथ बंगालीतील चरित्रवाङ्मयातील भूषण आहे. तीन खंडात प्रसिद्ध झालेल्या या महाग्रंथात सुभाषबाबूंचे जीवन आणि स्वातंत्र्य आंदोलनातील त्यांचा सहभाग याची सविस्तर कहाणी आली आहे.

अलिकडेच पवित्रकुमार घोष यांनी 'नेताजी' नावाचा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. तथाकथित विमान अपघातात नेताजींचा मृत्यू झाला नसून ते दीर्घकाळ जिवंत होते असा दावा अनेक साक्षीपुराव्यांच्या आणि दस्तऐवजांच्या आधारावर या ग्रंथात करण्यात आला आहे. अलिकडेच नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या जन्मशताब्दीनिमित्त श्री. हितेन नाग यांचा 'अन्य नेताजी' हा एक उल्लेखनीय संकलन ग्रंथ प्रकाशित झाला आहे. या ग्रंथात 'पाब्लो नेरूदाच्या दृष्टिकोणातून सुभाषचंद्र' हा महत्त्वाचा लेख आहे. याशिवाय 'प्रशासक सुभाषचंद्र' हा लेखही महत्त्वाचा आहे.

जन्मशताब्दीनिमित्ताने बंगालीतील अनेक नियतकालिकांनीही विशेषांक काढून सुभाषबाबूंवर अनेक दृष्टिकोणातून अनेक प्रकारचे साहित्य लिहिले आहे. त्यात 'देश' आणि निखिल भारत वंग साहित्य संमेलनाचे मुखपत्र 'संमेलनी' विशेष उल्लेखनीय आहेत. बंगलाचे आजचे आघाडीचे साहित्यिक अमलेश त्रिपाठी, नीरदकुमार चौधरी, हुसेनूल रहेमान इ. नी आपल्या विविध लेखांतून सुभाषबाबूंचे आपापल्या परीने मूल्यमापन केले आहे. तर 'संमेलनी'मध्ये शैलेशकुमार बंदोपाध्याय, सुनीलरंजन सरकार, डॉ. अरुणकुमार दत्त इ. चे सुभाषबाबूंच्या व्यक्तिमत्वाच्या विविध पैलूंवर लेख आहेत.

सुभाषचंद्र बोस यांच्यावर बंगालीत अनेक काव्ये रचली आहेत. मोहितलाल मजुमदार यांचे 'जयतु नेताजी' आणि सावित्रीप्रसन्न चट्टोपाध्याय यांचे 'ज्वलंत तरवारी' ही काव्ये विशेष उल्लेखनीय आहेत. बंगालीतील प्रसिद्ध कवी रजनीकांत दास हे सुभाषवर लिहितात -

> तुमी कोथाय तुम्ही कोथाय तुमी कोथाय
> भारत नेताजी... तुमी कोथाय
> आज दुर्योग कारे नाई वीर
> बाहिदो, प्रबल, झंझावाय

म्हणजे कवी सुभाषबाबूंना जणू शोधतो आहे आणि बोलावतो आहे?

कवीला सुभाषची गरज का आहे? कारण -

हा देश भित्र्यांचा झाला आहे.

'बनफूल' हे प्रसिद्ध बंगाली कवी लिहितात -

> कोथावो जावोनी तुमी
> अमादेरी माझे आछो, हे बंधू महान

मोदेरी अंतर माझे, ओगो ज्योतीर्मय,
आछो तुमी, आछो तुमी, जानी
अंधःकार आकाशेते
ध्रुवनखत्रे अति चिरअनिर्वान
प्रथातेर आलोकेते
समज्वल शतसी व सुंदरेर बानी
तेमनी तुमी ओ आछो, हे सुभाष अमादेर प्राने
चिंतन भारतेर शाश्वत सत्येर माझत्वाने
सततार सिंघासने समासीन तनतजेश्वर
आलु तुमी थोरीया अंतर

आशय असा की सुभाषबाबू हे जणू अंधाराचा नाश करणारा ध्रुवतारा आहे. भारताच्या चिरंतन मूल्यांचे तुम्ही शाश्वत प्रतीक आहात.

स्वतः सुभाषबाबू हे एक उत्तम लेखक होते. जीवनाच्या विविध कालखंडात, विविध परिणिती आणि विविध देशात त्यांनी विविध विषयांवर अनेक लेख लिहिले आहेत. कुटुंबातील व्यक्ती, राजकारणातील, समाजकालातील अनेक व्यक्ती त्यांना वेळोवेळी पत्रे लिहिली. कलकत्त्याच्या नेताजी भवनातील नेताजी अनुसंधान केंद्राने सुभाषचंद्रांचे संपूर्ण लेखनसाहित्य आणि पत्रे प्रकाशित केली आहेत. मूळ पत्रे बंगाली आणि काही इंग्लिशमध्ये आहेत.

सुभाषबाबूंनी आपले आत्मचरित्र लिहिले. दुर्दैवाने ते अपूर्ण आहे. त्यात बालपणापासून इंग्लंडमधील त्यांच्या उच्च शिक्षणापर्यंतचा काळ आला आहे. केवळ त्यांचे स्वतःचे वैयक्तिक जीवन नव्हे तर हे आत्मकथन म्हणजे त्या काळातील बंगाली समाजाचे दर्शन आणि बंगालमधील नवजागरणाच्या काळाचे दर्शन आहे. सुभाषबाबूंना बंगाली साहित्यात रुची होती. ते साहित्यिकांच्या बैठकीत जात असत. शरच्चंद्र चॅटर्जी यांची 'पथेर दाबी' ही कादंबरी अतिशय आवडीची होती. या कादंबरीतील सव्यसाची या पात्राबद्दल सुभाषबाबू म्हणतात, 'या वैशिष्ट्यपूर्ण पात्रासारखी पात्रे बंगाली साहित्यिकांनी आपल्या कथा-कादंबऱ्यांतून आणावीत.' सुभाषबाबूंना बंगाली साहित्य तर मुखोद्गत होते. वेळप्रसंगी आपल्या भाषणात ते साहित्याचाच उपयोग करीत. रवींद्रनाथांनी आपले नाटक 'ताशेर देश' हे सुभाषबाबूंना अर्पण केले होते. अर्पणपत्रिकेत

रविबाबूंनी लिहिले, 'प्रिय सुभाष, आपल्या देशवासीयांच्या मनात नवा देशभक्तीचा प्राण ओतण्याचे तू जे पुण्य काम केले आहे त्याची आदरपूर्वक जाणीव ठेवून हे नाटक मी तुला अर्पण करीत आहे.''

बंगाली पत्रसाहित्याला सुभाषबाबूंचे पत्रसाहित्य म्हणजे एक सुंदर आणि मौलिक ठेवा आहे. त्यांच्या पत्रसाहित्याचे विषय विपुल होते. भाषा वैशिष्ट्यपूर्ण होती. कधी ते प्रमाण बंगालीत लिहीत वा कधी बोली बंगालीत लिहीत. विषयानुसार त्यांची भाषा वागत होती, वाकत होती. त्यातही आईला उद्देशून लिहिलेली त्यांची पत्रे ही त्यांच्या सर्व पत्रवाङ्मयातील श्रेष्ठ पत्रे आहेत. त्या ओळीओळीतून हिंदुधर्माविषयीची त्यांची श्रद्धा आणि त्यांची देशभक्ती याचा प्रत्यय येतो. याशिवाय आपली मधली वहिनी विभावरी बसू यांना त्यांनी लिहिलेली पत्रेही महत्त्वाची आहेत. कारण त्या पत्रातून उत्कट मनोविभावाचे दर्शन होते.

नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या बहुमुखी जीवनकार्याचा एक महत्त्वाचा पैलू बऱ्याच लोकांना अज्ञात आहे. तो म्हणजे त्यांचे साहित्यप्रेम! त्यांनी खूप लिखाण केले नाही. परंतु जे केले त्याची भाषा उत्तम असून त्यातील विचार सुस्पष्ट आहेत. आझाद हिंद सेनेतील सैनिकांना उपदेश करण्याच्या हेतूने त्यांनी हिंदुस्थानी-इंग्रजी भाषेत केलेली भाषणे महत्त्वाची आहेत. त्या भाषणांची शब्दरचना अतिशय जोशपूर्ण आणि काव्यात्मक आहे. म्हणूनच त्या भाषणांमुळे त्या काळी तरुण मने उत्तेजित झालीत.

नेताजी सुभाषचंद्र बोस यांचे बहुमुखी व्यक्तिमत्व आणि कार्य यावर बंगाली भाषेत असंख्य ग्रंथ, पुस्तके, लेख, काव्य, नाटके इ. साहित्य लिहिण्यात आले. परंतु नेताजींची जी बहुमुखी व विशाल प्रतिमा आहे तिच्या तुलनेत हे प्रकाशित साहित्य कमीच आहे. त्यांच्या तेजस्वी जीवनाच्या काही पैलूंवर अजूनही यथोचित प्रकाश पडायचा आहे. सुभाषबाबूंचे व्यक्तिमत्व, त्यांची विचारसरणी, त्यांचे अनेकांगी कार्य, तत्त्वज्ञान यावर संशोधनपर व अभ्यासपूर्ण लिखाण करून त्यांच्या बहुमोल कार्याचे मूल्यमापन होणे आवश्यक आहे विशेषतः तरुण विद्वान व साहित्यिक हे आव्हान स्वीकारतील अशी अपेक्षा केल्यास वावगे ठरणार नाही.

● ●

(मूळ बंगाली लेखाचा प्रा. अमलकुमार डे यांनी केलेला अनुवाद)

**************************

# माझ्या जीवनप्रवासातील मार्गदर्शक सेनानी

**डॉ. श्रीश जोशी**

**************************

*नागपूरचे एक नागरिक डॉ. श्रीश जोशी हे आझाद हिंद सेनेतील नेताजींचे सहकारी होते. मूळचे नेत्ररोगतज्ज्ञ डॉ. जोशी हे सुरुवातीला कॉंग्रेसमध्ये होते. दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर ते डॉ. हेडगेवारांच्या आशीर्वादाने ब्रिटिश सैन्यात डॉक्टर म्हणून भरती झाले. पण मनातील प्रेरणा ब्रिटिशांच्या बंदुका ब्रिटिशांच्या विरोधी वळवायच्या हीच! इतर सहयोगी भारतीयात डॉ. जोशी हे देखील आझाद हिंद सेनेत डॉक्टर म्हणून भरती झाले. आग्नेय आशिया सीमेवर जपानी सेनेकडून बंदी आल्यावर डॉ. जोशी आझाद हिंद सेनेत आले. त्यांना मेजरचा हुद्दा मिळाला. डॉ. जोशी १९८९ मध्ये निधन पावले.*

*त्यांनी आपले 'जीवनप्रवासी' या शीर्षकाखाली आत्मकथन लिहिले आहे. ते आत्मकथन अद्यापही अप्रकाशित आहे. त्या आत्मकथनातील नेताजींच्यासंबंधी भाग पुढे आठवणींच्या रूपात संपादित करून देत आहोत. - संपादक.*

१६ फेब्रुवारी १९४३ रोजी आम्ही काही ब्रिटिश भारतीय सैनिक जपान्यांचे बंदी झालो. आम्हा भारतीयांना वेगळे काढून वेगळया बंदी शिबिरात ठेवले. जपान्यांचे धोरण भारतीयांना शक्य तो दुखवायचे नाही असे होते. या बंदी शिबिरात माझी पु. ना. ओकांशी ओळख झाली. याशिवाय हेमचंद्र मुखर्जी, सत्येन्द्रनाथ बसू, मलीक, दास या मंडळींचीही ओळख झाली.

याच काळात आग्नेय आशियात रासबिहारी बोसांची भारतीय स्वातंत्र्याची चळवळ जोरात सुरू होती. आम्हा युद्धकैद्यांच्या छावण्यात देखील त्यांची बौद्धिके सुरू झाली. सुरुवातीसुरुवातीला रासबिहारी बोसांच्या चळवळीत सामील व्हायचे की नाही याविषयी युद्धकैद्यांच्या मनात संभ्रम होता. रासबिहारींच्या बाजूने कॅ. मोहनसिंग मनपरिवर्तन करीत होता. सुरुवातीला आमच्यापैकी कॅ. शहानवाझने चळवळीला खूप विरोध केला. पण अनपेक्षितपणे तो चळवळीत सामील झाला. जगन्नाथराव भोसले आणि मीही चळवळीत सामील झालो.

मी एका बाजूने सुविद्य सेनाधिकाऱ्यामध्ये राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा प्रचार करीत होतो. दुसऱ्या बाजूने स्वातंत्र्याच्या चळवळीत सामील होण्याविषयी विनंती करीत होतो. मला पु. ना. ओक साथ देत होते. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा प्रचार करीत असताना मी हिंदुधर्मापेक्षा हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा अधिक प्रचार करीत असे.

१९४२ च्या जून महिन्यात बँकॉकला आग्नेय आशियातील हिंदी लोकांची परिषद झाली. आमच्या फौजी लोकातून प्रतिनिधी नियुक्त केले गेले. श्री. रासबिहारी बोसांच्या अध्यक्षतेखाली तीन दिवस ही परिषद होऊन हिंदी स्वातंत्र्य संघ (Indian Independence League) स्थापन झाला. बोस त्याचे अध्यक्ष झाले. कार्यकारी मंडळात ज. मोहनसिंग, कॅ. गिलानी वगैरे होते. उमरावतीचे देशपांडे नावाचे गृहस्थ होते. ते रासबिहारींचे सचिव झाले. जोश जोरात होता. अब्दुल गनी सुभेदार नावाच्या अधिकाऱ्याने या संघात मुसलमानांना देखील आणले. या स्वातंत्र्य संघाने एक क्रांतिकारक फौज निर्माण केली. त्या फौजेसाठी गणवेष आणि बिल्ला या संबंधात मी काही सूचना केल्या त्या मान्य झाल्या.

दिवसामागून दिवस जात होते. पण गाडी रेंगाळली. स्वयंसेवक कंटाळले. भारतातल्या स्वातंत्र्य उठावाच्या काही वार्ता सिंगापुरात आमच्या कानावर पडत होत्या. आम्ही मनगटे चावत चडफडत होतो. पण पुढे कामाला अचानक गती आली. १२ सप्टे १९४२ पासून आझाद हिंद फौजेच्या कामाने अधिक वेग घेतला.

एकंदर आझाद हिंद फौज एक सप्टेंबर पासून सुरू झाली. पण अधिकृत तारीख १२ सप्टे. ४२ ठरविण्यात आली. आझाद हिंद फौजेची रचना हाती असलेल्या संख्येनुसार आणि कार्यवैशिष्ट्य लक्षात घेऊन ठरविण्यात आली.

हेडक्वार्टर्स, ॲडमिनिस्ट्रेशन, ॲडज्युटेटं जनरल, का. मा. ऑर्डनन्स, मेडीकल, ट्रान्सपोर्ट, इ.

सैनिकांचे जे विभाग पाडण्यात आले होते ते असे - हिंद फील्ड फोर्स (कमां-क. भोसले), गांधी रेजिमेंट (कमां-क. इनायत कियानी), नेहरू रेजिमेंट (कमां-क. अजीज़ अहमद), आझाद रेजिमेंट ( कमां-क. प्रकाशचंद्र), आर्मर्डकार (कमां-क.मेजर रियाझ अहमद ), मेकसाईजड ट्रान्सपोर्ट ( कमां-अनाय.), सिग्नल्स (कमां. शिंदे ) मेडिकल ( डी. एम. एस. क. लोकनाथन्), सॅपर्स मायनर्स ( कमां. प्रीतमसिंग) डिटेन्शन कँप (कमां. मेजर रशीद खान) इ. हिंद फील्ड फोर्समध्ये मेजर हुसेन सेकंड इन् कमांड, ॲडज्युटेट कॅ. अहमद इ.

मार्च १९४३ ची गोष्ट. जपान्यांच्या सूचनेवरून आम्ही बटालियनचे लोक रेडिओभोवती जमलो. रेडीओ जपान्यांनी आणून ठेवला होता, आणि लाऊड स्पीकर पण आणला होता, संध्याकाळी आठचा सुमार असेल. रेडीओ सुरू झाला. 'मै सुभाषचंद्र बोस बोल रहा हूं.' अहाहा, सगळ्यांची अंतकरणे गद्‌गदित झाली. जयजयकार झाला. 'ऐका' म्हणून कोणीतरी ओरडले. तोंड भरून निघालेला तो आवाज. कुठून तरी (जर्मनीतून ) आझाद हिंद रेडीओवरून ते संपूर्ण भाषण सर्वांनी ऐकले. नव्हे अंतःकरणात भरून घेतले. इंग्रजांना ठोकायला सैनिक उत्साहाने सिद्ध झाले. सर्व INA आणि POW च्या कॅम्पसमधून ते भाषण ऐकण्याची सोय मुद्दाम केली होती, भाषण संपले आणि 'सुभाषचंद्र बोस की जय', 'भारत माता की जय' ने काही काळ आकाश दुमदुमले. सर्वांनी संध्याकाळी खाल्लेले जेवण आनंदात केव्हाच पचले, 'बस भाई, अब अंग्रेजोंको ठोकना है' जो तो सैनिक म्हणू लागला. पण तिकडे POW कँपमध्ये ?

POW कॅम्पमध्ये विकृत मनोवृत्तीचे निरनिराळे प्रकार दिसू लागले. बोलणारा सुभाषचंद्र नव्हेच, दुसरा कोणीतरी आहे, बोलणारा तोतया बोस आहे, सुभाषचंद्र बोसांची जुनी कुठली तरी रेकॉर्ड जपान्यांनी वाजविली आहे INA वाल्यांना बुद्धू बनवायला, सुभाषचंद्र बोलेल कसा रेडिओवर ? त्याला हिटलरने कैद करून ठेवले आहे. असे अनेक वाक्प्रकार दिसू लागले. खरेतर इतर प्रांताच्या लोकांनी त्यांचा आवाज ओळखला नसेल, पण बंगाल्यांना ओळखता येणार नाही का ? जुनी कुंठली तरी रेकॉर्ड असेल तर आजची अद्यावत माहिती तीत कशी मिळेल ? पण जाणूनबुजून ओळखायचे नाहीच ही शिक्षित म्हणविणाऱ्यांची वृत्ती !

पुनः जून १४ आणि १५ तारखेला पुनः सुभाषचंद्रांचे भाषण ऐकण्याची सोय करण्यात आली. अद्यावत माहिती त्यांत होती. POW (म्हणजे प्रिझनर्स ऑफ वॉर-युद्धकैदी) चा जळफळाट विचारूच नका. INA च्या लोकांची सुस्ती जात चालली. रक्तभिसरणाला वेग येऊ लागला. या काळात एका POW कॅम्पात मी गेलो होतो माझ्या मिशनवर. एका डॉक्टर मित्राला भेटलो. विषय निघाला तो त्यांनी स्पष्ट सांगितले, 'या विषयावर आपण बोलू नये हे चांगले. बोलायला लागले म्हणजे तुमचे म्हणणे पटते आणि INA त येण्याची पाळी येते. म्हणून या कॅम्पमध्ये याबाबत आम्ही बोलायचेच नाही असे ठरविले आहे. दुसरे पुष्कळ विषय आहेत.' हे मित्र तुलसीरामायणावर सुंदर प्रवचन करणारे होते. ही आम्हा शिक्षित भारतीयांची प्रवृत्ती होती.

मार्च मधले सुभाषचंद्रांचे भाषण बर्लिनहून झालेले असणार. त्याच सुमाराला रासबिहारींनी हिंदुस्थानातला एक मोठा पुढारी आमचे नेतृत्व करणार असल्याचे सांगितले होते. पुढील घटनेवरून हे दिसून येते की जूनमधले भाषण जपानमधून झालेले असणार.

एक जुलैला माझ्या बटॅलियनमध्ये संध्याकाळी साडेचार पाच वाजता दोनशे निवडक शिपायांची तुकडी तयार करण्याचा आदेश आला. निवड झाली. इतरांच्या आधी त्यांचे जेवण उरकले. दुसऱ्या दिवशी सकाळी एका मोठ्या माणसाला मानवंदना देण्यासाठी जायचे होते.

दोन जुलैला एकच्या सुमाराला रस्त्यावर ट्रक्स दृष्टिक्षेपात आले. जयजयकार झाला 'सुभाषचंद्र बोस की जय', 'भारत माता की जय' संपूर्ण बटॅलियन बरॅकबाहेर आले. ट्रक्स फाटकात शिरले. जोरजोराने जयजयकार होऊ लागला. कोणीतरी ओरडले 'डॉक्टर साब, सुभाषबाबू आ गये' माझ्या तोंडातून शब्द बाहेर पडेनात. डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. फक्त हात पूर्ण वर उचलून त्या सांगणाऱ्याला प्रतिसाद दिला. सुभाषचंद्र बोस सिंगापुरात आले. दोन जुलै एकोणीसशे बेचाळीस.

श्री. रासबिहारी बोस तर त्यांच्याच बरोबर आले. कर्नल भोसल्यांनी हार घातला. त्याच प्रमाणे अनेक हार मुलकी लोकांनी घातले. मानवंदना झाल्यावर ते समुद्रकिनारी राखून ठेवलेल्या एका खास बंगल्यावर गेले. बंगला गार्ड आमचाच होता. पर्सनल ऑर्डरली गढवाली आमच्याच बटालियनचा होता. तेथे जमलेल्या अनेकांचे स्वागत स्वीकारून त्यांना निरोप देण्यात आला. मेजर डी. एस. राजू

त्यांचे खास डॉक्टर नियुक्त झाले होते. प्रमुख मंडळींसह भोजन आटोपले. विश्रांतीनंतर भोसले भेटले. सहगल INA चे अधिकारी भेटले. बोस आले तेव्हा फिक्क्या रंगाचा सूट आणि पांढरी टोपी त्यांनी घातली होती. तीन तारखेला स्थानिक व्यवस्थेचा आणि प्रमुख व्यक्तींचा परिचय झाला. आमचे कॅ. बी. एस. रावत त्यांचे पर्सनल अॅडज्यूटंट नियुक्त झाले होते. त्यांच्या खाजगीतील सर्वसेवक वर्ग आमच्या गढवाल बटॅलियनचा होता. याचमुळे अनेकदा मला तिथे जाण्याचे प्रसंग आले.

सुभाषबाबूंनी वैयक्तिक मुलाखती घेऊन सर्वांना कामे सांगितली. कॅ. पळशीकरांना स्वतंत्र भारताच्या स्वरूपाचा आराखडा तयार करण्यास सांगितले गेले. दुसऱ्या दिवशी त्यांची माझी भेट झाली तेव्हा त्यांनी एक आराखडा तयार करून मागितला. दोनतीन दिवसात एक आराखडा तयार करून टाईप करून एक कॉपी मी पळशीकरांना दिली. त्यांनी मलाही सही करण्यास सांगितले. ते काम त्यांना सोपविले असल्यामुळे माझी (मी लेफ्टनंट होतो. शिवाय प्रतिनिधी नव्हतो) सही योग्य होणार नाही म्हणून मी नकार दिला. मी तयार केलेले असल्यामुळे त्यावर आपली एकट्याची सही करून पाठवायना त्यांचे मन कचरत होते हे त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होते पण मी माझ्या नावापेक्षा मुख्य मुद्याला महत्त्व देत होतो. सही कोणाचीही असली तरी काय झाले ? माझ्या आग्रहावरून त्यांनी एकट्यानीच सही करून तो आराखडा सुभाषबाबूंकडे पाठवला. पुढे सुभाषबाबूंनी तो मान्य केला.

त्या आराखड्यात पंजाबातल्या पंचनद्या, गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा, महानदी, तापी, नर्मदा, कृष्णा, गोदावरी, कावेरी इ. प्रमुख नद्या दाखविण्यात आल्या होत्या. माझा आराखडा योग्य ठिकाणी पोचल्याची ही पावती होती.

चार जुलैला बोसांनी चार्ज घेतल्यावर पाच तारखेला त्यांनी आ. हिं. फौ. ची पाहणी केली. दोन दिवसात त्यांचा गणवेश शिवून तयार झाला. आदल्या दिवशी मिलीटरी सेक्रे. सहगल दुसऱ्या दिवसाचा नकाशा घेऊन गेले. आणि नकाशा समजावून दिल्यावर सॅल्यूट कसा द्यायचा वगैरे सांगू लागले. सूभाषबाबू चूप बसून ऐकत होते. काही वेळाने स्मित करून म्हणाले, ' ठीक आहे सहगल, ते सर्व मला माहित आहे. ' बिचाऱ्या सहगलांचा चेहरा पाहण्यासारखा झाला होता.

दुसऱ्या दिवशी ठीक वेळेवर तिरंगी झेंडा बॉनेटवर फडकत गाडी आली. तिरंगा झेंडा फडकवल्यावर उच्चस्थानी जाऊन उभे राहिले. आर्मी कमांडर

महमद शमान कियानींनी फौज सावधान केली. उंच, सडपातळ देहयष्टीचे कियानी उच्चस्थानासमोर आले आणि रिपोर्ट दिला. फौज, पाहणीसाठी तयार असल्याचे सांगितले. सुभाषचंद्र एक मुलकी कॉंग्रेस पुढारी , धोतर नेसून अंगावर शाल पांघरली बंगाली बाबू, एवढेच जाणणाऱ्या लोकांना, गणवेषांतील बोसांनी 'फुलस्टेप' टाकत जाऊन गार केले. त्यांच्या समवेत भोसले, चटर्जी, लोकनाथन रावत आदि अधिकारी होते. जनतेच्या तोंडून नकळत उद्‌गार बाहेर पडला, 'हा फौजेचा खरा नेता' लोक धन्य जाहले. 'आम्ही लष्करी अधिकारी'ही फौजी अधिकाऱ्यांची घमेंड खाडकन हाफ मास्ट झाली. मनातून घाबरलेच म्हणाना. मजा ही होती की I.C.S. अधिकारी म्हणून नेताजींना काही गोष्टी तेव्हाच अवगत झाल्या होत्या.

सन १९२८ साली पं. मोतीलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या कलकत्ता अधिवेशनात हजारों स्वयंसेवकांच्या पथकाचे नेतृत्व त्यांनी सांभाळले होते. कॉंग्रेस श्रेष्ठींच्या तोंडून 'हिंदुस्थानचा भावी सरसेनापती' म्हणून उद्‌गार निघाले होते. जर्मनीत गेल्यावर खास जर्मन अधिकाऱ्यांच्या हातून लष्करी शिक्षण त्यांनी घेतले होते. पाहणी करून व्यासपीठावर परत आल्यावर सैनिकांना उद्देशून भाषण केले. 'दोस्तो -' या त्यांच्या संबोधनानेच प्रत्येक सैनिक त्यांच्याकडे आकर्षिला गेला. साले, X X X या दैनंदिनीतल्या शब्दांपलीकडे जाऊन अगदी शिष्ट शब्द सैनिकांच्या कानी क्वचित आले असतील तर ते म्हणजे 'प्यारे सिपाहियों-' पण 'दोस्तो' शब्दाने प्रत्येक सैनिकाच्या अंतःकरणाला हात घातला. जणु शिकागो परिषदेतील विवेकानंदांचे 'माझ्या अमेरिकेतील बंधू भगिनींनो' च. 'भारतीय स्वातंत्र्य संपादक कार्यातील तुम्ही आघाडीचे (pioneer) शिपाई आहात. स्वतंत्र राष्ट्रातील शिपायांना वा त्यांच्या कुटुंबियांना ते सरकार लढाईनंतर अनेक प्रकारची बक्षिसे देते.

पण आज मी तुम्हाला काय देऊ शकणार आहे? किंवा वचन कशाचे देऊ? नाही म्हणायला माझ्या जवळ चार गोष्टी आहेत आणि त्या मी ज्याला जितके पाहिजे तितके मी देऊ शकेन त्या म्हणजे' भूक, तहान, कष्ट आणि मरण. बस्स, पण एक लक्षात असू द्या की तुमच्यामधून जे दिल्लीच्या लाल किल्ल्यावर पोचतील आणि जें विजय संचलन (Victory Parade) करतील तेच तुमचे खरे पारितोषिक होणार आहे' समोर सज्ज उभे असलेल्या सैनिकांना समजेना की आपण कुठे आहोत. कदाचित काही लोक खचलेही असतील. पण त्यांच्याही

मनाला एक खात्री पटली की खोटे आमिष दाखविणारा हा पुढारी नव्हे. सच्चा नेता आहे. त्यानंतर 'मार्चपास्ट' झाले. आघाडीचे मोटरसायकलवरील पायलटस्, आर्मर्ड व्हेइकल्स, (चिलखती गाड्या), तोफखाना आणि पायदळ ताठ मानेने जेव्हा वंदन देत तेव्हा राष्ट्रीय वृत्तीच्या प्रेक्षकांचे अंतःकरण भरून आल्याशिवाय राहिले नाही.

पुन्हा दुसऱ्या एका प्रसंगात असाच 'दोस्तो' ऐकू आला. सगळ्यांचे कान टवकारले.. का कोणास ठाऊक, सेकंदाचा काही भाग असेल, पण पोटातल्या आतड्यांची हालचाल थांबण्याचा भास झाला खरा. नेताजी म्हणाले, 'माझ्या कानी रिपोर्ट आले आहेत की INA त काहीजण दबावाने आले आहेत, काही जणांवर कोणाची जबरदस्ती झाली, अशाच काही काही बातम्या आहेत. मी तुम्हाला सर्वांना बजावू चाहतो की जे असे आले असतील, ज्यांची इच्छा INA त राहायची नाही, ज्यांना INA चा कारभार पसंत नाही, त्या सर्वांनी खुशाल INA सोडून द्यावी. मी एक आठवड्याची मुदत देतो. अशा नाराज असलेल्या हजारोंची मला जरूरी नाही. निष्ठावान असे फक्त पाचशे जरी राहिले तरी माझे मी पाहून घेईन. मी कोणाचीही खुशामत करणार नाही. क्रांतिकार्य पुढे कसे चालवायचे ते माझे मला माहीत आहे. कोणावाचून कार्य अडून राहणार नाही. तरी ज्यांना जायचे त्यांनी या आठवड्यांत बाहेर पडावे. पण एक सप्टेंबरनंतर जे INA मध्ये राहतील त्यांच्याकडून कसलीही कुरकुर ऐकली जाणार नाही. पूर्ण शिस्तीत राहून दिलेल्या हुकुमांची तामीली त्यांना करावी लागेल."

जितक्या करडेपणाने भाषणाला सुरुवात झाली, तितक्याच तडफेत भाषण संपले. काही जणांचे चेहरे पाहण्यालायक झाले होते. अधिकारीसुद्धा थरारले होते. याही काळात नेताजींच्या भाषणात खुशामतीची भाषाच काय पण शब्दही नाही, 'याल तर तुमच्यासह, न याल तर तुमच्यावाचून, विरोध कराल तर तुम्हाला ठोकून, आम्ही पुढे जाणार, जाणार, जाणार. ही भावना.' एका सभेत त्यांनी सांगितले की 'स्वातंत्र्य मिळाल्यानंतर, इंग्रजांबद्दल प्रेम बाळगणाऱ्यांना तिसऱ्या वर्गाचे तिकीट काढून जहाजावर चढवून दिले जाईल. स्वतंत्र भारतात अशांना स्थान नाही.'

सुभाषबाबूंची माझी एक आठवण कॅथे थिएटरशी संबंधित आहे. कॅथे थिएटर सिंगापुरातली एक दर्शनीय वास्तू आहे. अठरा मजली इमारत. Air

Conditioned. थिएटर खाली. कोणत्याही मोठ्या कार्यक्रमासाठी या थिएटरचा उपयोग होतो. मध्यवस्तीत आहे. ऐन लढाईच्या धामधुमीत सुद्धा जपान्यांनी ऐश्वर्य समजल्या जाणाऱ्या या इमारतीवरच काय पण जवळपाससुद्धा एकही बॉम्ब टाकला नाही. ते एक लॅंडमार्क समजले गेले आहे. असे हे थिएटर दि. २० ऑक्टो. १९४३ रोजी लतापताकांनी सज्ज झाले होते. आग्नेय आशियातले निरनिराळ्या देशांचे हिंदी स्वातंत्र्य संघाचे प्रतिनिधी आणि आझाद हिंद फौजेतले कॅप्टन आणि त्यावरच्या हुद्याचे अधिकारी प्रतिनिधी म्हणून तिथे जमले. जपानी सरकारी प्रतिनिधी पण हजर होते. स्वागत गीत झाल्यावर युनिफॉर्ममधले उंच ताठ नेताजी उभे राहिले. त्या दिवशी सकाळी १० ते १ आणि दुपारी २ ते ५ अशा दोन्ही बैठकीत एकंदर भारताची राजकीय परिस्थिती, राष्ट्रीय आंदोलन, त्यांचे निरनिराळे टप्पे, यांचा आढावा घेतला. दुसऱ्या दिवशी सकाळच्या बैठकीत आंतरराष्ट्रीय परिस्थिती समजावून सांगितली. आणि या परिस्थितीत हंगामी सरकार स्थापन करण्याची आवश्यकता प्रतिपादिली. पूर्वीच्या काळी जी जी राष्ट्रे गुलामीतून मुक्त झाली त्यांची उदाहरणे देऊन, आंतरराष्ट्रीय दृष्टीने, आपण जे सरकार स्थापन करणार आहोत ते, राष्ट्रीयदृष्ट्या अपूर्ण असले तरी, त्या अनेकांपैकी एक असल्याचे सांगितले. नेहमी नेताजी वास्तवतेला धरून बोलत. विनाकारण नारे लावून जनतेला भुलविण्याचा त्यांनी प्रयत्न केला नाही. दुपारच्या बैठकीसाठी आम्ही जमलो. एकंदर वातावरणच निराळे भासत होते. गांभीर्ययुक्त अपूर्वाई. मनाला जाणवत होती. थिएटर गच्च भरले होते. व्यासपीठावर आता मागच्या बाजूला खुर्च्यांची रांग होती आणि समोर दोन खुर्च्या होत्या. बाजूला तिसरी खुर्ची होती (सेक्रेटरीसाठी). बाहेर गार्ड ऑफ ऑनरचा आवाज झाला. नेताजी आले. उत्थापन झाले. नेताजींच्या मनावरील दडपण त्यांच्या चेहऱ्यावर जाणवत होते. नेताजी आणि जपानी प्रतिनिधी स्थानापन्न झाले. गीत झाल्यावर नेताजींनी पत्रक वाचून दाखविले. राष्ट्रीय आंदोलनाचा आढावा घेऊन १८५७ साली झालेल्या सशस्त्र उठावणीचा इतिहास सांगितला. त्यानंतर स्थापन होऊ घातलेल्या सरकार स्थापनेचे पत्रक वाचून दाखविले आणि मंत्रिमंडळाची नावे वाचून दाखविली. त्यावेळी स्वतःचे नाव वाचताना संकोचाने त्यांचा आवाज खाली गेला होता. हेड ऑफ स्टेट, परराष्ट्र आणि युद्ध ही खाती स्वतःकडे होती. अर्थ कॅ. चटर्जी, कायदा श्री. सरकारकडे, माहितीनभोवाणी श्री. अय्यरकडे.

कॅबिनेट हुद्दा असलेले चिटणीस श्री. आनंदमोहन सहाय, लष्करी प्रतिनिधी आणि मुलकी प्रतिनिधी होते. नंतर राष्ट्रनिष्ठेची शपथ घेणे सुरू झाली. पहिली शपथ स्वतः नेताजींनी घेतली. 'घेतली' म्हणणे जितके सोपे आहे तितकेच ती 'घेणे' अवघड असल्याचे दिसून आले. नेताजींनी शपथ घेतली ती भारताच्या अडतीस कोटी देशबांधवांना उद्देशून, स्वातंत्र्य मिळेपर्यंत, जरूर पडल्यास आजन्म, लढत राहण्याची त्यांनी शपथ घेतली. शपथ घेत असताना त्यांच्या भावना किती उचंबळून आल्या होत्या ते प्रत्यक्ष त्या वेळी हजर असलेल्या प्रत्येकाच्या अंतःकरणात कोरले गेले. मुक्तिसेनेच्या सरसेनाधिपतीच्या डोळ्यातून वाहणाऱ्या अश्रूंनी अगदी कट्टर विरोधी माणसाच्या अंतःकरणालाही हलविले असते. 'माणसाच्या' म्हणण्याचे कारण असे की ज्या माणसात माणुसकीच उरली नसेल तर गोष्ट निराळी. तिथे उपस्थित प्रत्येकाने आवंढा गिळला असला पाहिजे. कारण 'राष्ट्रपती सुभाषचंद्र बोस की जय'चा नारा लावताना प्रत्येकाचा आवाज घोगरा झाला होता. शपथेतल्या प्रत्येक एक दोन शब्दानंतर नेताजींचा गळा दाटून येत होता. शेजारी बसलेल्या जपान सरकारच्या प्रतिनिधीचे अंतःकरण हेलावले होते हे त्यांच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होते. नेताजींच्यानंतर भोसले, चॅटर्जी, कॅ. लक्ष्मी, आणि अन्य सदस्यांनी शपथा घेऊन नेताजींना इमानदार राहण्याचे वाचून दाखविले. उचंबळलेल्या मनःस्थितीत सभा आटोपली. प्रत्येक जण ताठ मानेने चालू लागला. प्रत्येकांत 'स्वत्व' निर्माण झाले होते. रात्री मंत्रिमंडळाचे आणि निमंत्रित पाहुण्यांचे सहभोजन झाले असावे. दुसऱ्या दिवशी मंत्रिमंडळाच्या बैठकी होऊन दि. २२-२३ च्या मध्यरात्री 'आझाद हिंद सरकार'तर्फे ब्रिटन आणि त्यांचे सहकारी अमेरिका यांच्या विरुद्ध युद्ध पुकारले. दि. २३ रोजी सैनिकी आणि मुलकी लोकांचा मेळावा कार्पोरेशन समोरील मैदानात भरला. एकंदर जनसमुदाय एक दीड लाख असावा. नेताजी आले. झेंडा फडकला. वंदन आटोपून नेताजी व्यासपीठावर चढले. पाठोपाठ अधिकारी मंडळी गेली आणि स्थानापन्न झाली. लोकांच्या डोळ्यासमोर नेताजी तर होतेच, पण आज राष्ट्रपती नेताजी होते. भाषणाला 'दोस्तो.' ने सुरुवात झाली. दि. २० आणि २१ च्या कार्याचा आणि त्यावरील AIR ची प्रतिक्रिया सांगितली, AIR वर नेताजींना जी शिव्यांची लाखोली वाहिली गेली तिचाही त्यांनी हसत हसत उल्लेख केला. एका बाजूने आझाद हिंद फौजेची हकीकत हिंदुस्थानच्या जनतेपासून झाकून ठेवण्याची धडपड करून दुसऱ्या बाजूने

अे. सी. चॅटर्जी, अेम. झेड. कियानी आणि हबिबुर रहमान या वरिष्ठ अधिकाऱ्यांसोबत

विश्रांतीकाळातील आनंदास्वाद

गांधीजींसमवेत

बृहद्पूर्व आशिया परिषद टोकियो येथे भाषण करताना (१९४३)

झांशी राणी पथकाची पहिली कवायत

कॅप्टन लक्ष्मी सहगल यांचेसोबत झांशी राणी पथकाचे
निरीक्षण करताना

'भारतपथिक' आत्मकथनाचे लेखक (१९३७)

झांशी राणी पथकाला शिस्तीचा पाठ गिरवताना

अखिल भारतीय फॉरवर्ड ब्लॉक अधिवेशनात (१९४०)
नागपूर् येथे कामगार केसरी रामभाऊ रुईकर यांचे समवेत

नेताजी सुभाषचंद्र बोसांच्या अंदमान भेटीत जपानी रिअर ॲडमिरलने
नेताजींच्या स्वागतार्थ मेजवानी आयोजित केली त्या प्रसंगी

युरोपात काही भारतीयांसोबत पुढाकार घेऊन सुभाषबाबूंनी प्रसिद्ध केलेल्या 'भाईबंद' या नियतकालिकाचे पहिले पान

त्यांच्या (नेताजी)वर शिव्यांची लाखोली वहायची ही ब्रिटिश सरकारची नीती पाहून त्यांना हसू येत असे. "आपले पाऊल योग्य रीतीने पुढे पडत आहे की नाही" हे जर आजमावयाचे असेल, तर त्यांचे AIR वरून होणारी आपली निंदा हे थर्मामीटर राहील. आमचे पाऊल जितके पुढे पडत असेल तितक्या जास्त शिव्या आपल्याला ऐकाव्या लागतात. नेमके शत्रूच्या मर्मावर आपण आघात करीत आहोत हे निश्चित. ब्रिटिश सरकारच्या म्हातारीने कोंबडा कितीही झाकण्याचा प्रयत्न केला तरी हिंदुस्थानचा स्वातंत्र्यसूर्य उगवल्याशिवाय राहणार नाही, हे निश्चित." असे नेताजी म्हणाले. ब्रिटिश आणि अमेरिका यांच्यावर आमच्या आ. हिं. सरकारने दि. २२-२३ च्या मध्यरात्री, युद्ध पुकारण्याचा निर्णय घेतला. त्याचप्रमाणे रेडिओवरून जाहीर केले गेले. ही युद्धघोषणा ऐकून लोक इतके चेतविले की त्यावेळी कोणी इंग्रज समोर असता त्याचे तुकडे तुकडे करून मातीत मिसळून टाकले असते. जिकडे तिकडे नारे लावले जाऊ लागले. शिपायांनी बंदुका उचलून खांद्याडोक्यावर धरले. उत्साहाच्या भरात नाचू लागले. रूटमार्चसाठी ढोलकी आणि बासऱ्या ज्या काही तुकडयांनी बरोबर घेतल्या होत्या त्या वाजू लागल्या. शिष्ट लोकांनी हातरुमाल वर केले. साधारण जनतेतील पुरुष खांद्यावरील धोतर हवेत उडवू लागले. दोन पैलवानांची कुस्ती निर्णायक व्हावी आणि त्यानंतर जेत्याच्या बाजूचे लोक शिट्या टाळ्यांच्या गडगडाटात डोक्यावरील फेटे जसे उडवितात आणि आपला उत्साह दर्शवितात तो दहा वीस हजारांचा खेड्यातील मेळावा डोळ्यासमोर येऊन गेला. त्याहीपलीकडे जाऊन बायाही नाचू लागल्या. काहींनीतर कडेवरील मुलांना खांद्यावर घेऊन नाचायला सुरुवात केली. जी जी वाद्ये त्यावेळी लोकांजवळ होती ती सर्व वाजू लागली. शिपायातून एक मोठी तुकडी वाजवत नाचत नेताजींच्या चरणी मुजरा करायला पुढे सरकली. आपली मुले नेताजींच्या चरणी वाहण्यासाठी आणि त्यांच्या चरणावर डोकी ठेवण्यासाठी मुलकी बाया पुढे सरकल्या. व्यासपीठावरून सहगल, (मिली. सेक्रे.), शाहनवाज आदींनी या जमावाला थोपविण्याचा प्रयत्न केला. पण 'अडवू नका' म्हणून नेताजींनी त्यांनाच थोपविले. सार्वजनिक उत्साह काय असतो याची जाणीव नसलेल्या, श्रीमंतीत वाढलेल्यांना आणि केवळ लष्करी शिस्तीच्या अधिकाऱ्यांना हतबुद्ध झाल्यासारखे झाले असल्यास नवल नाही. नेताजी या देखाव्याकडे एकचित्त पाहत स्थिर उभे होते. काही दिवसानंतर माझी एका व्यक्तीची ओळख झाली.

तिचे नाव भट्टाचार्य असून तो नेताजींचा 'गिनीपिग' होता. म्हणजे नेताजींचे खाणे तो प्रथम तो खाऊन पाहील. नेताजींच्या अंथरूणावर प्रथम तो लोळेल. जर काही गफलत असेल तर नेताजींना धोका होऊ नये. सर्व बड्या माणसांच्या बाबतीत ही दक्षता घेतली जाते. तो नेताजींबरोबर आघाडीकडे आला असताना आजारी पडला आणि काठेवाडहून इथे आला होता. तो दिवस मी त्याच्याबरोबर घालविला. नेताजींना १०८ रुद्राक्षांची माळ हवी असल्याचे त्याने माहिती दिली. त्यापैकी ५४ रुद्राक्ष मिळाले होते. 'माझ्याजवळ रुद्राक्ष तर नाही पण १०८ पूर्ण असलेली तुळशीमाळ आहे हिचा काही उपयोग होईल का ' म्हणून विचारता तो म्हणाला 'पाठवून पहा' तसेच मिंगसाडोनहून पाठविलेला पुस्तकांचा काही उपयोग होतो आहे का म्हणून विचारले. या मी पाठविलेल्या सर्व वस्तूंचा नेताजींना उपयोग झाला याचा मला अभिमान आहे. अशाप्रकारे नेताजींचा दुर्लभ सहवासाचा लाभ मला मिळाला हे मी माझं भाग्य समजतो.

पुढे दुसऱ्या महायुद्धात जपानचा पराभव, आमच्या आझाद हिंद सेनेचा पराभव, नेताजींचे अज्ञातात प्रयाण या दैवदुर्विलासी घटना घडल्या. आम्ही आझाद हिंद सेनेचे अधिकारी ब्रिटिशांचे युद्धकैदी झालो. लाल किल्ल्यात आमच्यावर अभियोग सुरू झाला. बंदिस्त जीपहून एकदा आम्हाला कुठेतरी नेत असताना माझ्या शेजारी हबीबुर रहेमान होता. नेताजींच्या शेवटच्या प्रवासात तो त्यांचा सहकारी होता. व नेताजी दिवंगत झाले असा त्याचा विश्वास होता.

आझाद हिंद सेनेवरील अभियोगाच्या वेळेस आम्ही कितीतरी जण काबूल लाईन्समधून लाल किल्ल्यात बदलून आलो. एकदा एकाच जीपमध्ये मी आणि कर्नल हबीबुर रेहमान शेजारी शेजारी बसलो होतो. माझे सारे लक्ष हबीबुरच्या हातावर होते. ऑगस्ट १८, १९४५ ला नेताजींच्या विमानाला आग लागली त्यात नेताजी पण जळाले, हबीबुर रहमाननी विझवण्याचा प्रयत्न केला पण उपयोग झाला नाही, इतर सर्वजण सुरक्षित आहेत वगैरे गोष्टी ऐकल्या होत्या म्हणून ज्यांना नेताजींनी आपला सहकारी म्हणून बरोबर घेतला, त्याने त्यांची आग विझवण्याचा प्रयत्न केला तर तो देखील आगीने बराच घायाळ झालेला असणार ही सर्वसाधारणांची कल्पना असते. म्हणून बारकाईने मी पहात होतो पण दोन्ही हाताचे पंजे अगदी नॉर्मल होते, पंजाच्या मागच्या बाजूला एकदोन पांढरे डाग दिसले. पैशाच्या आकाराचे फार तर. हे डाग फार तर गरम पाण्याच्या

वा अन्य द्रव पदार्थाच्या थेंबाने होऊ शकतात. पण एकच मुद्दा त्यात येऊ शकतो की ते डाग इतके दिवस राहणार नाहीत.

पण प्रिय माणसाची (आणि मान्यवर नेत्यांची) आग विझवायला गेलेल्या माणसाच्या पंजावर असे कृत्रिम वाटणारे एक दोन डाग दिसावेत हे थोडे अस्वाभाविक वाटते. अर्थात यावरून एक अनुमान निघू शकते की हबीबुर रहमान कोणत्या तरी राजकीय उद्देशाने नेताजींच्या मृत्यूसेबेधी आपले तर्क देत असावा. नेताजी जेव्हा कोणाच्या तोंडाकडे पाहतात तेव्हा ते तोंडावर पाहत नाहीत तर त्या माणसाच्या डोक्यात शिरून त्याच्या हृदयापर्यंत पोचतात आणि हृदयाचे कप्पे असतात. त्यामुळे हबीबुरने उलट सुलट निवेदन दिले असावे. तसे करायला कारण काय? नेताजींच्या कुठल्या तरी हालचाली सुरक्षित व्हाव्यात म्हणून घेतलेली ही सावधगिरी असेल का? आरंभीची वर्षे तशी समजली जाऊ शकतील. आज पंचवीस वर्षे होत आली, तशा हालचाली असतील तर इतक्या वर्षात त्याचा मागोवा काहीच कसा नाही! त्यामुळे ही शंका पण खोटी वाटते. नेताजींना जपान्यांनीच दडविले असेल म्हणावे तर तेही होऊ शकणारे नाही कारण ते स्वतः पराजित झालेले आणि दोस्त जेत्यांनी कानाकोपरा तपासलेला. तेही शक्य नाही. हबीबुर म्हणतात नेताजींच्या लांबीचे (उंचीचे नाही) शरीर पांढऱ्या कपड्यांनी झाकलेले जपान्यांनी त्यांना दाखविले. म्हणून ते नेताजींचे शरीर हे मला स्वतःला पटत नाही. त्या मान्यवराचा चेहरा पाहून शेवटचा मुजरा देण्याची इच्छा हबीबुरला झाली नाही? हे कसे शक्य आहे! ते झाकलेले शरीर नेताजींचे म्हणून जपान्यांनी सांगितले आणि हबीबुरने मानले? हे मला पटत नाही. मुसलमानी अदबला तर बिलकूल सोडून आहे. प्रवासात कुराण हिरव्या कपड्यात गुंडाळून गळ्यात बांधून घेणारा वा खांद्यावरून लटकावून घेणारा मुसलमान (मुसलमानांचे हे वैशिष्ट्य आहे) आणि नेताजीसारख्या सम्राटाने ज्याला विश्वासाने जवळ केला ते हबीबुर रहमान असे करील असे वाटत नाही. (विरुद्ध शाहनवाझ?) असे म्हटले जाते की त्या विमानात नेताजी मध्ये बसले होते. मध्ये बसलेला तेवढा अगदी जळून जाईल आणि जवळपास बसलेले अगदी सुरक्षित राहतील ? ज्या नेताजींना बॉंबचा फुटलेला तुकडा देखील लागू नये म्हणून जपानी मंत्री रंगूनमध्ये बॉंबप्रतिकारी आश्रयस्थानाच्या तोंडावर स्वतःला झोकून देतो, अशा परिस्थितीत आपल्या हातून चूक झाली तर हारागिरी करणाऱ्या जपान्यांपैकी कोणताही जपानी विमान अपघातात जळाला नाही? त्या

जपान्यांचे प्रेत नाही आढळले? एकूण त्या विमानातील बाकीचे सर्व सुरक्षित आणि नेताजीच एकटे जळून मेले? ती आग काय फक्त नेताजींकरिताच लागली होती? तशी जर असेल तर ती कृत्रिम आग नव्हे का? आणि ही सर्व घटना कृत्रिम नव्हे का? ही घटना ऑगस्टमध्ये घडते. दुसरी गोष्ट, रुद्राक्ष माळेच्या साक्षीची! शेवटल्या प्रवासातच नेताजींना माळेची जरूरी का वाटावी? जप ध्यान करण्यासाठी असेल तर आधी त्यांच्याजवळ माळ नव्हती? ती तुटली असेल तर त्याचे मणी काय झाले? त्यांची वृत्ती लहानपणापासून भक्तिमार्गाकडे होती. कलकत्त्यातील घर सोडून निघाल्यापासून आम्ही आघाडीवर लढत असेपर्यंत त्यांनी जप आणि ध्यानी केलेच नसतील? सिंगापुरात आल्यावर निवासस्थानी या कामासाठी एक लहान खोली तयार केली असताना तेव्हा त्यांना माळेची जरूरी पडली नाही? अनेकदा सिंगापुरातल्या रामकृष्ण आश्रममध्ये जात असताना माळेची चौकशी त्यांनी केली नाही? मग शेवटी शेवटीच त्यांना माळेची जरूरी का वाटावी? काही भावी योजना तर मनाशी त्यांनी निश्चित केली नसेल. जगाच्या या तत्संबंधित पूर्व भागात अध्यात्मिक वृत्तीचे लोक जास्त प्रमाणात असल्यामुळे त्या गोष्टीं(दार्शनिक)चा फायदा घेऊन त्यांनी सुरक्षिततेचा मार्ग भविष्यकाळासाठी निश्चितपणे आखला असला पाहिजे. तात्पर्य विमान अपघातातील रुद्राक्ष माळेचे गूढ कायमच उरते. असो.

या लढ्यात हरबोली, स्वातंत्र्य संपादनासाठी अनेक लढे निरनिराळ्या स्वरूपात लढावे लागतात आणि एखाद्या लढ्यात यश आले नाही तर हार मानण्याचे कारण नाही असे ते नेहमी म्हणतच होते. फक्त स्वातंत्र्य मिळेपर्यंत लढत राहण्याची युयुत्सु वृत्ती मात्र स्वातंत्र्येच्छु लोकात पाहिजे. ती वृत्ती जोपर्यंत धगधगत आहे तोपर्यंत 'हार' होऊच शकत नाही. जालियनवाला बाग प्रकरणानंतर त्याचा बदला घेण्याची संधी उधमसिंगाने वीस वर्षानंतर इंग्लंडच्याच राजधानीत साधली ना? तोपर्यंत सर्व म्हणतच होते ना ते प्रकरण संपले म्हणून? पण अंतःकरणात ती आग इतकी वर्षे त्या वीराने धगधगत ठेवलीच ना? जेव्हा जनरल डायरच्या छातीवर त्याच्याच घरात उधमसिंगाने पाय ठेवला आणि गोळी घातली तेव्हा जालियनवाला बाग प्रकरण संपले. तसेच स्वातंत्र्य लढ्याचा हा सेनानी भारत स्वतंत्र होईपर्यंत दुसऱ्या आघाडीची तयारी करण्यासाठी पृथ्वीराज चव्हाणासारखा कुठे अज्ञात स्थळी गेला नसेल का? असा विचार कधी कधी मनात येतो.

अर्थात, लाल किल्ल्यातील अभियोगाच्या वेळेस, नेताजी मृत्यू पावले असा तर्क काहींनी प्रभावी केल्यामुळे, माझ्या मनात नेताजींच्या विमान अपघातातील मृत्यूविषयी प्रतियोगी युक्तिवाद म्हणून कायम संशय बळावला. त्याचसाठी नेताजींचे झाकलेले प्रेत, नेताजींची राख, नेताजींची तथाकथित रुद्राक्षाची माळ, या पुराव्यांना मान्यता देण्यास माझे मन धजत नाही. मात्र, नेताजींच्या विमान अपघाताचा आणि त्यानंतरच्या घटनांचा मी प्रत्यक्षदर्शी साक्षीदार नसल्यामुळे केवळ संशय व्यक्त करणे एवढेच माझ्या हातात आहे. माझे मत कोणाला हास्यास्पद वाटले तर मी त्याचा प्रतिवाद करणार नाही.

● ●

**************************

# मार्क्सवाद आणि सुभाषवाद

**डॉ. वि. स. जोग**

**************************

विसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकातील भारतीय राजकारणातील स्वयंभू प्रतिभेचे महापुरुष नेताजी सुभाषचंद्र बोस, स्वा. सावरकर, म. गांधी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे होत. या चौघांचा त्या काळातील समर्थ जागतिक जीवनदर्शन असणाऱ्या मार्क्सवादाशी अन्वयव्यतिरेकात्मक संबंध आला.

गांधीजी आणि मार्क्सवाद यांचे सैद्धांतिक पातळीवर फारसे जुळले नाही. मार्क्सवादाचे सृष्टिनिर्मितीविषयक प्रमेय द्वंद्वात्मक भौतिकवाद हे होय. ते भौतिकवादाच्या रूढ आशयापेक्षा थोडे निराळे असले तरी होते भौतिकवादीच. याउलट गांधीजी अध्यात्मवादी होते. वस्तुस्थितीच्या विश्लेषणाचा मार्क्सवादी मार्ग ऐतिहासिक भौतिक वादावर आधारलेला वस्तुनिष्ठ होता. उलट गांधीजी आत्मसाक्षात्कारवादी होते. मार्क्स आणि गांधीजी दोघेही नैतिक मूल्ये मानीत. पण नैतिकतेची मार्क्सवादी व्याख्या परिवर्तनीय आहे. साधनशुचितेला मार्क्सवादात जेवढ्यास तेवढे महत्व आहे. उलट गांधीजींची नैतिक मूल्ये बहुतांशी हिंदुधर्मपंथांनी आणि अंशतः ख्रिश्चन धर्माने संस्कारलेली. ती तुलनेने अपरिवर्तनीय आहेत. साधनशुचिता हा तिचा गाभा आहे. आंदोलने चालवण्याची गांधींजीची पद्धत व संघटना बांधण्याची गांधीजींची पद्धत ही मार्क्सवादाच्या एतद्विषयक पद्धतीपेक्षा, शैलीपेक्षा भिन्न आहे. तात्पर्य, मार्क्सवाद आणि गांधीवाद यात विसंवाद अधिक आहे.

मार्क्सवाद आणि स्वा. सावरकर यांचा संबंध दुहेरी होता. १९३६ मध्ये 'स्त्री' मासिकात लिहिलेल्या एका लेखात त्यांनी मार्क्सवादाला समग्र जीवनदर्शन मानले. प्रौढावस्थेतील सावरकरांची मानसिकता भौतिकवादी होती.

१९३६-३७ या काळात लिहिलेल्या लेखांमधून त्यांनी मार्क्सवादी भूमिकेप्रमाणे भांडवलशाहीला विरोध केला. विषम वितरणपद्धतीला विरोध केला. पण हिंदुमहासभेच्या राजकारणासाठी त्यांनी पुढे वर्गसमन्वयवादी भूमिका घेतली. उलट मार्क्सवाद वर्गसंघर्षवादी आहे. जर कोणी मार्क्सवादी, वर्गसमन्वयाची किंवा खाजगीकरणाची भाषा बोलत असतील तर ते मार्क्सवादापासून दूर गेलेत असे समजावे. सावरकर तेवढ्या संदर्भात मार्क्सवादापासून वेगळे झाले. पण मार्क्सवादाचे सावध सहानुभूतीदार ही त्यांची भूमिका शेवटपर्यंत टिकली.

भांडवलशाही विरोध या मार्क्सवादी मुद्याशी डॉ. आंबेडकरांची जवळीक होती. राष्ट्रीयीकरण, सामुदायिकीकरण यांना त्यांचा पाठिंबा होता. पुढे बाबासाहेबांचा प्रवास बुद्धधर्माकडे सुरू झाला. त्यातही आपण केलेले धम्मचक्रपरिवर्तन हे साधन की साध्य याचे तपशीलवार विवेचन करण्याची संधी नियतीने बाबासाहेबांना दिली नाही. त्यामुळे त्यांच्या मार्क्सवादविषयक संबंधावर परस्परविरोधी भाष्ये करण्याची संधी भाष्यकारांना मिळाली.

या तीन महापुरुषांपेक्षा नेताजी सुभाषचंद्र बोसांचे मार्क्सवादाशी असलेले संबंध, वेगळ्या प्रकारचे होते. कारण सुभाषचंद्रांच्या व्यक्तिमत्वाचे काही वेगळे विशेष आहेत. ते चिंतन करीत. पण सावरकर आंबेडकरांप्रमाणे त्यांच्या चिंतनाला ग्रंथरूप शिस्त नाही. त्यांनी योजनाबद्ध ग्रंथलेखन केले नाही. 'इंडियन स्ट्रगल' नावाचे त्यांचे एक पुस्तक एकोणीसशे चौतीसमध्ये प्रसिद्ध झाले. एकोणीसशे वीस ते एकोणीसशे चौतीस या काळातील भारतीय स्वातंत्र्यलढ्याचा धावता आढावा त्यात आहे. पण त्यांचे स्वतःचे अन्य चिकित्सक ग्रंथलेखन त्यांच्या हयातीत प्रसिद्ध झाले नाही. त्यांची भाषणे, पत्रे, संदेश, वर्तमान पत्रातील लेखन, आझाद हिंद फौजेचा जाहीरनामा, आझाद हिंद फौजेचा प्रमुख म्हणून त्यांनी वेळोवेळी काढलेले फतवे इ. चे संकलन करून त्यांचे खंड त्यांचे बंधू शरश्चंद्र बोस, पुतणे डॉ. शिशिरकुमार बोस यांनी प्रसिद्ध केले. त्यावरून सुभाषवादाची मांडणी अभ्यासकाला प्रयत्नपूर्वक करावी लागते. मार्क्सवादाच्या तुलनेत सावरकरवाद, आंबेडकरवाद, गांधीवाद इ. ची मांडणी करताना अभ्यासकांना अल्पस्वल्प यश मिळते. तितके सुभाषवादाच्या मांडणीत मिळेलच असे नाही. तरीही तसे तुरळक प्रयत्न झाले. मराठीत असा पहिला प्रयत्न कै. ग. त्र्यं. माडखोलकरांनी केला. १९४६ मध्ये त्यांचे 'सुभाषवाद' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. हे पुस्तक म्हणजे नागपूरच्या दै. तरुण भारत मध्ये ५८ ते

२५ नोव्हें. १९४५ या काळात लिहिलेल्या सात अग्रलेखांचे संकलन आहे. माडखोलकरांच्या सुभाषवादाच्या मांडणीला गांधीवादाच्या खंडनाचे निमित्त आहे. त्यातही या सात लेखात माडखोलकरांनी गांधीवादाच्या राजकीय आंदोलनाच्या मांडणीवर भरही दिला. त्यातही चलेजावचा ऑगस्ट क्रांतीवाद म्हणजे गांधीवाद नि त्या गांधीवादाच्या तुलनेत 'सुभाषवादा'ची मांडणी माडखोलकरांनी केली. माडखोलकरांच्या सुभाषवादाची आठ कलमे आहेत. प्रस्तुत अभिवादन ग्रंथात माडखोलकरांचे हे लेख पुनर्मुद्रित केले आहेत. त्यावरून माडखोलकरांनी सांगितलेली सुभाषवादाची अष्टसूत्री वाचकांच्या ध्यानात यावी. तरीही प्रस्तुत लेखकाच्या प्रमेयांची पार्श्वभूमी म्हणून या अष्टतत्त्वांचा पुनरुच्चार येथे संक्षेपाने करीत आहे. (१) हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी ब्रिटिश साम्राज्यशाहीशी प्रत्यक्ष सामना. (२) त्यासाठी राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय अशा दोन आघाड्या (३) त्यासाठी प्रतिसरकारची स्थापना (४) प्रतिसरकारचे स्वतंत्र सैन्य (५) दुसऱ्या महायुद्धाच्या वस्तुस्थितीनुसार स्वतःचे तात्कालिक शत्रूमित्र ठरवणे. (६) श्रमजीवी बहुजनसमाजाची संघटना बांधणे (७) परकीय मदतनीसांना मर्यादित अधिकार (८) भविष्यात हिंदुस्थानात लोकशाहीची स्थापना.

माडखोलकरांनी सुभाषवादाच्या राजकीय प्रतिकारात्मक अंशावर भर दिला. मात्र सुभाषबाबूंच्या व्यक्तिमत्त्वाचे युद्धाचा सरसेनापती, आझाद हिंद शासनाचा प्रधानमंत्री, कॉंग्रेसचा एक संघटक, भारतीय आध्यात्मिक संस्काराचा वारस, असेही पैलू आहेत. मार्क्सवाद आणि सुभाषवाद यांचा संबंध तपासताना हे पैलू नजरेआड करून चालणार नाही.

मार्क्सवाद हे जीवनदर्शन आहे. जीवनदर्शनात सृष्टिनिर्मिती-विकास, मानवसमाजनिर्मिती-विकास, सामाजिक संबंध, व्यक्तिगत तसेच सामाजिक ध्येय, आचारधर्म, मूल्ये या गोष्टी येतात. मार्क्सवादात या सर्व गोष्टी आहेत. इतर जीवनदर्शनांपेक्षा त्या वैशिष्ट्यपूर्ण आणि स्वतंत्र आहेत. सुभाषवादात अशी विशिष्टता नाही. सुभाषचंद्रांचा तसा दावाही नाही. पण त्याचा अर्थ त्यांची तात्त्विक चिंतनक्षमता कमी होती असा नाही. आध्यात्मिक विचारांच्या संदर्भात त्यांच्या मनात सतत संघर्ष सुरू होता. उमलत्या तारुण्यात आईला लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात, "मला परमेश्वराचं अस्तित्व जाणवतं म्हणून मी त्याची प्रार्थना करतो. पशूंना ते जाणवत नाही. हा माणूस आणि जनावर यातला फरक

आहे." (येथे संदर्भ - य. दि. फडके, कहाणी सुभाषचंद्रांची, भाग १ पृ. १४)

पूर्ववयातील त्यांची ही आस्तिक्यबुद्धी शेवटपर्यंत टिकली. तरीही गूढवाद आणि मायावाद याबद्दल त्यांनी नेहमी नापसंती व्यक्त केली. महाविद्यालयीन जीवनात लिहिलेल्या काही लेखात त्यांनी वेदान्ताबद्दल शंका घेतली. जडवादाचे समर्थन केले. स्वतःला बुद्धिप्रामाण्यवादी म्हणवून घेतले. पण त्यानंतरच्या काळात ते हिमालयात परमेश्वराच्या - गुरूच्या शोधात जाऊन आले. मात्र तथाकथित संन्यासमार्गातही चातुर्वर्णीय अडथळे आहेत याची त्यांना प्रचिती आली.

संन्यास की संघर्ष या पर्यायात त्यांनी संघर्ष पत्करला. निवृत्ती की प्रवृत्ती या पर्यायात त्यांनी प्रवृत्ती पत्करली. योगी अरविंद की विवेकानंद या तुलनेत त्यांच्या मनाने विवेकानंदांच्या बाजूने कौल दिला. मात्र शंकराचार्यांच्या मायावादाचा योगी अरविंद यांनी अस्वीकार केला. कर्मयोगाचा पुरस्कार केला यामुळे अरविंद घोषांविषयी त्यांच्या मनात आदर होता. तरीही अरविंद बाबू पाँडेचरी आश्रमात का राहतात? भारतीय राजकारणात सक्रीय का होत नाहीत? असा प्रश्न सुरवातीच्या काळात सुभाषबाबूंना पडायचाच. मात्र अरविंदांचा आश्रम हा भारतीय क्रांतिकारकांचे एक प्रेरणास्थान आहे याची अनुभूती पुढे सुभाषबाबूंना आली. त्यामुळे निवृत्तीच्या आधारावर प्रवृत्ती हीच त्यांची आध्यात्मिक बैठक झाली. म्हणून एकीकडे ते कलकत्त्याच्या घरातून वेषांतर करून पलायन करतात. दुसरीकडे त्या पलायनापूर्वी भगवद्गीतेचे पठन, मनन, चिंतन करतात.

सुभाषबाबूंच्या वेगवान आयुष्यात त्यांना चिंतनाला सवड मिळाली ती त्यांच्या अल्पकालीन कारावासाच्या किंवा आजारपणाच्या काळात. मात्र अशा काळात सृष्टिनिर्मितीच्या रहस्याचे विचार जेव्हा जेव्हा त्यांच्या मनात येत तेव्हा तेव्हा अंतिमतः त्यांचा मानसिक कल ईश्वर मानण्याकडे असे. विरोधाविकासवादी जडवादाची त्यांना कधीही खात्री पटली नाही.

मात्र मार्क्सवादाच्या इतर अंगांविषयी त्यांना आकर्षण होते. त्या आकर्षणाचे समर्थनात रूपांतर झाले. सुभाषवादात मार्क्सवादाची अनेक उद्दिष्टे समाविष्ट झाली. त्या आकर्षणाचे आविष्कार विद्यार्थीदशेत लिहिलेल्या एका पत्रात दिसतात. ते म्हणतात, 'शेतकरी, धोबी, चांभार, भंगी असे क्षुद्र आणि हीनदीन समजले जाणारे लोकच अखेरीस आपल्या हिंदुस्थानची प्रगती घडवून

आणणार आहेत, असे स्वामी विवेकानंद म्हणत असत. त्यांचे हे म्हणणे पूर्णतया खरे आहे. स्वसामर्थ्याविषयी जागृत असलेल्या लोकसमुहाची शक्ती केवढे विराट कर्तृत्व करून दाखवते हे पाश्चिमात्य जगाने दाखवून दिले आहे. या असामान्य कर्तबगारीचे अगदी ताजे आणि लखलखीत उदाहरण म्हणजे आजचा रशिया. जगातले पहिले समाजसत्तावादी प्रजासत्ताक प्रस्थापित करण्याची किमया या देशाने नुकतीच करून दाखवली." (येथे संदर्भ नेताजी - वि. स. वाळिंबे, पृ. १२)

सुभाषबाबूंचा राजकीय प्रवास देशबंधू चित्तरंजन दास यांच्या प्रेरणेने सुरू झाला. देशबंधू दास आणि मोतीलाल नेहरू यांनी १ जाने १९२६ रोजी स्वराज्य पक्षाच्या स्थापनेची घोषणा केली. त्या पक्षाच्या बंगाली मुखपत्राच्या 'बांगलार कथा'च्या संपादकपदी आणि त्याच पक्षाच्या 'फॉरवर्ड' या इंग्लीश वर्तमानपत्राच्या व्यवस्थापकपदी सुभाषबाबूंची नियुक्ती झाली. पुढे देशबंधूंच्या निधनानंतर सुभाषबाबू कॉंग्रेसच्या राजकारणात अधिक सक्रीय झाले. पण तेथेही गांधीजी आणि गांधीवाद यांच्याशी त्यांचे जुळले नाही. रशियन राज्यक्रांतीच्या प्रभावाने कॉंग्रेसला डावे म्हणजे अंशात्मक मार्क्सवादी वळण देण्याचा सुभाषबाबूंनी प्रयत्न केला. युवक कॉंग्रेसचे सदस्य त्यांना शांतिसैनिक म्हणून नको होते. क्रांतिसैनिक म्हणून हवे होते. कॉंग्रेसमध्ये असतानाही त्यांचा क्रांतिकारकांशी संबंध होता. १९२९ च्या मीरत अभियोगातील कम्युनिस्ट क्रांतिकारकांच्या बचावासाठी त्यांनी प्रयत्न केले. भगतसिंहाच्या हिंदुस्थान सोशॅलिस्ट रिपब्लिक आर्मीच्या निर्देशाने सूर्यसेनने बंगालमधील चित्तगाव येथे शासकीय खजिना लुटण्याचा जो प्रयत्न केला त्यात सुभाषचंद्रांची अप्रत्यक्ष साथ होती. याच काळात त्यांना मानवेंद्र रॉय यांनी कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या एका परिषदेसाठी आमंत्रित केले. समकालीन वातावरणात कॉंग्रेस आंदोलनांबरोबरच मार्क्सवादी भारलेपण होते. त्या भारलेपणाचा सुभाषबाबूंच्या व्यक्तिमत्वावर इतका परिणाम झाला की एका आजारपणात युरोपमध्ये रहावे लागले असताना त्यांनी तेथेही 'साम्यवादी संघ' नावाची एक संघटना स्थापन केली. लंडनमध्ये प्रत्यक्षात उपस्थित राहू न शकलेल्या पण लिहून पाठवलेल्या १०-६-१९३३ रोजी केलेल्या एका भाषणात सुभाषबाबू म्हणतात की, "एकोणीसाव्या शतकात मार्क्सवादी तत्त्वज्ञानाच्या रूपाने जर्मनीने जागतिक विचारधनामध्ये लक्षणीय भर घतली. श्रमिक क्रांती घडवून आणून रशियाने विसाव्या शतकामध्ये नवा आणि निराळा मार्ग दाखवला. जागतिक संस्कृतीला

असेच आणखी एक वैचारिक परिणाम देण्याचं कार्य या पुढच्या काळात हिंदुस्थानला करावं लागणार आहे" (येथे संदर्भ नेताजी - वि. स. वाळिंबे पृ. १८९)

ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या कलकत्ता अधिवेशनात ४ जुलै १९३१ मध्ये केलेल्या भाषणात सुभाषबाबूंनी मार्क्सवादाला सशर्त समर्थन दिले. ते म्हणाले, "जगातील इतर राष्ट्रांप्रमाणेच भारताचे भविष्य देखील समाजवादाशी निगडित आहे. परंतु भारतातील समाजवाद हा थोडा निराळा असेल. जगातील सर्व राष्ट्रांना तो पथप्रदर्शक राहील." (सुभाषने कहा था - संपादक डॉ. गिरिराज शरण, प्रतिभा प्रतिष्ठान, नवी दिल्ली, १९८२ पृ. १४१)

तत्पूर्वी, रंगपूर येथे ३० मार्च १९२९ रोजी केलेल्या एका भाषणात सुभाषबाबूंनी 'सुभाषवादा'ला मान्य असलेला मार्क्सवाद पुढील शब्दात मांडला. "... समाजवाद की धारणा इस देश के लिये कोई नई बात नहीं है.... किसी भी विचारधारा को त्रुटिरहित और पूर्णतः सही मानना उचित नहीं है। हमें नहीं भूलना चाहिए की कार्ल मार्क्स के मुख्य अनुयायी रूस ने भी इस विचारधारा का अंधानुकरण नही किया।" (कित्ता पृ. १४२)

उपरोक्त भाषणात सुभाषबाबूंनी खाजगी कारखानदारीचे निसटते समर्थन केले. पण त्याच सुभाषबाबूंनी १९३८ मध्ये हरिपुरा कॉंग्रेसच्या अध्यक्ष पदावरून केलेल्या भाषणात मात्र राष्ट्रीयीकरणाचे निःसंदिग्ध समर्थन केले. ते म्हणतात, "आमच्या देशातील मुख्य प्रश्न दारिद्र्यनिर्मूलन हा आहे. त्यासाठी एकमेव मार्ग समाजवादी वितरणव्यवस्था हाच आहे." (कित्ता पृ. १४१) याच अधिवेशनात सुभाषचंद्रांनी पंडित नेहरूंच्या अध्यक्षतेखाली एक स्वतंत्र नियोजनसमिती नेमली. या समितीने कॉंग्रेससमोर दोन कलमी कार्यक्रम ठेवला. (१) परकीय भांडवलाचे आणि देशातील मूलभूत उद्योगांचे राष्ट्रीयीकरण (२) जमीनदारी नष्ट करून कसेल त्याची जमीन.

या काळात त्यांनी केलेल्या आणखी एका भाषणातून 'सुभाषवादा'ची वैशिष्ट्ये आकळतात. 'स्वराज्य यंग मेन्स ट्रेनिंग इन्स्टिट्यूट' बॉम्बे, येथे त्यांनी इंग्लिशमध्ये भाषण केले. त्या भाषणाचा अनुवाद श्री. जांबुवंतराव धोटे संपादित बलिदान नियतकालिकाच्या जाने. १९७३ च्या सुभाष विशेषांकात प्रसिद्ध झाला. 'क्रांती म्हणजे काय?' असा त्या भाषणाचा विषय होता. या भाषणात मार्क्सवादाच्या 'रक्तरंजित वर्गसंघर्ष' या प्रमेयानुकूल भूमिका आहे. 'रक्तपात

हा क्रांतीचा एक आविभाज्य घटक आहे' असे ते मानतात. पुढे म्हणतात, "पारतंत्र्याच्या दीर्घ कालावधीमुळे भारतीय या बाबतीत (रक्तपाताच्या) फार मागे राहिले. त्याग, बलिदान, रक्तपात या गोष्टीची त्यांना काही अंशी भीती वाटत होती. म्हणून क्रांतीचा विचार त्यांना मानवत नव्हता. उत्क्रांतीच्या मार्गानेच इप्सित गाठायचे ही विचारसरणी पुढे आली. परंतु एक काळ असा येतो की त्यावेळी क्रांतीसारखा जहाल मार्ग अधिक सोयीस्कर व आवश्यक ठरतो."

सुभाषवादात राजकीय क्रांतीला म्हणजे तत्कालीन संदर्भात भारताच्या स्वातंत्र्याला अग्रक्रम आहे. पण सामाजिक आर्थिक क्रांतीलाही सुभाषवादात स्थान आहे. कारण सार्वजनिक जीवनात उतरताक्षणीच सामाजिक विषमतेची प्रचिती सुभाषबाबूंना आली होती. देशबंधू चित्तरंजनदास यांना लिहिलेल्या एका पत्रात सुभाषबाबूंनी म्हटले होते की, "दलित समाजाकडे आपले अद्याप म्हणावे असे लक्ष गेलेले नाही. आपल्या उदासीन वृत्तीमुळेच मद्रास प्रांतातील ब्राह्मणेतर समाज इंग्रज सरकारचा समर्थक बनला आहे. हिंदुस्थानच्या स्वराज्यासंबंधी या समाजाला आस्था वाटू नये, याला आपणच जबाबदार आहोत." (येथे संदर्भ नेताजी वि. स. वाळिंबे, पृ. ३७)

'क्रांती म्हणजे काय?' या भाषणात जातीय विषमतेच्या संदर्भांना आर्थिक विषमतेची म्हणजे वर्गीय भानाची जोड मिळाली. नेताजी म्हणतात, "परकीय सत्तेला हाकून लावण्यातच क्रांतीची इतिकर्तव्यता मानली तर भारतात पुन्हा नवीन राज्ययंत्रणा प्रस्थापित करण्यासाठी पुन्हा दुसरी क्रांती करावी लागेल. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर ज्यांनी स्वातंत्र्याकरिता कोणतेच मूल्य दिले नाही, कदाचित तेच भारताचे शासक बनतील. अशा शासकांचे शासन साहजिकच स्वार्थाने बरबटलेले असणार. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपल्या देशाचे भारतीयांच्या प्रतिक्रियावादी कारवायापासून संरक्षण करावेच लागणार आहे."

सुभाषबाबूंनी अप्रत्यक्षपणे स्वदेशी भांडवलदारांवर वरील विधानात हेत्वारोप केला आहे. कारण नंतर ते स्पष्टच म्हणतात, "क्रांतीपासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न श्रीमंतांनी व लक्षाधीशांनी अगदी हेतुपुरस्सर केला. गरिबांनी क्रांतीचे समर्थन करण्याचे कारण म्हणजे, आपला अभ्युदय क्रांतीच्या माध्यमातूनच होऊ शकतो अशी जाणीव त्यांच्या ठिकाणी निर्माण झाली. अशिक्षितपणामुळे त्यांची वैचारिक पातळी जरी अतिसूक्ष्म व प्रगल्भ नसली तरी क्रांतीच्या पुष्ट्यर्थ त्यांची मानसिक तयारी झाली होती. श्रीमंत वर्ग क्रांतीपासून

अलिप्त असण्याचे कारण म्हणजे त्यांची संपत्ती व मालकी हक्क होय. क्रांतीमुळे आपल्या या खास अधिकारांना जबरदस्त धोका आहे हे जाणून त्यांनी क्रांतीला कधीच दुजोरा दिला नाही. क्रांतीपासून ते दोन हात दूरच राहिले. म्हणून क्रांतीचे खरे आधार स्वाभाविकच गरीब आणि अशिक्षित लोकच बनले."

सुभाषवाद हा फेबियन समाजवाद नाही. तो रॉयवाद नाही. तो गांधीवादी समाजवाद नाही. जयप्रकाश, अच्युतराव पटवर्धन, साने गुरुजी यांच्या कॉंग्रेसी समाजवादापेक्षा तो थोडा वेगळा आहे. युरोपातील सोशल डेमोक्रॅटसपेक्षाही तो वेगळा आहे. 'लोकशाही समाजवादा'पेक्षा हुकूमशाही समाजवादाची डिक्टेटरशिप ऑफ प्रोलटरिएटची - संकल्पना नेताजींना कधी कधी अधिक मानवली. 'इंडियन स्ट्रगल' या ग्रंथात ते लिहितात, " जर आम्हाला समाजवादी अर्थव्यवस्था हवी असेल तर समाजवाद पाश्चात्य लोकशाही धर्तीवर प्रस्थापित करून चालणार नाही. समाजवादी पुनर्रचना केवळ हुकुमशाहीमुळेच साधू शकते. परंतु ही हुकुमशाही व्यक्तीची किंवा विशिष्ट दलाची नको तर ती सामान्य जनतेची असावी." (येथे संदर्भ बलिदान १९७३ जाने/पृ. ३७)

याच भूमिकेनुसार पुढे नागपूरला फॉरवर्ड ब्लॉकच्या अधिवेशनात त्यांनी, 'सर्व सत्ता जनतेच्या हातात' असा नारा दिला.

१८ जून १९४० रोजी केलेले ते भाषण अतिशय महत्त्वाचे आहे. कॉंग्रेसपासून फॉरवर्ड ब्लॉक हा राजकीय पक्ष वेगळा का झाला? याची निःसंदिग्ध मीमांसा त्या भाषणात आहे. इतर डावे पक्ष आणि फॉरवर्ड ब्लॉक यांच्यातील वेगळेपणही सांगितले आहे. सुभाषबाबू म्हणतात, " १९२०-२१ मध्ये कॉंग्रेसमध्ये डाव्या विचारसरणीची मंडळी शिरली. या मंडळींनी काही काळ कॉंग्रेसचे नेतृत्व केले. परंतु आता हा मंडळी कॉंग्रेसमध्ये दिशादर्शक तर राहिली नाहीत. पण ती क्रांतिकारक सुधारणावादीही राहिली नाहीत. अशा वेळेस साम्राज्यशाहीविरोधी पुरोगामी आघाडी स्थापन करण्यासाठी कॉंग्रेसमधून बाहेर पडणे अनिवार्य आहे. डाव्या मंडळींनी, कम्युनिस्टांनी सुद्धा किसानसभेसारख्या लढाऊ सर्वहारांच्या संघटनांशी द्रोह केला. स्वामी सहजानंद सरस्वतीसारख्या कम्युनिस्ट नेत्याने, ज्याने उत्तर भारतात शेतकऱ्यांची प्रभावी संघटना बांधली, त्याला देखील कम्युनिस्टांनी एकटे पाडले. स्वामी सहजानंद सरस्वती आज तुरुंगात खितपत आहेत आणि कम्युनिस्ट कॉंग्रेसच्या पंखाखाली आहेत. कम्युनिस्टांना अशी भीती का वाटावी की आपण कॉंग्रेसच्या बाहेर पडलो तर

एकटे पडू? खरे तर आज चिकाटीने, आत्मविश्वासाने, जिद्दीने ब्रिटिश साम्राज्यशाहीशी संघर्ष करणे आवश्यक आहे. मग असा संघर्ष काँग्रेसला आवडो अथवा न आवडो! त्या संघर्षाचे ब्रीदवाक्य आहे, सर्व सत्ता जनतेच्या हातात." (आशयरूप भाषांतर प्रस्तुत लेखकाचे. मूळ संदर्भ - कम टू नागपूर : ए हिस्ट्री इज बॉन, लोकमत प्रकाशनी, हेमंत बाबू भवन, २१९ सी चित्तरंजन दास एव्हेन्यू, कलकत्ता ७०० ०१२)

साधारणपणे सुभाषवादाची संघटनात्मक, संघर्षात्मक, राजकीय सामाजिक आकलनात्मक भूमिका मार्क्सवादाला जवळची आहे. परंतु भारतीय संचितांवर सुभाषबाबूंचा इतका काही विश्वास आहे की ते मार्क्सवादाला त्याच्या मूळ रूपात स्वीकारायला मधूनमधून धक्कादायक नकार देतात. उदा. कधी ते म्हणतात, " भारताने प्रतिपादलेल्या समाजवादात एखादे वैशिष्ट्य आणि एखादी मूलभूत कल्पना असणे शक्य आहे, आणि संपूर्ण जगाच्या कल्याणासाठी त्याची नितांत आवश्यकता आहे. हा समाजवाद कार्लमार्क्सच्या ग्रंथातून जन्माला आला नाही. तर त्याचे मूळ भारतीय तत्त्वज्ञानात आणि भारतीय संस्कृतीत आहे." (संदर्भ बलिदान जाने/७३ पृ. ३) कधी ते म्हणतात, "इतिहासाचा भौतिक अर्थ लावणे हा कम्युनिस्टांनी सर्वात महत्त्वाचा मानलेला मुद्दा भारतात कधीही स्वीकारला जाणार नाही. फार काय तर ज्या भारतीयांचा कम्युनिस्ट प्रणित अर्थव्यवस्थेकडे कल आहे. ते सुद्धा या तत्त्वाशी सहमत होणार नाहीत." (येथे संदर्भ बलिदान पृ. ११४) तर ज्या आपल्या Indian struggle या पुस्तकात त्यांनी एके ठिकाणी कामगारवर्गीय हुकुमशाहीचा पुरस्कार केला त्याच पुस्तकात दुसऱ्या ठिकाणी त्यांनी असेही लिहिले की, "रशियातील या पूर्वीच्या धर्मसत्ता (church) आणि राजसत्ता (state) यांच्या निकटसंबंधामुळे व संघटित धर्मसत्तेच्या अस्तित्वामुळे रशियन साम्यवाद पूर्णपणे नास्तिक व धर्मविरोधी आहे. उलटपक्षी, भारतात असे नसल्यामुळे, भारतात जनमत धर्माविरुद्ध मुळीच नाही." (कित्ता पृ. ११५)

आझाद हिंद सेनेचा सरसेनापती व आझाद हिंद सरकारचा पंतप्रधान म्हणून नेताजींच्या जीवनाचा वेगळा कालखंड सुरू झाला. त्यांना कलकत्याहून भारतातून पळून जाण्याला भगतराम तलवार आणि चीमा या दोन कम्युनिस्टांनी मदत केली. आंतरराष्ट्रीय राजकारणात साध्यासाठी नेताजींचा अग्रक्रम रशियन साम्यवादी राजवट हाच होता. त्या काळात लेनिन जिवंत असता तर कदाचित

नेताजींना साह्य मिळाले असते. पण स्टॅलिनमुळे ते मिळू शकले नाही. सुभाषवाद आणि मार्क्सवाद यांच्यातील धोरणभिन्नतेला हा स्टॅलिनचा असहकार अंशतः तरी कारणीभूत आहे. कदाचित आझाद हिंद सेनेच्या जाहीरनाम्यात कोणत्याही साम्यवादी तत्त्वाचा त्यामुळेच प्रवेश झाला नसावा. तरीही नेताजींनी, दुसऱ्या महायुद्धात जपान पराभूत झाल्यानंतर व आझाद हिंदसेनेची पिछेहाट झाल्यानंतर राखेतून पुन्हा उठण्यासाठी रशियात जायचाच विचार केला होता असे संशोधकांचे मत आहे. अर्थात गृहितकांना मूल्यांकनामध्ये गौण स्थान असते.

त्यामुळे सुभाषवाद आणि मार्क्सवाद या दोहोंचेही एकमेकांविषयी संबंध स्वीकार नकाराचे होते हेच वस्तुनिष्ठ सत्य आहे.

• •

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

# नेताजी : छोट्या मोठ्या आठवणी

**राजेंद्र पटोरिया**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

लहानपणापासून सुभाषबाबूंना साधेपणा आवडायचा. श्रीमंत कुटुंबातील असूनही अंगावर एक धोतर तेवढे नेसायचे. जमिनीवर झोपायचे. आग ओकणारा उन्हाळा असो, की हुडहुडी आणणारा हिवाळा असो लहानगा सुभाष नेहमी नुसत्या फर्शीवर झोपायचा. आईला त्याला तसा झोपलेला पाहून भरून यायचे. ती त्याल उठवायची. पलंगावर झोपवायची. सुभाष नाखुषीने पुटपुटायचा, "आपले प्राचीन ऋषीमुनी तर नुसत्या जमिनीवरच झोपायचे."

* * *

उच्च शिक्षणासाठी सुभाषचंद्र इंग्लंडला गेले. तेथे त्यांनी पाहिले की तेथील लोक निरोगी, समाधानी आणि सुखी आहेत. गावे स्वच्छ आहेत. लोकांचे कपडे स्वच्छ आहेत. जेवण सकस आहे. भोवताली भिकारी नाहीत. शिष्टाचार तर त्यांच्या रोमारोमात इतका भिनला आहे की नोकरानेही आपले काम केले तर लहानसा मुलगा देखील त्याला धन्यवाद द्यायला विसरत नाही. सुभाषबाबूंनी हे सर्व अनुभवले तेव्हा त्यांच्या मनात विचार आला की यांच्या सुखीसंपन्न आणि शिष्टाचारसंपन्न संस्कृतीचे एकमेव कारण त्यांचे स्वातंत्र्य!

* * *

कलकत्त्यात एकदा आलेल्या भयंकर कॉलऱ्याच्या साथीमध्ये सुभाषचंद्र बोस आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी जनतेची विशेषतः झोपडपट्टीवासियांची खूप सेवा केली. एका झोपडपट्टीतल्या हैदर नावाच्या दादाला हा सेवाभाव म्हणजे श्रीमंत मुलांची तात्पुरती फॅशन वाटायचे. तो या किशोरांची अवहेलना करायचा. पण एकदा हैदर बाहेरून स्वतःच्या झोपडीत शिरला तेव्हा त्याच्या लक्षात आले

की आपल्याच कुटुंबाला कॉलऱ्याने घेरलेय नि सुभाष व त्याचे सहकारी जीव ओतून आपल्या कुटुंबियांची सेवा करीत आहेत. हैदरला ते पाहून इतका पश्चात्ताप झाला की तो झोपडीच्या एका कोपऱ्यात तोंड झाकून ओक्साबोक्शी रडायला लागला.

* * *

सुभाषबाबू दुर्गोत्सवात अतिशय रमायचे. फेब्रुवारी १९२६ मध्ये त्यांनी अलीपूर कारावासात दुर्गोत्सव करायचे ठरविले. तुरुंगाधिकाऱ्यांनी मनाई केली तेव्हा त्यांनी अन्नसत्याग्रह केला. शेवटी आपली मागणी मान्य करवून घेतली. धूमधडाक्याने उत्सव साजरा केला.

* * *

१९२८ च्या डिसेंबर महिन्यात भरलेल्या कॉंग्रेस अधिवेशनात सुभाषबाबूंनी पथसंचलन आयोजित केले. ते स्वतः एका सेनाधिकाऱ्याच्या पेहेरावात घोड्यावरून निघाले. त्यांना नुसते पाहायला कलकत्त्याच्या रस्त्यारस्त्यावर हजारो लोक जमा झाले.

* * *

सुभाषबाबूंचे कौटुंबिक परिवारातले टोपणनाव ‘राजा’ होते. खरोखरच, भविष्यात ते कोटीकोटी भारतवासियांच्या हृदयसिंहासनावर आरूढ झालेले ‘सम्राट’ होते.

* * *

सुभाषबाबू राष्ट्रभाषा हिंदीचे कट्टर समर्थक होते. ‘इंडियन स्ट्रगल’ हे पुस्तक त्यांनी युरोपात लिहिले. ते पुस्तक १९३५ मध्ये ब्रिटिश शासनाने जप्त केले. या पुस्तकात सुभाषबाबूंनी राष्ट्रभाषा हिंदीचे समर्थन केले. आझाद हिंद शासनाचे नि आझाद हिंद सेनेचे सर्व आदेश त्यांनी हिंदीत रूढ केले.

* * *

१९४० ची गोष्ट. फॉरवर्ड ब्लॉकच्या एका संघटनात्मक कार्यक्रमासाठी प्रयागचे फॉर्वर्ड ब्लॉक सचिव श्री. पं. पद्मकांत मालवीय यांनी सुभाषबाबूंना आमंत्रित केले. प्रयागच्या वास्तव्यात त्यांचा एक कार्यक्रम प्रयागच्या बंगाली समाजात ठेवला गेला. कार्यक्रमाला जाताना पं. मालवीयांना सुभाषबाबूंनी विचारले, “मला तिथे कोणत्या भाषेत भाषण द्यावे लागेल ?”

पं. मालवीय उत्तरले, “तिथे सगळे श्रोते बंगाली आहेत. तुम्ही बंगालीत

बोललेले बरे. ते देखील तुमच्याकडून हीच अपेक्षा करतील."

सुभाषबाबू म्हणाले, " हे काही योग्य नाही. वर्षानुवर्षे ही बंगाली मंडळी इथे राहतात. त्यांच्या अनेक पिढ्या इथे वावरल्या. असं असूनही ही मंडळी हिंदी शिकली नसतील, हिंदी बोलत नसतील तर ते बरोबर नाही. ते काही नाही. मी तिथे बंगालीत बोलणार नाही. हिंदीत बोलेन."

* * *

नेताजी सुभाषचंद्र बोस आणि भगतसिंह घनिष्ठ मित्र होते. भगतसिंह आपल्या क्रांतिकारक योजना बनवताना सुभाषबाबूंचा समादेश घेत. सरदार भगतसिंहांना भेटायला सुभाषबाबू लाहोर तुरुंगात गेले. भगतसिंहांना फाशीपासून वाचवण्याची एक योजना देखील सुभाषबाबूंनी केली होती. पण भगतसिंहांनी तिच्याबद्दल फारसा उत्साह दाखवला नाही. ते म्हणाले,

"जब से सुना है मरने का नाम जिंदगी है
सर से कफन लपटे कातील को ढुंढते है।"

* * *

सुभाषचंद्र बोसांना 'नेताजी' हे अभिदान केव्हापासून लागले? वस्तुस्थिती अशी आहे.

जर्मनीत हिटलरशी त्यांची पहिली भेट झाली. तेव्हा सुभाषबाबूंचे स्वागत करताना हिटलर म्हणाला, "मी फ्राईज इण्डीशे/कुहरर चे जर्मनीत स्वागत करतो."

जर्मनीत 'फ्राईज इण्डीशे कुहरर' या शब्दाचा अर्थ, 'स्वतंत्र हिंदुस्थानचा नेता' असा होतो. तेव्हापासून सुभाषबाबू 'नेताजी' झाले. जर्मनीत 'आझाद हिंद संघ' या संघटनेच्या घटनेत असे कलम होते की सुभाषबाबूंना 'नेताजी' म्हणावे. परस्परांना अभिवादन करताना 'जयहिंद' म्हणावे. हिटलर सुभाषबाबूंना तीस कोटी भारतीय जनतेचा नेता मानायचा. सुभाषबाबूंवर त्याचे इतके प्रेम होते की, जपानने जर सुभाषबाबूंना सहकार्य नाकारले तर हिटलर तीनशक्ती संधि मोडायलाही सिद्ध होता.

* * *

आझाद हिंद सेनेसाठी एक (बँक) अधिकोष उघडण्याचा विचार होता. या संदर्भात एक कोट्याधीश मुसलमान सद्गृहस्थ नेताजींना येऊन भेटले. म्हणाले, "अधिकोष (बँक) उघडण्यास किती रक्कम हवी?"

"कमीत कमी पन्नास लाख रुपये हवेत" नेताजींनी उत्तर दिले.

तो लगेच म्हणाला, "हे घ्या. तीस लाख आता घ्या. उरलेले वीस लाख रुपये आठवड्याभरात देतो." नेताजी कृतज्ञतेने बघत राहिले.

* * *

देवी हिराबाई नावाच्या स्त्रीने आपले दीड लाख रुपयांचे अलंकार नेताजींना दिले. वर आणखी पन्नास हजार रुपयांची रोख दक्षिणा.

* * *

एकदा नेताजींनी सभेत मिळालेल्या हाराचा लिलाव केला. त्या लिलावात बोली पाच लाखापर्यंत गेली. एका युवकाने त्याची सर्व संपत्ती नेताजींच्या पायावर घातली. नेताजी म्हणाले, " असं करू नकोस. स्वतःच्या उदरनिर्वाहासाठी काही संपत्ती ठेव" तेव्हा तो युवक उद्गारला, "नाही. मी तर आता माझे सर्व आयुष्य आझाद हिंद सेनेला वाहिले आहे."

* * *

एका प्रसंगात एका घरगड्याने आपल्या साठवलेल्या पैशातून एक फुलदाणी नेताजींना भेट दिली. नेताजींनी त्या फुलदाणीचा लिलाव केला. ती एक्कावन हजार रुपयात विकली गेली.

* * *

एकदा नेताजींची सिंगापूरला जाण्याची सिद्धता सुरू होती. ते काहीसे चिंतातूर होते. कोणीतरी धारिष्ट्य करून विचारलं, "नेताजी, आपण इतक्या काळजीत का ?"

"मला आत्ताच्या आत्ता वीस लाख रुपये आझाद हिंद सेनेसाठी हवेत. रंगूनमधल्या मंडळींकडून अगोदरच पुष्कळ धन घेतलेय. आता सिंगापूरमध्ये जाऊन बघतो काही सोय होते का ?"

असं सांगून नेताजी विमानात बसायच्या सिद्धतेला लागले. तेव्हा अगोदरच्याच गृहस्थाने नेताजींच्या हातात एक कागद ठेवला. तो पन्नास लाख रुपयांचा धनादेश होता.

* * *

२४ ऑक्टोबर १९४३ च्या रात्री बारा वाजून पाच मिनिटांनी नेताजींनी इंग्लंड आणि अमेरिका यांच्या विरुद्ध युद्धघोषणा केली.

* * *

सिंगापूरच्या कॅथभवनमध्ये ४ जुलै १९४३ रोजी झालेल्या भव्य समारंभात नेताजींना आझाद हिंद सेनेचे सर्वोच्च सेनापती म्हणून सन्मानित करण्यात आले. त्या समारंभाची सुरवात वंदेमातरम्‌नी झाली.

* * *

आझाद हिंद सेनेच्या गणवेषात, डाव्या खांद्याखालील बाहूंवर रेशमी दोऱ्याने बांधलेले तिरंगी ध्वजाचे मानचिन्ह होते. त्यावर झेपावणाऱ्या सिंहाचे चित्र काढले होते. इतिहासात टिपू सुलतानाच्या ध्वजावर देखील असेच चिन्ह होते. नेताजी म्हणायचे, "आमची सेना शत्रूच्या गंडस्थळावर सिंहाप्रमाणे झेपावते."

* * *

आझाद हिंद फौजेत 'भाईबंद' नावाचे नियतकालिक निघायचे. सेनेचे अनेक अधिकारी आणि सैनिक या नियतकालिकात लेखन करीत. त्यात सैनिकांसाठी निबंधस्पर्धेचे देखील आयोजन असायचे.

याशिवाय 'आझाद हिंद' नावाचे दुसरे एक नियतकालिक होते. या नियतकालिकात आझाद हिंद संघाच्या प्रमुख पदाधिकाऱ्यांचे लेख, नेताजींनी वेळोवेळी दिलेले आदेश, दिशानिर्देश, भारतातील राष्ट्रीय आंदोलनांची माहिती असायचे. हे नियतकालिक इंग्लिश होते. पण त्यात रोमन लिपीत लिहिलेल्या अन्य भाषांतील मजकुरांचाही समावेश होता.

* * *

नेताजींनी कधीही धार्मिक भेदभाव केला नाही. नेताजींनी जेव्हा जर्मनीतून जपानपर्यंतचा धोकादायक प्रवास केला तेव्हा त्यांच्या सोबत आबिद हुसेन होते. आझाद हिंद सेनेने रणशिंग फुंकले तेव्हा नेताजींचे दोन घनिष्ठतम सहकारी होते एम. झेड. कियानी आणि मेजर जनरल शहानवाजखान. त्यांच्या अज्ञाताच्या शेवटच्या प्रवासात त्यांच्यासोबत होते कर्नल हबीबुररहमान. नेताजींचा लिलावातील हार एक कोटी रुपयांना घेणाराही एक मुसलमान हबीब म्हणून होता.

* * *

२३ जानेवारी १९४३ रोजी नेताजींच्या वाढदिवशी मलायात त्यांची सुवर्णतुला झाली. एका वृद्ध गुजराथी महिलेने पाच सोन्याच्या विटा तराजूच्या पारड्यात टाकल्या. आणखी सोन्याची आवश्यकता होती म्हणून तेथे उपस्थित

असलेल्या अनेक महिलांनी भराभर आपल्या अंगावरचे दागिने उतरवले. नि ते पारड्यात टाकले. तरीही नेताजींच्या वजनाबरोबरीसाठी थोड्या सोन्याची आवश्यकता होतीच. तेवढ्यात स्वातंत्र्ययुद्धात हुतात्मा झालेल्या एका क्रांतिवीराची आई तिथे पोचली. तिच्या हातात आपल्या मुलाचे छायाचित्र होते. त्या छायाचित्राची चौकट सोन्याची होती. त्या माऊलीने ती चौकट तराजूत टाकली. दोन्ही पारडी समतोल झाली.

* * *

ऑक्टोबर १९४४ मध्ये नेताजींनी आघाडीवरील एका रुग्णालयाला भेट दिली. त्या रुग्णालयात त्यांना आढळले की औषधांची कमतरता आहे. इतर सोयीसवलती नाहीत. म्हणून त्यांनी मुक्कामावर परतल्यावर जिलब्या तयार करण्याचा आदेश दिला. त्या रुग्णालयात पोचवल्या. तेव्हापासून रुग्णालयातील रोग्यांसाठी ते जिलब्या देणारे डॉक्टर म्हणून प्रसिद्ध झाले.

* * *

४ जुलै १९४३ मध्ये रंगून शहरात आझाद हिंद सेनेची स्थापना झाली. त्याच रंगून शहरात की जिथे अठराशे सत्तावनच्या स्वातंत्र्यलढ्यातील अमर नायक बहादूरशहा जफरचे दफन झाले. हा एक अभावित पण विलक्षण योगायोग होता.

* * *

सुभाषबाबूंच्या आझाद हिंद सेनेमध्ये भरती होण्यासाठी युवकांमध्ये अहमहमिका असायची. भरती होताना युवकांना पुढील प्रतिज्ञापत्रक भरून द्यावे लागे. "मी स्वेच्छेने आझाद हिंद सेनेत भरती होत आहे. मी माझे आयुष्य भारताला भेट देत आहे. मी भारताच्या स्वातंत्र्यासाठी आपले जीवन झोकून देण्याची प्रतिज्ञा करीत आहे. मी मृत्यूची पर्वा न करता तनमनधनाने स्वातंत्र्यसंग्रामात सहभागी होईन. या कार्यात मी कुठल्याही व्यक्तिगत लाभाची अपेक्षा करणार नाही. मी जाती धर्म न मानता प्रत्येक भारतीयाला आपला बंधू किंवा भगिनी समजेन."

* * *

सुभाषचंद्र बोस स्वयंपाक चांगला करायचे. तुरुंगात असताना त्यांनी कित्येकदा स्वतः खाद्यपदार्थ बनवून आपल्या क्रांतिकारक सहकाऱ्यांना खायला दिले.

आझाद हिंद सेनेचे प्रमुख झाल्यानंतरही ते सर्वसाधारण शिपायांसोबत अनेकदा त्यांच्या भोजनकक्षात जेवत. कधीकधी तर ते स्वतःच्या हातांनी एखादा खाद्यपदार्थ बनवून सैनिकांना खिलवीत. ते गंमतीने म्हणायचे, "मला जर दुसरे कोणतेच काम मिळाले नाही तर मी आचारी बनून स्वतःचे पोट भरू शकतो."

* * *

इंफाल आणि ब्रह्मदेशात ब्रिटिश फौजांची सरशी झाली. नेताजींनी झाशी राणी पथकातील स्त्रियांना थायलंड आणि मलायात पाठवण्याची व्यवस्था केली. आझाद हिंद सेना शत्रूशी टक्कर घेत समोर सरकत होती. अतिशय धोक्याचे वातावरण होते. २४ एप्रिल १९४५. अचानक शत्रूच्या विमानांनी हल्ले सुरू केले. ज्याला जशी जागा मिळेल तसा तो लपला. पण नेताजी शांतपणे दाढी करीत होते. दाढी झाल्यावर त्यांनी सिगरेट पेटवली. मजेने झुरके घेत राहिले.

* * *

जून १९४४ पर्यंत आझाद हिंद सेनेने ब्रह्मदेशाच्या सीमेवरील जवळजवळ बाराशे वर्गमैलाच्या प्रदेश स्वतंत्र केला. काही भागात नागा जमातीची वस्ती होती. ते नागा लोक म्हणायचे, " आम्हाला इंग्रज नको. जपानी नकोत. आमचा राजा नेताजी सुभाषचंद्र बोस."

● ●

*************************

# नक्षत्रांची शर्यत ?

**राम शेवाळकर**

*************************

१९१६ च्या सुमारास गांधीजींचा भारतीय राजकारणात उदय झाला. आल्याआल्या त्यांनी त्यांचे राजकीय गुरू गोपाळ कृष्ण गोखले यांच्या सल्ल्यानुसार संपूर्ण भारतीय राष्ट्रपुरुषांचे डोळसपणे दर्शन घेतले. आणि त्यानंतर आपल्या कार्याची दिशा निश्चित केली. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर शस्त्रबंदीचा कायदा झाला, आपोआपच स्वातंत्र्यप्राप्तीसाठी शस्त्राचाराचे सर्व उपाय कुंठित झाले. त्यामुळे ब्रिटिश साम्राज्यशाहीला भारताचे स्वराज्य मान्य करण्यासाठी भाग पाडणाऱ्या अन्य व्यापक उपायांचा अवलंब अनिवार्य झाला. आफ्रिकेतील फिनिक्स आश्रमात गांधीजींनी निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग सफलपणे राबवून पाहिला होता. भारतीय राजकारणात व्यापक राष्ट्रीय पातळीवर त्याचा प्रयोग कितपत व्यवहार्य ठरेल हे अद्याप अजमावून पाहायचे होते. भारतीय राजकारणाची नाडीपरीक्षा केल्यानंतर प्रतिकाराच्या कुंठित प्रवाहाला गती देण्यासाठी गांधीजींनी निःशस्त्र आंदोलनाचा प्रयोग भारतातही राबवून पाहण्याचा संकल्प होता. अनायासे बाबू अरविंद घोष यांनी निःशस्त्र प्रतिकाराची मीमांसा तोपर्यंत भारतीय जनतेसमोर लेखमालेच्या रूपाने मांडून दाखविलीच होती.

राज्यकर्ते या दृष्टीनी ब्रिटिश लोक भारतात तसे अल्पसंख्यच होते. भारत हा एक विराट खंडप्राय देश असल्याने त्याच्यावर सत्ता दृढमूल करण्यासाठी एतद्देशीय नोकरशाहीचेच सहाय घेणे क्रमप्राप्त होते. सत्ताधारी ब्रिटिश लोक भारतामध्ये कमी असले, तरी त्यामागे जिच्यावर कधीही सूर्य मावळणार नाही अशी ब्रिटिश साम्राज्यशाही उभी होती.. तिचे प्रतिनिधी तिच्या इच्छेनुसार व

नियंत्रणानुसार भारतीय प्रशासनाची सूत्रे सांभाळीत असत. या शासनाच्या विरुद्ध उघडपणे सशस्त्र बंड हा केवळ प्रासंगिक प्रशासकांच्या नव्हे तर संपूर्ण साम्राज्यशाहीच्या विरुद्धच उठाव मानला गेला असता. शिवाय शस्त्रबंदीचा निर्बंध मोडल्याबद्दल कायदेभंगाचाही अपराध बुद्धिपूर्वक पदरी घ्यावा लागला असता. हे सर्व जोखमीचे व अंतिमतः आत्मघातकी ठरण्याचे भय होते. त्या ऐवजी शस्त्रांचा अवलंब न करता शासनाला कोंडीत पकडता येणे भारतीय जनतेला अशक्य नव्हते. ब्रिटिशांची सत्ता भारतात दृढमूल करण्यात मग्न असणाऱ्या स्थानिक अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना प्रतिकारात सहभागी करून घेतले, तर केवळ असहकाराद्वारे सुद्धा प्रशासन स्थगित करणे अवघड नव्हते. सर्व पातळीवर असा असहकार शक्य झाला असता, तर विशेषतः संरक्षण व अनुशासनाच्या बाबतीत, ब्रिटिश पर्याय आणून ठेवणे शासनाच्या आवाक्याबाहेरचे होते. त्यामुळे सर्व प्रशासन ठप्प करण्याची युक्ती देशी सैनिकांना व प्रशासकीय अधिकाऱ्यांना आपल्या बाजूला वळवून घेणे हीच होती, हे गांधीजींनी ओळखले. जनतेची आत्मप्रचिती त्यांनी जागृत केली. हातात शस्त्र नसल्याबद्दलचा त्यांचा न्यूनगंड नाहीसा केला व आपल्यातील सुप्त शक्तीची जाणीव प्रज्वलित करण्यावर अधिक भर दिला. यालाच त्यांनी व्यापक अर्थाने 'अहिंसा' ही संज्ञा दिली. अहिंसेचे राजकारण सशस्त्र प्रतिकारातील स्वाभाविक हिंसेला त्याज्य ठरविण्याचे होते, शारीरिक नव्हे पण आपल्या आक्रमक पवित्र्यामुळे मानसिक हिंसासुद्धा न घडू देण्यावर गांधीजींचा कटाक्ष होता. नेमस्तपणे आणि सामुदायिक शक्ती जागृत करून आपले उद्दिष्ट संपादन करण्याच्या या प्रयत्नामागील सामर्थ्य सत्ताधाऱ्यांच्या लक्षात आले होते. प्रतिकाराचे पारंपरिक मार्ग पाठ असणाऱ्यांना ती तेवढी लक्षात आली नव्हती.

सुभाषबाबू हे स्वातंत्र्यप्राप्तीसाठी लढाऊ मार्गाचा पुरस्कार करणाऱ्यांपैकी एक होते. गांधीजींनंतर पाच वर्षांनी सुभाषबाबू विलायतेहून भारतात परतले. तोपर्यंत लोकमान्यांचा अंत झालेला होता व भारतीय राजकारणाचे एकमुखी नेतृत्व गांधीजींकडे आलेले होते. १६ जुलै १९२१ ला सुभाषबाबूंनी मोठ्या अपेक्षेने मणिभुवनमध्ये गांधीजींची भेट घेतली व त्यांच्याशी स्वराज्यप्राप्तीच्या मार्गाबद्दल चर्चा केली. ती चर्चा सुभाषबाबूंच्या लेखी अतिशय निराशाजनक ठरली. कारण गांधीजींच्या मनात आपल्या मार्गाबाबत निःशंक खात्री असावी तेवढी त्यांना आढळली नाही. उलट गोंधळच जाणवला. म्हणून गांधीजींऐवजी

त्यांनी देशबंधू दास यांचे अनुयायित्व पत्करले. सप्टेंबर २२ मध्ये झालेल्या कॉंग्रेसच्या गया अधिवेशनाचे दासबाबूच अध्यक्ष होते. कायदेमंडळावर बहिष्कार घालण्याच्या ते विरुद्ध होते कारण स्थानिक पातळीवर सत्ता सांभाळण्याची संधी व पात्रता बहिष्काराच्या उपायामुळे नाकारली जात होती. स्वराज्यप्राप्तीनंतर भविष्यकाळामध्ये प्रशासनाचा अनुभव येण्याच्या दृष्टीने हे पूर्वशिक्षण दासबाबूंच्या मते आवश्यक होते. पण याबाबत गांधीजींशी मतभेद झाल्यामुळे त्यांनी आपल्या वेगळ्या स्वराज्यपक्षाची स्थापना केली. स्वराज्य पक्षाने १९२४ मध्ये कलकत्ता महापालिकेच्या निवडणुका लढविल्या व त्या जिंकून दासबाबूंची महापौरपदी नियुक्ती झाली. सुभाषबाबू हे मुख्य कार्यकारी अधिकारी झाले. इथूनच गांधीजींशी उघड मतभेदाला आरंभ झाला.

१९२८ मध्ये नेहरू कमेटीचा रिपोर्ट आला. भावी स्वतंत्र भारताची राज्यघटना ठरविण्याच्या दृष्टीने नेहरू रिपोर्टने पार्श्वभूमी तयार करावयाची होती पण त्यात संपूर्ण स्वराज्याऐवजी डोमोनियन्स स्टेटस्वर समाधान मानण्याची तरतूद केलेली होती. सुभाषबाबूंचा संपूर्ण स्वातंत्र्याचा आग्रह होता. त्यामुळे नेहरू रिपोर्टला त्यांनी विरोध केला. लखनौला झालेल्या सर्वपक्षीय परिषदेत कडव्या मंडळींनी इंडिपेंडन्स लीगची स्थापना केली. जवाहरलाल नेहरूही त्यावेळी सुभाषबाबूंबरोबर होते. सायमन कमिशनविरुद्ध आंदोलन करण्याचा सुभाषबाबूंचा विचार होता पण गांधीजींची त्याला परवानगी नव्हती. कलकत्त्याला अखिल भारतीय युवक परिषद वीर नरीमन यांच्या अध्यक्षतेखाली भरली. त्या परिषदेत स्वागताध्यक्ष या नात्याने सुभाषबाबूंनी पहिल्याप्रथम गांधीजींवर उघड हल्ला चढविला. गांधीजींचा निवृत्तिवाद आपल्याला मान्य नसल्याचे व अशा जुन्या, कालबाह्य कल्पनांऐवजी आधुनिक विचारांवर आपले राजकारण आधारण्याचे सुभाषबाबूंनी जाहीर केले. पंडित मोतीलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखाली कलकत्त्याला झालेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनात सुभाषबाबूंना संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव मांडायचा होता. पण नेहरू रिपोर्टचे शिल्पकार असणाऱ्या मोतीलालजींना एकदम असा उठाव करणे सोयीचे न वाटल्यामुळे १९२९ अखेरपर्यंत नेहरू रिपोर्टातील तरतुदी मान्य कराव्यात व राज्यकर्त्यांनी अनुकूलता न दाखविल्यास त्यांच्याविरुद्ध आंदोलन करण्याची आशा दाखवून सुभाषबाबूंच्या ठरावाला प्रतिरोध करण्यात आला. गांधीजींच्या नेहरू रिपोर्ट उचलून धरण्याच्या ठरावाला शेवटी जवाहरलालजींच्या पाठिंब्यासह

सुभाषबाबूंनी संपूर्ण स्वातंत्र्याखेरीज अन्य कुठलाही पर्याय देशाला मान्य नसण्याची उपसूचना मांडली. ही उपसूचना प्रचंड मताधिक्याने मंजूर होण्याची शक्यता असतानाही गांधीजींच्या प्रतिष्ठेसाठी ती अमान्य ठरल्याचे सुभाषबाबूंना पाहावे लागले.

नेहरू कमेटीची सूचना सरकारला मान्य होणार नाही, याची अटकळ गांधीजींना होतीच. त्यामुळे १९२९ वर्षअखेरीला जर शासनाकडून अपेक्षाभंग झाला, तर नेहरू कमेटीविरोधी तरुण बंडखोरांचे सामर्थ्य वाढून कदाचित काँग्रेसमधील त्यांचा पाठिंबा वाढण्याची भीती होती. १९२९ मध्ये झालेल्या लाहोर अधिवेशनाच्या अध्यक्षपदी ती भीती निर्मूल करण्यासाठीच जवाहरलालजींची नियुक्ती करण्यात आली. त्यांच्या नेतृत्वाखाली रावी नदीच्या तीरावरच्या त्या ऐतिहासिक अधिवेशनाने संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव मंजूर केला. त्या ठरावाला अर्थ प्राप्त व्हावा म्हणून परकीय सरकारवर संपूर्ण बहिष्कार घालून आयर्लंडप्रमाणे जनतेचे प्रतिसरकार स्थापन करण्याची उपसूचना सुभाषबाबूंनी जोडली तीही फेटाळली गेली तरी सुभाषबाबूंच्या क्रांतीकारक नेतृत्वाचा ठसा अधिवेशनावर उमटल्याशिवाय राहिला नाही.

गांधी आयर्विन करारालासुद्धा सुभाषबाबूंचा विरोध होता. भगतसिंग व फाशीची शिक्षा झालेल्या त्यांच्या इतर सहकाऱ्यांची मुक्तता केल्याखेरीज गांधीजींनी या करारात सहभागी होऊ नये, असे सुभाषबाबूंना वाटत होते. परंतु ती अट न घालता गांधीजींनी करारानुसार कायदेभंगाची चळवळ बिनशर्त मागे घेतली. त्यामुळे संपूर्ण देशाचा अवसानघात झाल्याची टीका सुभाषबाबूंनी केली. दुर्दैवाने त्याचवेळी भगतसिंग, सुखदेव व राजगुरू तिघांनाही फाशी देण्यात आली. या ज्वलंत तरुण देशभक्तांच्या अपमृत्यूला आपल्या नेतृत्वाची कचखाऊ वृत्तीच कारणीभूत ठरली, असा सुभाषबाबूंचा आरोप होता.

१९३८ मध्ये सुभाषबाबू हरिपुरा काँग्रेसचे अध्यक्ष झाले. अध्यक्ष या नात्याने त्यांनी लोकमत तयार करण्यासाठी देशभर दौरा काढला. लगेच दुसऱ्या वर्षी त्रिपुरी काँग्रेसचे अधिवेशन आले. आपले अध्यक्षीय काळातले संकल्प पूर्ण करण्यासाठी दुसऱ्या वर्षीही आपणच काँग्रेसचे नेतृत्व स्वीकारावे, असे सुभाषबाबूंनी ठरविले, दुर्दैवाने त्याला गांधीजींनी विरोध केला. अध्यक्षपदासाठी त्यावेळी गांधीजींचे अधिकृत उमेदवार डॉ. पट्टाभी सीतारामैया होते. पण सुभाषबाबूंच्या लोकप्रियतेने गांधीजींच्या विभूतिमत्वालासुद्धा निष्प्रभ ठरवून

पट्टाभी सीतारामैयाचा पराभव केला. हा पराभव खुद्द गांधीजींनी स्वतःच्या मनात तो फार लावून घेतला इतके की तो स्वतःचाच पराभव मानला. आणि सुभाषबाबूंशी असहकार करण्याचे कार्यकारिणीने सूचक आवाहन केले. सुभाषबाबू मात्र गांधीजींचा आशीर्वाद मिळविण्यासाठी आपणहून वर्धेला गेले पण गांधीवादावर विश्वास नसणाऱ्यांशी कुठलीही सल्लामसलत करण्याची गांधीजींची तयारी नव्हती. गांधीजींच्या आवाहनानुसार सरदार पटेल, मौलाना आझाद, राजेंद्रप्रसाद, सरोजिनी नायडू, आचार्य कृपलानी इत्यादी बारा सभासदांनी आपल्या सभासदत्वाचे एकत्रित राजिनामे देऊन सुभाषबाबूंना एकाकी पाडण्याचा प्रयत्न केला.

वर्धेची गांधीजींची निष्फळ भेट आटोपून सुभाषबाबू परतले ते एक भयंकर आजार घेऊन. My Strange Illness नावाचा एक लेखच त्यांनी त्या प्रकरणी लिहून प्रसिद्ध केला. आजारामागच्या संशयास्पद कारणांची त्या लेखातील मीमांसा वाचून वाचक थक्क झाला नसता तरच नवल. त्रिपुरा काँग्रेसचे अध्यक्षपद सुभाषबाबूंनी आजारपणातच भूषविले पण त्यानंतर सर्व बाजूंनी काँग्रेसमधील प्रस्थापितांनी त्यांची खूप कोंडी केली, तडजोडीचे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरविले. त्यामुळे निरुपायाने पक्षातील व देशातील ऐक्य अबाधित राहण्याच्या सदिच्छेने सुभाषबाबूंनी अध्यक्षपदाचे त्यागपत्र दिले. त्या ठिकाणी त्यानंतर डॉ. राजेंद्र प्रसादांची स्थापना झाली.

काँग्रेससारखा राष्ट्रव्यापी पक्ष स्वराज्यप्राप्तीविषयक आपल्या धारणांना व मार्गांना इतःपर उपयुक्त ठरण्याची फारशी शक्यता नसल्याचे लक्षात आल्यावर सुभाषबाबूंनी गंभीरपणे अन्य विचार केला व देशाबाहेरून स्वातंत्र्याच्या चळवळीची सूत्रे गतिमान करण्याचा निर्धार केला. त्यांचे भारतातून गूढरीत्या प्रयाण व अन्य बलिष्ठ राष्ट्रांचे आपल्या स्वातंत्र्यप्रयत्नांना सहाय्य मिळविण्याचे केलेले प्रयत्न, रासबिहारी बसूंच्या पुढाकाराने केलेली आझाद हिंद सेनेची स्थापना, त्या सेनेने खुद्द ब्रिटिशांविरुद्धच केलेली चढाई, पण दैवयोगाने जर्मनी व जपानबरोबर तिलाही पत्करावा लागलेला पराभव - या सर्व घटना देशाला ज्ञातच आहेत. १९४७ मध्ये देशाला स्वातंत्र्य मिळू शकले, याचे फार मोठे श्रेय त्या काळातील ज्या दोन तीन महत्वाच्या घटनांना आहे, त्यामध्ये आझाद हिंद फौजेचे योगदान अग्रगण्य मानले जाईल. भारतासाठी स्वातंत्र्याची सनद घोषित करताना संरक्षण फळी ब्रिटिशांशी इतःपर एकनिष्ठ न राहिल्याचे महत्वाचे कारण

पुढे केले गेले होते, हे या संदर्भात विसरता येणार नाही.

सुभाषबाबूंनी परकीय राष्ट्रांची मदत घेतली, ती राष्ट्रे त्या विशिष्ट काळात ब्रिटिशांची शत्रूराष्ट्रे होती. भारताने त्यांना शत्रूराष्ट्रे मानण्याचे खरे म्हणजे काही कारण नव्हते. भारताचे जर्मन किंवा जपानशी वैर नव्हते. ब्रिटिशांचे निश्चितच होते. आपले अंकित राष्ट्र म्हणून ब्रिटिशांनी भारताला या महायुद्धात जबरदस्तीने ओढले होते. हे लक्षात न घेता एकतर्फी प्रचाराने प्रभावित होऊन अनावश्यक स्वामीनिष्ठेपोटी जर्मनी किंवा जपानला आणि त्या अनुषंगाने सुभाषबाबूंनाही वैरी लेखणे अदूरदृष्टीचे होते. दुर्दैवाने सुभाषबाबूंच्या या प्रयत्नांच्या बाबतीत राष्ट्रीय नेतृत्व अनुदारपणे विचार करीत होते, असाच इतिहासाला कौल द्यावा लागेल. पं. नेहरूंनी मात्र युद्धकैदी म्हणून पकडलेल्या भारतीय सैनिकांच्या मुक्ततेसाठी पुन्हा एकदा वकिलीचा झगा अंगावर चढवून न्यायालयात लढा दिला व आपल्या अगोदरच्या पूर्वग्रहाचे क्षालन केले.

गांधीजी व त्यांचे मार्ग याबद्दल सुभाषबाबूंच्या मनात आरंभापासूनच आस्था नव्हती. गांधीजी कणखर नेतृत्व देण्याऐवजी अजून चाचपडत आहेत, असा त्यांचा पहिल्या मुंबई भेटीत ग्रह झाला. कदाचित आफ्रिकेतील यशस्वी ठरलेला उपाय भारतामध्ये एवढ्या व्यापक प्रमाणामध्ये लागू करण्याच्या बाबतीत गांधीजींच्या मनात तोपर्यंत खात्री झाली नसावी. पण गांधीजींचे निदान चुकीचे नव्हते, हे पुढे सुभाषबाबूंच्याही प्रत्ययाला आले. स्वातंत्र्यप्रयत्नांच्या बाबतीत राष्ट्रीय नेतृत्वाने अधिक आग्रही व आक्रमक व्हावे, बोटचेपे राहू नये असे त्यांचे निश्चितच मत होते. गांधीजींच्या अनुयायांपैकी सगळ्यांनाच गांधीजींची सर्वच मते व विचार शिरसामान्य होते असे मानण्याचे कारण नाही. गांधीजींच्या राजकारणामागचे अध्यात्म तर अनेकांना अनाकलनीय वाटायचे. अतींद्रिय कौलावर असलेला त्यांचा भर विपक्षीयांच्या अखंड हेटाळणीचाच विषय बनलेला होता. गांधीजींचा अहिंसेबाबतचा आग्रह सुद्धा स्वपक्षीयांमध्येही सर्वमान्य नव्हता. अहिंसा हे मूल्य म्हणून गांधीजींनी सार्वजनिक जीवनात व राजकारणातही प्रविष्ट केले होते. तर अहिंसेला केवळ धोरण म्हणूनच त्यांच्या अनुयायांची मान्यता होती. गांधीजींची जीवनदृष्टी सुद्धा खुद्द नेहरूंनाही कालबाह्य वाटत होती. मूलोद्योग, ग्रामोद्योग वगैरे सारख्या त्यांच्या कल्पनाही औद्योगिक जगासाठी इतिहासजमा ठरत होत्या. त्यामुळे त्यांचे काही विचार व मार्ग सुभाषबाबूंना मान्य नसल्याचा एवढा गवगवा करण्याचे काहीच कारण

नव्हते. सुभाषबाबूंचा पिंड युयुत्सू होता. अन्यायाचा प्रतिकार आत्मशक्तीद्वारे यशस्वीपणे केला जाण्याचा प्रयोग त्यांनी तोपर्यंत अनुभवला नव्हता. अध्यात्म तत्त्वज्ञानावर व उपासनेच्या सामर्थ्यावर त्यांचा विश्वास असला, तरी सार्वजनिक व्यवहारामध्ये त्यांची योजना त्यांना अप्रस्तुत वाटत होती. सुभाषबाबू आरंभी डाव्या विचारसरणीचे होते. भारताला नव्या स्पर्धेच्या जगात टिकून राहायचे असेल तर अत्याधुनिक विद्यांचा, ज्ञानाचा, विचारांचा व मार्गांचा निःशंकपणे अवलंब केला पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. जवाहरलालजी सुद्धा या बाबतीत त्यांच्याशी याच कारणामुळे सहमत होते. गांधीजींशी मतभेद असले तरी त्यांच्या विभूतिमत्वाबद्दल, निर्विवाद नेतृत्वाबद्दल, त्यांच्या कालोचित निर्णयशक्तीबद्दल व लोकमानसावर त्यांच्या असलेल्या अद्वितीय प्रभुत्वाबद्दल त्यांच्या मनात सदैव आदरच होता. तो त्यांनी वेळोवेळी व्यक्तही केला. त्रिपुरी काँग्रेसच्या निवडणुकीमध्ये यशस्वी झाल्यानंतरच्या काढलेल्या पत्रकात याच भावनेचे प्रतिबिंब आपल्याला दिसेल. गांधीजींच्या मनात आपल्याबद्दल असलेले गैरसमज खुलासेवार व मनमोकळ्या चर्चेअंती आपल्याला काढून टाकता येतील, या विश्वासाने निवडणूक जिंकल्यानंतर गांधीजींचा आशीर्वाद मागण्यासाठी ते वर्धेला जाऊन त्यांना भेटले होते. आझाद हिंद फौजेच्या नेतृत्वकाळातही २२ मार्च १९४४ मध्ये नभोवाणीवरून केलेल्या भाषणात त्यांनी गांधीजींबद्दल हा आदर व्यक्त केला होता.

गांधीजींची स्वतःच्या विचारांवर गाढ श्रद्धा होती. स्वतःच्या निर्णयांच्या अचूकपणाबद्दल सुद्धा ते निःशंक असायचे. पण आपले विचार किंवा मार्ग न पटणाऱ्यांच्याबद्दल थोडे औदार्य, धोरण म्हणून का होईना राखता आले असते, तर सुभाषबाबूंसारखा वीर पुरुष गमाविण्याची पाळी काँग्रेसवर आली नसती. प्रतिपक्षीयांना जरा अधिकच सवलत देण्याचा गांधीजींचा लौकिक होता. बॅ. जिन्हा, अलीबंधू किंवा खुद्द माऊंटबॅटन यांच्या बाबतीत व्यूह म्हणून जे मनाचे सढळपण त्यांनी दाखविले, त्याचा अल्पांश सुभाषबाबू, नरीमन वा डॉक्टर खरे यांच्या वाट्याला आला असता तर भारताचे भाग्य अधिक उज्ज्वल झाले असते.

गांधीजीही या शतकातील एक अलौकिक महावीर होते. पण लौकिक शस्त्रांऐवजी वा बटबटीत कारस्थानांऐवजी आत्मशक्तीच्या अवजारांवर त्यांचा अधिक विश्वास होता. त्यांची युद्धनीतीही अधिक सूक्ष्म होती. प्रतिपक्षाला अपमानित झाल्यासारखे वाटू न देता आपणहून पराजय कबूल करायला

लावण्यात ते वाकबगार होते. आश्चर्य म्हणजे अशा पराजयातून प्रतिशोधाचा दंश किंवा खुनशीपणा न वाढता भावभक्ती वृद्धिंगत होत असे. गांधीजींचे बहुतेक शत्रू क्रमाने त्यांचे भक्त होत गेले, त्याचे रहस्य हेच.

प्रतिपक्षीयांनी एकमेकांना अचूक ओळखण्यात थोडीजरी कुचराई केली तरी त्याचा परिणाम उभयतांची शक्ती क्षीण होण्यात होतो. सुभाषबाबूंनी हे ओळखले होते. गांधीजी थोडेसे अधिक जगते, तर त्यांनीही हे ओळखल्याची सुखद प्रचिती देशाला आली असती. आणि देशहितबुद्धीनेच अभिप्रेत चाकोरीपेक्षा न पटण्याजोगा असा वेगळा मार्ग हाताळूनही सुभाषबाबूंनी केलेल्या पराक्रमाची महती त्यांना पटली असती व त्यांनी तोंड भरून आपल्या या दुरावलेल्या लेकाला आशीर्वाद दिले असते.

कदाचित त्यामुळे नक्षत्रांच्या दैदिप्यमान शर्यती पृथ्वीवरून पाहायला मिळाल्याचे विस्मयजनक समाधान देशाला लाभले नसते पण ध्येयाच्या एकाच तेजोगोलाभोवती फिरणाऱ्या सुविहित सूर्यमालेला प्रणाम करण्याचे भाग्य मात्र निश्चितच अनुभवता आले असते.

● ●

# सुभाषवाद

**ग. त्र्यं. माडखोलकर**

## १

दिल्लीच्या इतिहासप्रसिद्ध लाल किल्ल्यात आझाद हिंद फौजेवर सध्या चालू असलेल्या खटल्याचा निकाल लष्करी कोर्ट काहीही देवो. पण श्री. सुभाषचंद्र बोस आणि त्यांची स्वातंत्र्यसेना यांचा जो जयजयकार गेले तीन महिने देशात सतत एकमुखाने चालू आहे, त्यावरून या खटल्याच्या मुळाशी असलेल्या क्रांतिकारक तत्त्वाला जनतेचा पूर्ण पाठिंबा मिळाला आहे, हे मात्र निश्चित. किंबहुना, डॉ. सर तेजबहादुर सप्रू, बक्षी सर टेकचंद आणि कुंवर सर दिलीपसिंग यांच्यासारखे कायद्याच्या काटेकोर मर्यादांचे चुकूनही कधी उल्लंघन न करणारे घटनापंडित आझाद हिंद फौजेचा बचाव करण्यासाठी कोर्टात वकीलपत्र घेऊन उभे राहिले, याचा अर्थच हा की, त्यांच्या दृष्टीने श्री. सुभाषचंद्र बोस आणि त्यांची स्वातंत्र्यसेना यांची भूमिका आणि त्यांच्यावर हिंदुस्थान सरकारने भरलेल्या खटल्याच्या मुळाशी असलेले तत्त्व, केवळ राजकीयच नव्हे तर आंतरराष्ट्रीय राज्यनीतीच्या आणि कायद्याच्या दृष्टीनेही, पायाशुद्ध आहे. हे तत्त्व कोणते? हे तत्त्व, परतंत्र जनतेला आपल्या मायदेशाच्या स्वातंत्र्यासाठी लढण्याचा जन्मसिद्ध हक्क आहे, हे! वस्तुतः, स्वातंत्र्य हा जर मनुष्याचा जन्मसिद्ध हक्क आहे, तर त्या स्वातंत्र्यासाठी जरूर तर लढण्याचा हक्कही माणसाला जन्मजातच असावा, हे स्वाभाविक नाही काय? पण, साम्राज्यशाही राष्ट्रांनी जगातील दुबळ्या दलित देशांचे स्वातंत्र्य तर हिरावून छिनावून घेतलेच, पण त्यासाठी लढण्याचा त्यांचा हक्कही नाकारला, बेकायदेशीर ठरवून टाकला! मनुष्याच्या आणि राष्ट्रांच्या त्या जन्मजात, मूलभूत हक्काची न्याय्यान्याय्यता

आझाद हिंद फौजेवरील खटल्यात इरेला पडलेली असल्यामुळेच तो खटला, केवळ हिंदी राजकारणातच नव्हे तर आंतरराष्ट्रीय राजकारणातही, क्रांतिकारक ठरणार आहे.

आणि हा स्वातंत्र्यासाठी लढण्याचा दलित जनतेचा हक्क हेच सुभाषवादाचे प्राणभूत तत्त्व होय. १९४२ च्या ऑगस्टमध्ये जी उठावणी हिंदुस्थानात सर्वदूर झाली, त्या उठावणीतून ऑगस्टवाद आविर्भूत झाला. ऑगस्टवाद म्हणजे परकीय सत्ता उलथून पाडण्यासाठी गनिमी काव्याने उत्पाती चळवळी करण्याचा जनतेचा हक्क. गेल्या महायुद्धात फ्रान्समधील माकीनी, पोलंड आणि युगोस्लाव्हिया, यातील देशभक्तांनी या भूमिगत उत्पाती चळवळीच्या जोरावरच जर्मनीला जेरीला आणला. पण उत्पाती भूमिगत चळवळीत, नाही म्हटले तरी, एक प्रकारचा नैतिक न्यूनगंड आहे. त्यातून ऑगस्ट उठावणीच्या गळ्यात तर अहिंसेच्या शपथेचे लोढणे अडकवलेले होते! पण ऑगस्टवादातील हा नैतिक न्यूनगंड सुभाषवादात नाही. कारण सुभाषवादाचा दावा, त्याची नैतिक आणि राजकीय भूमिका ही आहे की, परतंत्र राष्ट्रांना स्वतःच्या स्वातंत्र्यासाठी समोरासमोर उभे राहून - लपूनछपून, भूमिगत होऊन नव्हे - आमनेसामने लढण्याचा हक्क आहे. हिंदुस्थानाच्या आग्नेयेकडील इंडोचीन आणि इंडोनेशिया या दोन छोट्या राष्ट्रांनी फ्रेंच आणि डच साम्राज्यशाहीविरुद्ध जे निकराचे झुंज आज चालविले आहे, ते याच हक्काच्या जोरावर. त्या दृष्टीने ऑगस्टवादापेक्षा सुभाषवाद हा राजकीय आणि नैतिकदृष्ट्या श्रेष्ठ होय. त्यात कोणत्याच प्रकारचा न्यूनगंड नाही, उलट आत्मप्रत्ययाचा दर्प आणि स्वातंत्र्यप्रेमाची दीप्ती यांनी तो सुभाषवाद पुंजाळलेला, तेजाळलेला आहे!

सुभाषवादाचे हे अनन्य वैशिष्ट्य, ही नैतिक श्रेष्ठता जपानी वार्ताहर श्री. हागिवारा यांना दिलेल्या मुलाखतीत स्वतः सुभाषचंद्रांनीच विशद केलेली होती. १९४३ साली मॅनिला येथे भरलेल्या पत्रकारांच्या परिषदेत बोलताना सुभाषबाबूंनी असे सांगितले होते की, "माझे आणि गांधीजींचे मार्ग भिन्न असले, तरी ते एकाच ध्येयाप्रत जाणारे आहेत. लष्करी उठावणीमुळे बहुजनसमाजाचे रक्त आणि भावना उसळून जातील. हिंदी स्वातंत्र्यलढ्याच्या अंतिम यशासाठी ही लष्करी उठावणी अवश्य आहे. मग त्या उठावणीत माझा स्वतःचा बळी पडला, मला अपेशी मरण आले, तरी बेहत्तर!!" (Subhash Chandra Bose characterised his and Gandhi's political ideas as different roads

towards the same single goal. Bose, unlike Gandhi, made it clear that he believed that military action would stir the blood and passion of his colleagues as well as the mass of the people. He believed that such action was necessary for the ultimate success of the Indian emancipation movement, even if he himself should die miserably in failure.) या घोषणेत सुभाषवादाचे प्रारंभिक अपेश जसे गृहीत धरलेले आहे, तशीच त्याची अंतिम अपरिहार्यता आणि यशस्विताही गृहीत धरलेली आहे. आणि, डॉ. सुकर्ण यांनी इंडोनेशियात स्थापन केलेल्या लोकसत्ताक राज्याच्या लढ्याचे नजरेच्या टप्प्यात आलेले यश लक्षात घेता, सुभाषचंद्रांचे हे भावी लढ्याचे स्वप्न भ्रामक आहे, असे कोण म्हणेल ? किंबहुना, ते क्रांतदर्शी होते म्हणूनच त्यांनी आझाद हिंद सेना उभारली, आझाद हिंद राज्य स्थापन केले आणि राजकीय क्रांतीचा अंतिम मार्ग जनतेला दाखवून दिला ! नवल नाही की, डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांनी सांगितल्याप्रमाणे, अमरावतीच्या नवप्रसव मातांनी आपल्या तान्हुल्यांना 'सुभाषचंद्र' हे नाव ठेवून स्वातंत्र्य युद्धाचा केशरी टिळा पाळण्यात घालतानाच त्यांच्या कपाळी लावावा ! !

## २

(१) सुभाषवाद आणि गांधीवाद यांत विरोध आहे काय ?

(२) ऑगस्टवाद हे जर खरोखरीच गांधीवादाचे अपत्य असेल, तर सुभाषवाद आणि गांधीवाद यात विरोध असण्याचे कारण काय ?

(३) दक्षिण महाराष्ट्रात सध्या गाजत असलेले 'पत्री सरकार' हे जर गांधीवादाला आक्षेपार्ह वाटत नसेल, तर श्री. सुभाषचंद्र बोस यांचे आझाद हिंद सरकार आणि आझाद हिंद सैन्य ही गांधीवादाच्या आशीर्वादाला योग्य का ठरू नयेत ?

सुभाषवादासंबंधी जी उत्साहाची ऊर्मी सध्या सर्व देशभर उसळली आहे, तिच्यातून उद्‌भवणारे हे तीन प्रश्न अत्यंत समयोचित, अत्यंत समर्पक आहेत. खुद्द म. गांधी यांनी स्वतः आझाद हिंद सरकार आणि आझाद हिंद फौज यांच्यासंबंधी एक अवाक्षरही अद्याप काढलेले नाही व १९४२ च्या ऑगस्टमधील उत्पाती उठावणीलाही त्यांनी मान्यता अशी केव्हाच दिलेली नाही. फक्त ती

उठावणी ही सरकारने निव्वळ कुरापतखोरीने अकारण अनपेक्षितरीत्या सुरू केलेल्या निरर्थक दडपशाहीची स्वयंस्फूर्त प्रतिक्रिया होती, असे त्यांनी तिचे प्रथमपासून समर्थन केले आहे, एवढेच. किंबहुना, त्यांचे पट्टशिष्य श्री. राजगोपालाचार्य यांच्या काँग्रेसमध्ये पुन्हा प्रवेश करण्याच्या प्रयत्नाला, त्यांनी ऑगस्ट आंदोलनाचा विश्वासघात (betrayal) केला असा आक्षेप घेऊन, जेव्हा तामिल आणि आंध्र प्रांतातील काँग्रेस कमिट्यांनी विरोध केला, तेव्हा तामिलनाद हरिजन सेवासंघाचे कार्यवाह श्री. गोपालस्वामी यांना ता. ३० ऑक्टोबर रोजी पाठविलेल्या पत्रांत राजाजींची तरफदारी करताना महात्माजींनी असे उद्‌गार काढले होते की, "...लोकांनी जी दंगल माजविली, तिच्याशी काँग्रेसचा किंवा माझा काहीही संबंध नाही. सरकारने केलेल्या उतावळ्या सर्रास धरपकडीविरुद्ध लोकांनी त्वेषाने उठावणी केली, यात शंका नाही. पण कायदेभंगाची चळवळ फक्त मीच सुरू करू शकतो. मी ती मुळीच सुरू केलेली नव्हती. काही बाबतीत लोकांचा संयम सुटला. पण सरकारच्या बेफाम अत्याचारांनी लोकांच्या साऱ्या अत्याचारांवर मात केली!" (In so far as people caused any disturbances neither the Congress nor I have anything to do with them. There is no doubt that the people resented and rose against hasty and wholesale arrests. Civil disobedience movement could be only started by me. I never started it. In some cases people lost selfcontrol. But the Government's senseless violence eclipsed all popular violence) गांधीजींच्या या उद्‌गारांवरून हे स्पष्ट आहे की, ते ऑगस्ट उठावणी ही सरकारच्या अत्याचारांची केवळ प्रतिक्रिया म्हणूनच फक्त समर्थनीय मानतात.

अर्थात ऑगस्टवाद हे सत्य आणि अहिंसा ही दोन महान् तत्त्वे प्राणभूत मानणाऱ्या गांधीवादाचे अपत्य नव्हे. ते गांधीवादाचे औरस अपत्य तर नव्हेच, पण अनौरस अपत्य म्हणणेही अयोग्य होईल. ऑगस्टवादाला जे गांधीवादाचे अपत्य समजतात आणि ऑगस्ट उठावणी ही गांधीजींना मान्य असल्याचा आभास जे उत्पन्न करतात, ते गांधीजी आणि गांधीवाद या दोहोंनाही जाणून वा नेणून अन्याय करतात, असे म्हटले पाहिजे. कारण गांधीवादाची प्राणभूत तत्त्वे ही सनातन व म्हणून अचल आहेत. कोणत्याही एका समाजाच्या वा राष्ट्राच्या सोयीसाठी त्यात बदल होण्याची, त्यांना मुरड घातली जाण्याची शक्यता नाही.

ज्या प्रांतिक समित्यांनी नेताजींना समर्थन दिले त्या सर्व समित्या नव्या अध्यक्षांनी एका रात्रीतून बरखास्त केल्या. त्यावर सुभाषचंद्रांनी आझादांचे 'महान मोगल' हे नामकरण केले. जून १९३९ मध्ये नागपूरला 'फॉर्वर्ड ब्लॉक'चे अधिवेशन भरले. अध्यक्षपदावरून सुभाषचंद्रांनी 'प्रत्यक्ष कारवाई'ची घोषणा केली. पण देशाची मानसिकता त्यासाठी तयार नव्हती. मग सुभाषचंद्रांनी कलकत्त्यात हॉलवेलचे स्मारक हटविण्याचे आंदोलन हाती घेतले. त्यात त्यांना अटक होऊन कारावास घडला.

फजलूल हक् त्यावेळी बंगालचे मुख्यमंत्री होते. त्यांनी सुभाषचंद्रांना तुरुंगातच संपविण्याचा ब्रिटिश शासनाचा मानस असल्याची बातमी दिली. सुभाषबाबूंनी हर प्रयत्नांनी तुरुंगातून बाहेर पडावे अशी सूचना केली. नेताजींनी कारावासात आमरण उपोषण सुरू केले. त्यांची प्रकृती ढासळली. ते निमित्त करून श्रीमान हक् यांनी सुभाषचंद्रांना कारावासातून काढून नजरकैदेत त्यांच्याच घरी (नेताजींच्या घरी) स्थानबद्ध केले.

घराभोवती गुप्त आरक्षींचा आहोरात्र पहारा होता. डॉ. शिशिर बोसांनी या सक्त पहाऱ्यातून काढून सुभाषबाबूंना गोमती रेल्वे स्थानकापर्यंत पोहचविले. सुभाषचंद्रांनी पोषाख बदलून प्रथम श्रेणीतून दिल्लीपर्यंत प्रवास केला. तेथे सीमा प्रांताचे फॉर्वर्ड ब्लॉकचे अध्यक्ष चौधरी खान यांनी नेताजींना सोबतीला एक पुष्तु भाषिक विश्वासू माणूस देऊन पेशावरकडे रवाना केले. ब्रिटिशांच्या चौक्या-पहारे चुकवीत बर्फाळ प्रदेशातून वाट काढीत दोघे काबूलला पोहचले.

अन्य नेत्यात अभावाने आढळणारी राजकीय दूरदृष्टी व नियोजनबद्ध कार्यपद्धती ही नेताजींची खास वैशिष्ट्ये होती. नागपूरच्या अधिवेशनानंतर पण हॉलवेल स्मारक चळवळीपूर्वी त्यांनी सावरकरांची भेट घेतली. कॉंग्रेस पुढाऱ्यांना सावरकरांची भेट घेण्यास वाटणारा कोतेपणा वा संकोच सुभाषचंद्रांच्या ठिकाणी अजिबात नव्हता. कॉंग्रेस पुढाऱ्यांनी सावरकरांवर सांप्रदायिकतेचा शिक्का मारून पुढे गांधीवधात त्यांना गोवण्यापर्यंत मजल मारली होती. सुभाषांचे तसे नव्हते. या दोन थोर क्रांतिकारकांत काय बोलणे झाले असेल ते अज्ञातच राहिले. पण जेवढे कळले ते असे, या भेटीत सुभाषचंद्रांनी सावरकरांना विनंती केली की, त्यांनी भारतीय तरुणांना ब्रिटिश सैन्यदलात भरती होण्यास प्रोत्साहन द्यावे. भविष्यात या सैनिकांचा उपयोग आपल्या योजनेसाठी करण्याचा हेतू स्पष्ट होता. सावरकर हे एक अग्रगण्य क्रांतिकारक, उच्च दर्जाचे साहित्यिक व

सामाजिक सुधारणांचे प्रणेते होते. अनुसूचित जातींना मंदिर प्रवेश देण्याची चळवळ त्यांनी हाती घेतली होती. सहभोजनाची 'झुणका भाकर' चळवळही त्यांनी सुरू केली. त्यांच्यासारखा शतपैलू व्यक्तिमत्व असलेला एकही नेता काँग्रेसकडे नव्हता. सावरकर व काँग्रेस यांचा मतभेद प्रामुख्याने तुष्टीकरणाबद्दल होता. स्वार्थापोटी, मतांच्या आशेने काँग्रेसने मुस्लीमांना अनेक सवलती दिल्या. सावरकरांचा आक्षेप अशा सवलतींवर होता. राष्ट्रवादी मुस्लीमांशी मैत्री व सनातनवादी मुस्लीमांशी विरोध हा सावरकरांचा सल्ला होता. अशा थोर सावरकरांशी सुभाषची भेट झाली.

हिंदुस्थान सोडण्यापूर्वी सुभाषचंद्रांनी एक गुप्त संदेश पाठवून नागपूरच्या रामभाऊ रुईकरांना भावी आझाद हिंद सैनिकांशी संपर्क साधण्यास सांगितले. गिरणी कामगारांचा संप त्यावेळी चालू होता. रुईकरांना अटक झाली. त्यावेळी आम्ही मित्रांनी दाखल केलेला (हेबीअस् कॉर्पस) दावा नागपूर उच्चन्यायालयाने मान्य केला. न्या. व्हिव्हीयन बोस व न्या. पोलाक यांनी तो निवाडा दिला. जे. बी. सेन महाधिवक्ता होते. त्यांनी न्यायालयाला सांगितले की, खरे तर अर्जदारातर्फे उभे राहणे त्यांना आवडले असते पण महाधिवक्ता असल्याने ते आपल्या पक्षकाराला (शासनाला) बांधील होते. न्यायमूर्तींचा तो निवाडा 'चले जाव' चळवळीच्या त्या काळात खूपच गाजला. मी रामभाऊ रुईकरांची कन्या मालती रुईकरांशी संपर्क साधून सुभाषबाबूंचा संदेश माझ्याकडे सोपविण्याची विनंती केली. तो संदेश शीलभद्र यागी यांना लगेच पोहचविण्यात आला. यागी व मुकुंदलाल सरकार यांनी मिळून १२०० भूमिगत केंद्रांची उभारणी केली. आझाद हिंद सेनेचे आगमन होताच उठाव करण्याची केंद्राची जय्यत तयारी होती. पण दुर्भाग्य! देशाला आझाद हिंद सेनेच्या हालचालींची काहीच माहिती नव्हती. भारतीयांची समजूत होती की जपानी सैन्य पूर्व आघाडीवर लढते आहे. पण आझाद हिंद सेनेने भारतीय सीमेवर हल्ला चढविण्यापूर्वीच आम्ही सर्व बंदिवान झालो होतो. आमच्या मते 'चले जाव' आंदोलन अपरिपक्व होते. वेळेआधीच ते छेडल्या गेले. जर आझाद हिंद सेनेचा भारतातील प्रवेश व चलेजाव चळवळ एकाचवेळी घडले असते तर अधिक उत्तम झाले असते. चलेजाव चळवळ अवघ्या एक महिन्यात दडपण्यात आली. सर्व नेते व कार्यकर्ते कारागृहात होते. आमच्यापैकी ज्यांनी आझाद हिंद सेनेशी संपर्क करण्याचा प्रयत्न केला त्यांचा प्रयत्न (विशेषतः आराकान आघाडीवर) अंशतः यशस्वी झाला. काहींना सीमा

ओलांडण्यात यश आले, काही पकडले गेले तर काही मारले गेले. त्या अनाम वीरांची नावेही आज ठाऊक नाहीत. जे पकडल्या गेले त्यांना लाल किल्ल्यात तळघरात डांबण्यात आले. बंदींना केवळ १५ मिनिटांसाठी मोकळ्या हवेत आणण्यात येत असे. महिना महिना स्नान नसे. जनावरांपेक्षाही अधिक वाईट वागणूक त्यांना मिळाली.

सुभाषचंद्रांचे व्यक्तिमत्व चुंबकीय होते. त्यांची आत्मशक्ती अत्यंत प्रबळ होती. जाहीर कार्यक्रमानंतर ते एखाद्या पुतळ्याप्रमाणे स्तब्ध बसून राहत. त्यांची स्मरणशक्ती अत्यंत तीक्ष्ण होती - अगदी संगणक. भेटीला येणाऱ्याचे नाव, पूर्वीची भेट, त्याचे सर्व तपशील त्यांना बिनचूक आठवत. त्यांनी सर्वांना बरोबरीची वागणूक दिली. भेटीला येणाऱ्यास आपण एका महान नेत्याच्या सान्निध्यात असल्याचे जाणवतच नसे. दर तासाने त्यांना पान व चहा घेणे आवडे.

काबूलला पोहचल्यावर त्यांनी रशियन दूतावासाशी संपर्क साधला. तेथील राजदूताने रशिया जर्मनीबरोबर युद्ध करणार असल्याची शक्यता बोलून दाखविली. त्यामुळे रशिया भारताला मदत करण्याच्या अवस्थेत नसल्याचे सांगितले. नंतर सुभाषचंद्रांनी इटलीच्या दूतावासाशी संपर्क साधला. त्यांनी सुभाषचंद्रांना ओरलैंडो या नावाने रोमपर्यंत पोहचविले. तेथून ते जर्मनीत गेले. तेथे त्यांनी सर्व भारतीयांची सभा घेतली व तेथे इंडियन इंडिपेंडंस लीग व नंतर आझाद हिंद सेना स्थापन केली. त्या सभेत खास आमंत्रित हिटलरने सुभाषचंद्रांना भारताचे 'डेप्युटी फ्यूरर' म्हणून संबोधले. अर्थात डेप्युटी (उप) शब्दामागे आपण सर्व जगाचे शहेनशहा असल्याचे ध्वनित होतेच. भारताचा फ्यूरर भारतीय ठरवतील असा प्रतिटोला नेताजींनी दिला. पुढे ज्यावेळी सुभाषचंद्रांनी जपानकडे एका बोटीतून (पाणबुडी) प्रस्थान केले त्यावेळी हिटलर निरोप द्यायला उपस्थित होता. आझाद हिंद सेनेने हिटलरच्या आग्रहाखातर रशिया विरुद्ध लढण्यास नकार दिला.

सिंगापूर व टोकियो येथे नेताजींनी आझाद हिंद सरकार स्थापन केले. आठ देशांनी त्यांना मान्यता दिली. आझाद हिंद सेनेची शौर्यगाथा सर्वांना विदित आहे. जो भाग अज्ञात असणे शक्य आहे त्याचाच उल्लेख मी करणार आहे.

मेजर अबीद हसन नेताजींचे सचिव होते. ते जपानला जाणाऱ्या पाणबुडीत त्यांचे बरोबर होते. जयहिंद हा नमस्कारांचा पर्याय त्यांचाच होता.

रंगूनमधील काही मुल्ला, मौलवींनी मुसलमानांनी जयहिंद म्हणू नये असा फतवा काढला. कर्नल बुन्हाउद्दीन चित्तलच्या नवाबाचे धाकटे बंधू होते. त्यांनी मुल्ला-मौलवींना पकडून गंभीर शिक्षेची धमकी दिली. तेव्हा त्यांनी आझाद हिंद फौजेत सांप्रदायिकता फैलावण्याचा प्रयत्न केला. आझाद हिंद सेनेत हे घडत होते. जेथे भारतात जातीयता फैलावणाऱ्या ब्रिटिशांचा कोणताही संबंध नव्हता. दुसरा एक वाद होता तो जाट व दलाल यांच्यात. दोन्हीही पंथ शाकाहारी. पण एकत्र जेवत नव्हते. नेताजींना कळले तेव्हा त्यांनी दोन्ही स्वयंपाकातील भाज्या एकत्र करून वाटण्यास सुरुवात केली. आझाद हिंद सैन्यात केवळ हिंदुस्थानी अन्न असेल. शीख, मुस्लीम वगैरे प्रकार असणार नाहीत असेही जाहीर केले. आमच्या अन्य नेत्यांना सैन्यातील वेगवेगळी शाकाहारी स्वयंपाकघरे एक करण्याची हिम्मत नव्हती.

येथे नमूद केले पाहिजे की आझाद हिंद सैन्यात ६५ टक्के मुस्लीम होते. कोणी जर नेताजींचा फक्र-ए-हिंद (देशगौरव) या बिरुदावलीशिवाय उल्लेख केला तर ते त्या व्यक्तीला सक्तीने तसा नामोल्लेख करायला सांगत. अशी होती आझाद हिंद फौजेतील सर्व जाती जमातींच्या सैनिकांची निष्ठा.

नेताजी युद्धभूमीवर नेहमीच आघाडीला असत. आपल्याला मारू शकेल अशी गोळी ब्रिटिश सैन्याजवळ नाही असे ते आपल्या सैनिकांना सांगत. रंगूनवर झालेल्या एका बॉंब हल्ल्याच्या वेळी नेताजींनी सर्वांना सुरक्षित ठिकाणी जाण्याचा आदेश दिला. स्वतः मात्र विमाने परत जाईपर्यंत उघड्यावर उभे होते. कोण हा जबरदस्त आत्मविश्वास!

त्यांच्यावर प्राणघातक हल्लेही झाले. पण सर्व निष्प्रभ ठरले. एका प्रसंगी एका ब्रिटिश गुप्तहेर स्त्रीने नेताजींवर अत्यंत जवळून पिस्तुल झाडले. सैनिकांनी तिला पकडले. नेताजींनी तिला आपले पिस्तुल दिले पण नेताजींच्या आकर्षक व्यक्तिमत्वाचा प्रभाव एवढा होता की तिने पिस्तुल उडवण्याचे नाकारले. ती नेताजींसाठी ब्रिटिशांची हेरगिरी करू लागली.

आपल्या सैनिकांना मिळणारे अन्न नेताजी खात. ते केवळ दोन तास झोप घेत. सर्व वेळ आपल्या सेनापतींबरोबर आक्रमणाच्या डावपेचाबद्दल चर्चा करीत. इम्फालपर्यंतच्या यशाचे श्रेय मेजर जनरल जगन्नाथ भोसले यांना दिले पाहिजे. ते यश हवाई मदतीशिवाय मिळालेले यश होते. कोणाही जपानी अधिकाऱ्याला भारतीय सैनिकास आदेश देण्याचा अधिकार नव्हता. प्रमुखांच्या बैठकीत

आपसात ठरवूनच निर्णय घेतले जात. जिंकलेल्या प्रदेशात भारतीय प्रशासन नेमले जात असे. जिंकलेल्या प्रदेशात आझाद हिंद चलन प्रचारात आणले जाई. जपानी चलन विदेशी चलन मानले जाई.

आपल्या देशातील तीन महान नेत्यांची परस्परांविषयीची भावना जाणून घेणे अनुचित ठरू नये. त्यापैकी महात्मा गांधी व नेताजी माझ्या मते युग-पुरुष होते. पंडित नेहरू हेही महान नेते होते. ज्यावेळी नेताजींनी बर्लिनहून आकाशवाणीवर भाषण केले त्यावेळी पं. नेहरूंनी एक निवेदन प्रसृत केले ते म्हणाले, "जर सुभाष परकीयांच्या मदतीने भारतभूवर पाय ठेवणार असेल तर विरोध करण्यात माझा क्रमांक पहिला असेल." पुढे पंडितजींनी आझाद हिंद सेनेच्या अधिकाऱ्यांसाठी पुन्हा एकदा वकिली पेहराव चढवला. पूर्वीचा प्रसंग १९४१ मधला. वर्धेला एकाच वेळी 'काँग्रेस' व 'फॉर्वर्ड ब्लॉक'च्या कार्यकारी समितीच्या सभा होत्या. काँग्रेस समितीत सुभाषचंद्र विशेष आमंत्रित होते. थोड्या वेळानंतर त्यांच्या लक्षात आले की आपल्याकडे दुर्लक्ष केले जात आहे. सुभाष ताडकन् उठले व म्हणाले की, "जर आमंत्रितांना विचारात घ्यायचेच नसेल तर बोलावलेत तरी कशाला?" त्यावर पंडितजींनी आवेशात येऊन सुभाषला दटावले. अंगावर धावून जाण्याचीच त्यांची एकूण कृती होती. सुभाष बाहेर निघून जाण्यास स्वतंत्र आहे असेही त्यांनी बजावले. गांधीजी स्वतः आमंत्रितच होते, त्यांनी नेहरूंना शांत केले. सुभाषचंद्रांनीच या घटनेनंतर लगेच आम्हाला हे सांगितले.

याउलट गांधीजींचा अनुभव. नेताजींच्या बर्लिन भाषणानंतर ह. वि. कामतांनी गांधीजींची प्रतिक्रिया विचारली त्यावेळी मी त्यांच्या सोबतच होतो. महात्माजी रागावलेले दिसत होते पण बाह्यतः त्यांनी आपली शांत प्रतिमा कायम राखली होती. ती मुलाखत अर्धा तास चालली. मी २९ व्या मिनिटाला कामतांना वेळ संपल्याची जाणीव देऊन उठण्याची सूचना केली. गांधीजींनीच आम्हाला थांबवून घेतले व एक तास राजकारणावर चर्चा केली. मी त्यांना सरळच विचारले की, "सुभाषविषयी काय?" तेव्हा गांधीजी म्हणाले, "ध्येय धोरणाबद्दल मतभेद असूनही मला सुभाषविषयी मोठा आदर आहे." ते म्हणाले की, "आमच्यातील ते महान देशभक्त आहेत आणि जपान असो किंवा रशिया असो की जर्मनी ते अशी कोणतीही गोष्ट करणार नाही जी देशाच्या सन्मानाला घातक असेल." गांधीजींचा हा सुभाषच्या देशभक्तीवरचा व प्रामाणिकपणावरचा विश्वास

त्यांच्याही विशाल मनाची साक्ष देणारा आहे. भिन्न मार्गी क्रांतिकारकाचा त्यांनी गौरव केला.

नेताजींची मूस पूर्णतः भिन्न होती. त्यांनी जी घोड दौड मारली त्यामुळे ते भूमिपुत्र म्हणून वंद्य ठरले. ते महात्माजींना राष्ट्रपिता म्हणत. कोणतीही कटुता न बाळगता त्यांनी आपल्या सैन्यातील एका दलाला महात्माजींचे नाव दिले. नेहरू व आझाद दलेही फौजेत होती. १९४६ मध्ये ब्रिटिश नौदलाने (भारतीय) मुंबईत उठाव केला. त्याचे पुढारी विश्वनाथ बोस यांनी त्यावर एक ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याची संधी मला मिळाली. आझाद हिंद सैनिकांना सर्वत्र स्वातंत्र्य संग्राम सैनिक मानले जाते. तरीपण शासनाने त्यांना तशी मान्यता दिली नाही. नोकरी गेल्यानंतर अनेकांना उपासमार सोसावी लागली. मी त्यांच्या वतीने राष्ट्रीय शासनाकडे जाण्याचा प्रयत्न केला. श्री. शीलभद्र यागी जे अखिल भारतीय स्वातंत्र्य संग्राम सैनिक संघटनेचे अध्यक्ष होते त्यांनाही भेटलो. शासनाने नौदलातील या शूर देशभक्तावर अन्याय केला.

नेताजी हे सर्व गुलाम वसाहतीसाठी एक प्रेरणास्रोत होते. काही देशांनी वसाहतीच्या स्वातंत्र्याचा विरोध केला. ब्रिटिश मात्र शहाणे निघाले. त्यांनी आपल्या साम्राज्याचा गाशा गुंडाळला. आपल्या एका नेत्याने बी. बी. सी. ला विचारले की, "ब्रिटनने आपली सत्ता का सोडली ?" तर उत्तर आले की, "ती काळाची गरज होती." स्पष्टीकरणार्थ त्याने म्हटले की, "सुभाषचंद्रांनी व्यावसायिक सैनिकांचे देशभक्त सैनिकात रूपांतर केले होते." उघड आहे की, ब्रिटनला सुभाषचंद्रांची दहशत वाटत होती. जर सशस्त्र संघर्ष झाला असता तर आधीच एक तृतीयांश झालेल्या ब्रिटिशांची सरसकट कत्तल झाली असती. जागतिक सत्तास्थान गमावलेल्या ब्रिटनजवळ वसाहतींना स्वातंत्र्य देण्यापासून पर्याय नव्हता. दुसऱ्या महायुद्धाने लोकशाहीला उत्तेजन दिले तर नेताजींनी साम्राज्यवादाला तिलांजली दिली.

इतिहास नोंद करील की या शतकाने दोन युगपुरुषांना जन्म दिला. त्या युगपुरुषांनी गुलामगिरीचे जोखडातून वसाहतींना मुक्त केले. एकाचा मार्ग अहिंसेचा तर दुसऱ्याचा सशस्त्र क्रांतीचा होता.

● ●

************************

# सुभाषबाबूंचे वक्तृत्व

**प्रा. नी. सी. दीक्षित**

************************

दादाभाई नौरोजी, गोपाळकृष्ण गोखले, फिरोजशहा मेथा, लोकमान्य टिळक यांचे राष्ट्रीय सभेला (काँग्रेस) लाभलेले नेतृत्व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात संपल्यावर एक नवीन पिढी, प्रामुख्याने युवा पिढी म. गांधी, चित्तरंजन दास, जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस ह्यांच्या रूपाने जनतेला नेतृत्व देण्यासाठी पुढे आली. या बहुतांश नेत्यांनी वक्तृत्वाच्या तसेच लेखणीच्या माध्यमातून आपले विचार जनतेपर्यंत पोहोचविले. विचारांचा गाभा देशाचे स्वातंत्र्य असले तरी प्रत्येकाची वक्तृत्वशैली भिन्न होती. टिळकांचा आवाज भांडखोर, वक्तृत्वात शब्दांवर जोर असायचा. मात्र त्यांच्या भाषणातून विचारांची आग बाहेर पडत असल्याने लोकांचे समर्थन ते मिळवीत. गांधींचे वक्तृत्व शांत होते, शब्दांवर जोर नव्हता. आचारविचाराप्रमाणेच त्यांची भाषणे संथ राहत. सावरकरांचे विचार प्रक्षोभक, भाषा दाहक पण तरीही त्यांच्या स्वराला एक नाजूक धार होती. जवाहरलाल नेहरूंच्या भाषणात नाट्यमयता होती. कधी आवेश असे तर कधी चिंतन असे. ह्या सर्व नेत्यांच्या तुलनेत बुलंद आणि भारदस्त आवाजातील वक्तृत्व म्हणजे सुभाषबाबूंचे. त्यांचा आवाज आवेगातही कधी कर्णकटू झाला नाही. मनोहर व्यक्तिमत्व लाभलेल्या सुभाषचंद्रांच्या आवाजात विलक्षण मार्दव व नादमयता होती. कारण त्या आवाजाला वंगभूमीच्या मातीचा सुगंध लाभला होता. त्याला जोड ओतप्रोत देशभक्तीची, क्रांतिकारी विचारांची, त्यामुळे त्यांचे वक्तृत्व विशेष गाजले. कलकत्त्याच्या नेताजी अनुसंधान केंद्राने मोठ्या प्रयासाने संपादित केलेली त्यांच्या भाषणांची ध्वनिफीत ऐकताना सागरातून घनगंभीर आवाज यावा असा अनुभव येतो.

सुभाषबाबूंची ध्वनिमुद्रित केलेली ही भाषणे वेगवेगळ्या प्रसंगी, वेगवेगळ्या विषयांवरील आहेत. त्यांचे पहिले भाषण १९३८ मधे त्रिपुरा येथील आहे. नंतर १९३९ मध्ये जनतेला उद्देशून केलेले भाषण आहे. पुढे १९४३ मधे टोकियो येथून, त्याचवर्षीच्या जूनमधे आग्नेय आशियात, जुलैमधे सिंगापूर येथून, नोव्हेंबरमधे पुन्हा टोकियो येथून अशी भाषणे आहेत. त्यांचे शेवटचे ध्वनिमुद्रित केलेले भाषण १९४४ मधील आझाद हिंद फौजेला उद्देशून केलेले आहे. सुभाषबाबूंच्या वक्तृत्वाचे, पर्यायाचे त्यातून व्यक्त होणाऱ्या विचारधनाचे विविध पैलू आढळून येतात. काँग्रेसमधे असणारे सुभाषबाबू, काँग्रेसचा त्याग केल्यानंतरचे सुभाषबाबू, परमप्रिय भारत देश सोडून विदेशात गेल्यानंतरचे सुभाषबाबू, आझाद हिंद फौजेचे नेतृत्व करणारे सुभाषबाबू, भारतभूमीला पुन्हा स्पर्श करतानाचे सुभाषबाबू अशी त्यांची विविध रूपे आहेत. त्यानुसार त्यांच्या वक्तृत्वाचे, वक्तृत्वविषयांचे आयामही बदलत जाणारे आहेत.

भारतीयांची हेटाळणी करणाऱ्या इंग्रज प्राध्यापकाला शासन करणाऱ्या सुभाषचंद्रांनी पुढे आय. सी. एस. सारखी अत्युच्च परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण करूनही देशसेवेचे खडतर व्रत पत्करले. मातृभूमीला श्रृंखलामुक्त करण्यासाठी ह्या महान देशभक्ताने लठ्ठ पगाराची व मानसन्मानाची नोकरी मुळातच स्वीकारली नाही. त्यांचे हे तेज शेवटपर्यंत कायम राहिले, त्यांच्या वक्तृत्वातही आले. म्हणूनच काँग्रेसमध्ये असूनही गांधींच्या विचारांना विरोध करण्याचे साहस दाखविणारे सुभाषबाबू जनप्रिय झाले. सुभाषबाबूंचे हे वक्तृत्व त्यांच्या नेतृत्वगुणाला अतिशय पूरक ठरले. सुभाषचंद्र काँग्रेसच्या कार्याचे महत्व पुरेपूर जाणून होते. म्हणूनच विद्यार्थ्यांना क्रांतीचे अग्रदूत संबोधून त्यांना काँग्रेसमध्ये येण्याचे आवाहन सुभाषचंद्रांनी केले. विद्यार्थी त्यांच्या वक्तृत्वातील मोहक शैलीने अक्षरशः झपाटून जात. जर्मनी, फ्रान्स, इटली, चीन येथील युवकांनी बजाविलेल्या कामगिरीची उदाहरणे देऊन सुभाषबाबूंनी युवकांना एकदिलाने, एक प्राणाने कार्य करण्याचा संदेश दिला. तसेच राष्ट्रीय ऐक्य आणि शिस्त यांचेही महत्व विशद केले. सुभाषबाबूंच्या वक्तृत्वात बहुश्रुतता प्रामुख्याने जाणवते. १९२८ ते १९३८ ह्या काळात त्यांनी स्वातंत्र्य चळवळ जोमात चालविण्याचे अथक प्रयत्न केले. युवकांकडून त्यांना खूप आशा होती, विश्वासही होता. म्हणूनच १९२८ च्या ऑक्टोबर ते डिसेंबर दरम्यानच्या भाषणातून त्यांनी युवा पिढीला स्वतःच्या जबाबदारीची जाणीव आहे, नीट योजना बनवून ती

त्यांनी क्रियान्वित केली पाहिजे असे सुचविले. ह्या कामात मागील पिढी असफल ठरल्याने नवनिर्माणासाठी युवकांनी संपूर्ण देशातून समोर यावे असे आवाहनही त्यांनी केले. एका ओजस्वी भाषणात ते म्हणतात, "नेत्यांबद्दल आम्हाला खूप आदर आहे. पण काळानुसार चालण्याचीही गरज आहे. युवावर्ग ध्वंस नाही, नवनिर्माण करील." सुभाषबाबूंचे हे भाषण वक्तृत्वाचा अनोखा आविष्कार होते. याच प्रसंगी स्वतंत्र, सुखी, महान भारताच्या निर्मितीसाठी गतिमान नेतृत्व हवे असे त्यांनी ठणकावून सांगितले.

सुभाषबाबू पूर्ण स्वातंत्र्यासाठी 'पूर्ण स्वराज्य' असा शब्द वापरीत. त्याचे विश्लेषण करताना एका भाषणात ते म्हणाले, "वसाहतीचे स्वराज्य आम्हाला मान्य नाही." सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यासाठी राजकीय स्वातंत्र्य एक पायरी होय असे त्यांचे प्रतिपादन होते. १९२९ च्या ऐतिहासिक लाहोर अधिवेशनात युवकांसमोर बोलताना सुभाषचंद्र म्हणाले, "आम्ही जसजसे स्वातंत्र्याच्या जवळ जात आहोत तसतसे ब्रिटिश शासक अधिकाधिक क्रूर बनताहेत. मात्र आमचा मार्ग आम्ही चालणार (एकला चलो रे). आलात तर तुमच्यासह, न आलात तर तुमच्याविना." भाषेच्या ह्या ठामपणामुळे त्यांच्या वक्तृत्वाचा उपस्थितांवर दीर्घ परिणाम होई. सुभाषचंद्रांच्या वक्तृत्वाचे एक खास वैशिष्ट्य होते. मातृभाषा बंगाली असूनही त्यांचे हिंदी उच्चार स्वच्छ व स्पष्ट होते. एवढेच नव्हे तर 'रामबाण औषधी' ह्यासारखे मराठी शब्द ते इतक्या सराईतपणे वापरीत की कोणाला ते मराठी वक्ताच वाटावेत.

सुभाषबाबूंचे तुफानी वक्तृत्व केवळ राजकीय स्वरूपाचेच होते असे नाही. इतरही विषयांवर ते आपले मनोगत व्यक्त करीत. पुण्याला बोलताना (१९२८) त्यांनी राजकीय स्वातंत्र्याबरोबरच लोकशाही शासनप्रणालीचेही आवर्जून समर्थन केले. गांधींशी त्यांचे फक्त राजकीय मतभेद होते. तेही सैद्धांतिक स्वरूपाचे होते. मात्र सुभाषचंद्रांनी गांधीजींच्या खादी चळवळीला उचलून धरले. त्यामुळे हजारोंच्या बेकारीचा प्रश्न सुटेल असेही समर्थन केले. ह्याचवर्षी कलकत्ता येथे युवक मेळाव्यासमोर बोलताना सुभाषबाबूंनी आधुनिकीकरणावर भर दिला. संपूर्ण विश्व जोपर्यंत मनापासून निःशस्त्रीकरण स्वीकारत नाही तोपर्यंत भारताने आधुनिक मार्गांचा अवलंब करावा. वाढती लोकसंख्या भारताची प्रचंड समस्या असून ती समर्थनीय नाही असे त्यांनी हरिपूरा (१९३८) येथे काँग्रेस अध्यक्षपदावरून बोलताना स्पष्ट केले. जो जो विषय ज्या ज्या

काळात पटला. त्याचे आपल्या वक्तृत्व शैलीद्वारे सुभाषबाबूंनी असे समर्थन केले कीं समाजमन आपोआपच त्यांच्या मागे आले.

गांधीजींच्या मार्गाला स्पष्टपणे विरोध करण्यामुळे तसेच त्यांच्या विलक्षण प्रभावशाली वक्तृत्वामुळे सुभाषबाबूंचे कॉंग्रेस अंतर्गत विरोधक अस्वस्थ होत. कॉंग्रेसची पूर्ण सत्ता व सूत्रे गांधींकडे असल्याने सुभाषबाबू एकटे पडले. अखेर कॉंग्रेसचे सतत दोनदा सर्वात लहान अध्यक्ष होऊनही त्यांना कॉंग्रेसचा त्याग करणे भाग पडले. कलकत्ता येथे भाषण देताना "कठपुतळी अध्यक्ष राहण्याची माझी इच्छा नाही. कोणत्याही परिस्थितीत आपल्या पदाला चिटकून रहाण्याची इच्छा नाही." असे मनोमत, अशी व्यथा व्यक्त केली. कॉंग्रेसला रामराम ठोकत असण्याच्या ह्या भाषणात (१९३९) भावविवश वक्तृत्व होते. त्यात राग नव्हता पण वेदना मात्र निश्चित होती. यानंतर लगेच सुभाषचंद्रांनी कलकत्ता येथे 'फॉर्वर्ड ब्लॉक' स्थापन केला. त्याचे अधिवेशन नागपूरला भरले असता त्याला संबोधित करण्यासाठी सुभाषबाबू १८ जून १९४० रोजी नागपूरला आले. त्यावेळी "प्रयत्न करून यश न मिळाले तरी चालेल पण प्रयत्नच न करणे अपमानकारक आहे" असे उद्गार काढून त्यांनी प्रयत्नांचे महत्व विशद केले. द्वितीय महायुद्धाच्या प्रारंभामुळे भारतीयांच्या मनात येऊ पाहणारे नैराश्य झटकणे हा त्यांचा मूळ उद्देश होता. नंतरचे पुढील चार दिवस सुभाषबाबूंच्या जीवनाला कलाटणी देणारे ठरले, भारतीय इतिहासात अजरामर झाले, सुवर्णाक्षरांनी लिहिण्यासारखे ठरले. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची स्थापना करणाऱ्या डॉ. हेडगेवारांची भेट घेऊन त्यांच्याशी देशस्थितीबद्दल चर्चा करावी, मार्गदर्शन घ्यावे ह्या आकांक्षेने सुभाषचंद्र २० जूनला त्यांच्या भेटीला गेले. पण त्यांना निराश व्हावे लागले. कारण डॉ. हेडगेवार त्यावेळी मृत्युशय्येवर होते. त्यामुळे सुभाषबाबूंना दुरूनच त्यांचे दर्शन घ्यावे लागले. त्यानंतर २२ जूनला मुंबई येथे सुभाषबाबूंनी स्वातंत्र्यवीर सावरकरांची भेट घेतली. दोन महान क्रांतिकारकांची, दोन महान वक्त्यांची ती भेट ऐतिहासिकदृष्ट्या अतिशय गाजली. कारण याच भेटीत रासबिहारींच्या कार्याची माहिती देऊन सावरकरांनी सुभाषबाबूंना भारताच्या बाहेर जाऊन भारतातील इंग्रजांवर हल्ला करण्याचा महामंत्र दिला.

वरील योजनेबरहुकूम सुभाषचंद्र १८ मार्च १९४१ रोजी बर्लिनला गेले. तेथे हिटलरकडून त्यांना 'Guard of Honour' मिळाला. पण जर्मनीतून

भारतावरील लष्करी मोहीम अवघड जाईल म्हणून जपानला जाण्याचा सल्ला दिला. त्यानुसार जर्मन पाणबुडीतून सुभाषबाबू १६ मे १९४३ रोजी टोकियोला गेले. तेथून ते सिंगापूर, बँकॉक येथे गेले. या सर्व काळातील सुभाषबाबूंची भाषणे अतिशय महत्त्वाची व परिणामकारक आहेत. सुभाषबाबूंना आपल्या गळ्यातील ताईत बनवून लक्षावधी भारतीय त्यांची भाषणे जीवाचा कान करून ऐकत. विदेशातील सुभाषबाबूंचे पहिले भाषण २५ मार्च १९४२ रोजी बर्लिन येथून आझाद हिंद आकाशवाणीवरून प्रसृत झाले. बरेच दिवस सुभाषबाबूंचा ठावठिकाणा न समजल्याने डोळ्यांची निरांजने करून मुलाची वाट पाहणाऱ्या आईसारखी भारतीय जनतेची अवस्था झाली होती. त्यामुळे बर्लिन आकाशवाणीवरून अचानक आलेला तो घनगंभीर आणि दमदार, चिरपरिचित स्वर लक्षावधी भारतीयांना सुखावत गेला. त्या स्वराने त्यांच्यात जबरदस्त आत्मविश्वास निर्माण केला. या व नंतरच्या भाषणात सुभाषबाबूंनी इंग्रजांसाठी लढणाऱ्या भारतीय सैनिकांना चांगलेच खडसावले. पहिल्या महायुद्धात भारतीयांनी इंग्रजांना मदत केल्यावर भारतीयांच्या वाट्याला फक्त दमनचक्र आणि संहारच आला ह्याची आठवण करून देऊन सुभाषचंद्रांनी आता आपल्याला सुवर्णसंधी आहे ह्याची जाणवी करून दिली. "प्रकाशाच्या आधी अंधार असतोच त्यामुळे संघर्ष करा, स्वातंत्र्य जवळच आहे." या सातासमुद्रापलिकडच्या सुभाषचंद्रांच्या उद्‌गारांमुळे कोट्यवधी भारतीयांच्या चेतना जागविल्या गेल्या. वक्तृत्वाचा परिणाम एवढा जबर की, शतकांचे मळभपटल दूर होऊन इंग्रजांशी दोन हात करण्याची तयारी भारतात सुरू झाली. मजूरांना व शेतकऱ्यांना आवाहन करून त्यांनीही भारताच्या स्वातंत्र्यसंघर्षात सक्रिय व्हावे असे सुभाषबाबूंनी सुचविले. ३१ ऑगस्ट १९४२ च्या भाषणात ते म्हणतात, "अहिंसक छुप्या युद्धात शेतकऱ्यांची कामगिरी नेहमीच निर्णायक राहिली आहे. स्वातंत्र्यासाठी आपण जितक्या यातना सहन करू, जेवढा त्याग करू तेवढीच दुनियेच्या नजरेत भारतीय प्रतिष्ठा वाढेल, मान उंचावेल. जे स्वातंत्र्यासाठी लढतात त्यांच्याच हाती पुढे देशाची शक्ती केंद्रित होते. इंग्रज सहजासहजी भारत सोडणार नाहीत, म्हणून शेवटचा इंग्रज भारतातून जाईपर्यंत संघर्ष जारी ठेवा."

टोकियोला २३ जून १९४३ रोजी केलेल्या एका भाषणात "इंग्रज एक ना एक दिवस निघून जातील हा स्वप्नवाद व्यर्थ आहे" असे सांगून सुभाषबाबूंनी

निष्क्रीयवादाला शरण न जाण्याबाबत भारतीयांना बजाविले. नोव्हेंबर १९४४ मध्ये टोकियो विश्वविद्यालय छात्रांसमोर त्यांनी केलेल्या अविस्मरणीय भाषणात अनेक विषयांचा उहापोह केला. ब्रिटिश शासनामुळेच भारत राजकीयदृष्ट्या संघटित झाला असे म्हणणाऱ्या तथाकथित विद्वानांवर त्यांनी सडकून टीका केली. उलट ब्रिटिशांमुळे भारत विभाजित झाला, कमजोर बनला, निःसत्व बनला असे सुभाषबाबूंचे प्रतिपादन होते. त्यांच्या वक्तृत्वात गतिमानतेबरोबरच मुद्देसूदपणाही होता. सुभाषबाबू केवळ टीका करीत नसत तर त्या घटनेचे ऐतिहासिक व वास्तववादी विश्लेषणही करीत. प्राकृतिक साधनांनी समृद्ध असा भारत ब्रिटिशांच्या शोषणनीतीमुळे दरिद्री बनला ही गोष्ट त्यांनी स्पष्ट केली. शत्रूशी त्याच तोडीचा सामना करण्यासाठी सुभाषचंद्रांनी शस्त्रनिर्मितीची व आधुनिक उद्योगांची आवश्यकता प्रतिपादन केली. युवकांना उद्देशून बोलताना, "युवक म्हणजे उद्याचे नेते व राष्ट्र होत त्यामुळे कोणत्याही विचारांचे समर्थन युवकांकडून होणे आवश्यक आहे अन्यथा असे विचार काळाच्या पडद्याआड जातात" हे ऐतिहासिक सत्य सुभाषबाबूंनी पुन्हा एकदा समोर आणले. त्या काळात सर्वत्र मार्क्सवादाची चर्चा होती, प्रभाव वाढत होता. सुभाषबाबूंनी मार्क्सवादाचे समर्थन केले पण त्याचबरोबर प्रत्येक समाजाने आपापल्या परिस्थितीनुसार मार्क्सवादाचा अवलंब करावा असा सल्ला देऊन रशियानेही मार्क्सवादाचे अंधानुकरण केले नाही ही बाब स्पष्ट केली. भारतासाठी राष्ट्रीय समाजवाद व साम्यवाद आवश्यक आहे ह्याची फोड करताना संपत्तीचे समान वाटप, जातिव्यवस्थेचे व सामाजिक विषमतेचे निर्मूलन, जातीयवाद व धार्मिक असहिष्णुतेची समाप्ती अशा आपल्या कल्पना स्पष्ट केल्या.

टोकियोवरून सुभाषबाबू सिंगापूरला आले आणि त्यांच्या जीवनातील अखेरचे पर्व सुरू झाले. सिंगापूर येथे आमसभेला (९ जुलै १९४३) प्रबोधित करताना संकटकाळात आपण भारत का सोडला ह्याची कारणमीमांसा त्यांनी स्पष्ट केली. "विदेशी मदतीशिवाय इंग्रजांशी संघर्ष अशक्य ही खात्री झाल्यामुळे अशी मदत मिळविण्यासाठी देश संकटात असूनही आपण देशाबाहेर पडलो" अशी स्वच्छ कबूली सुभाषबाबूंनी दिली. भारताबाहेरील भारतीयांकडून भारतासाठी मदत मिळविणे व इंग्रजांच्या शत्रूंकडून सहाय्यता प्राप्त करणे हे आपले दुहेरी उद्देश होते असे सांगून भारताला भौतिक मदतीबरोबर नैतिक समर्थनाचीही आवश्यकता असल्याचे प्रतिपादन त्यांनी केले. शस्त्रसामर्थ्यावर

विश्वास असूनही, तोच मार्ग खरा ह्याची खात्री असूनही गांधीजींच्या नेतृत्वाखाली भारतात चाललेल्या स्वातंत्र्य आंदोलनाचे महत्व सुभाषबाबू जाणून होते. तसे जाहीर व्याख्यानातही त्यांनी सांगितले.

१९४३ च्या ४ जुलैला आझाद हिंद फौजेची सूत्रे हाती घेताना "आमचे सैन्य भारत भूमीत शिरून राष्ट्रीय ध्वज फडकावील त्यावेळी संपूर्ण देशात क्रांती होऊन ब्रिटिशांना बाहेर काढल्या जाईल" असा दुर्दम्य आत्मविश्वास नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी आपल्या भाषणातून व्यक्त केला. परिणामकारक राजकीय वक्तृत्व ते असते जे श्रोत्यांच्या मनातील मळभ दूर करते, शंकाकुशंका दूर करते आणि अंतर्मनात आशेची ज्वाला तेवत ठेवते. सुभाषबाबूंचे वक्तृत्व अशा प्रकारचे होते. उगाच नाही या वक्तृत्वाच्या बळावर त्यांनी आझाद हिंद फौजेत अपराजित स्वातंत्र्याकांक्षा निर्माण केली. आझाद हिंद फौजेसमोरील 'रणझुंझार सेनानीच्या संकल्पांना पूरक ठरणाऱ्या' ह्या पहिल्याच झंझावाती भाषणाने सैनिकांमधे अमाप उत्साह संचारला. उर्दूमिश्रित हिंदीतील सुभाषबाबूंच्या ह्या भाषणात टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होत होता. भाषणाच्या समाप्तीनंतर प्रचंड हर्षोल्हास होऊन नेताजींचा जयजयकार करण्यात आला. यानंतरच्या बँकॉकमधील भाषणात आझाद हिंद फौजेच्या रूपाने भारताची मुक्तिसेना तयार झाली असून त्याची संख्या वाढतच आहे ह्याबद्दल नेताजींनी खुषी व अभिमान व्यक्त केला.

फक्त स्त्री श्रोत्यांसमोर नेताजींनी काही भाषणे केली. स्त्री शक्तीची यथार्थ जाणाव त्यांना होती. सिंगापूर येथे (१२ जुलै १९४३) स्त्री समुदायासमोर बोलताना अंतिम संघर्षात स्त्रियांनी समोर येऊन आपले कर्तव्य पार पाडावे, त्याग करावा, त्यामुळे भारताचा मुक्तिदिन लौकरच येईल असा प्रबळ आशावाद व्यक्त केला. आम्हाला झाशीच्या राणीसारख्या मृत्यूशी झुंज घेणाऱ्या महिला हव्या असे आवाहनही त्यांनी केले. २२ ऑक्टोबरच्या एका भाषणात नेताजी म्हणाले, "झाशीच्या राणीचे अपयश म्हणजे भारताचे अपयश होते. राणी मृत्यू पावली पण आत्मा अमर आहे. म्हणून भारत अशा शूर राण्यांना पुन्हा जन्माला घालील." नेताजी सुभाषचंद्रांचा आशावाद फळाला आला. महिलांनी प्रचंड संख्येने देशमुक्तीसाठी प्राणांचे बलिदान करण्याची तयारी दर्शविली. त्यामुळे 'झांशी राणी पलटन' ही खास स्त्रियांसाठी स्थापन करण्यात आली. त्याचे नेतृत्व कॅप्टन लक्ष्मी स्वामीनाथन् ह्यांच्याकडे होते. स्वतःच्या घराचा उंबराही न ओलांडणाऱ्या स्त्रिया फौजेत भरती झाल्या हा नेताजींच्या अमोघ वक्तृत्वाचाच

परिणाम मानला पाहिजे. नेताजींच्या वक्तृत्वाचा प्रभाव बुद्धिमंत, कलावंत आणि दलितशोषित तसेच स्त्री वर्ग अशा सर्वांवर पडायचा. सिंगापूरला दिलेल्या एका अत्यंत परिणामकारक भाषणानंतर आझाद हिंद फौजेला मदत करण्याची उपस्थितांमध्ये अहमहमिका लागली. अशा स्थितीत एक श्रमिक महिला हाती केवळ तीन रुपये घेऊन आली व ते घेण्याबद्दल नेताजींना विनवू लागली. नेताजींना ह्यानंतर लक्षावधी रुपये लोकांनी देऊ केले. एका मुस्लिम बांधवाने आपली सर्व संपत्ती देऊन टाकली. अर्थात केवळ देशकार्यासाठी सुभाषबाबूंनी ते धन स्वीकारलं असले तरी त्या तीन रुपये देऊ करणाऱ्या गरीब महिलेचे 'श्रीमंत' मन पाहून तो खंदा वीरही गलबलून गेला.

जुलै १९४४ मधे नेताजींचे स्वप्न पूर्ण होण्याची चिन्हे दिसू लागली. भारतभूमीला अनेक वर्षांनी स्पर्श करून वंदन करताना ते भावविवश झाले. ह्यावेळी आझाद हिंद फौजेसमोर त्यांनी केलेले भाषण बहुदा त्यांचे शेवटचे ध्वनिमुद्रित भाषण असावे. "आम्हाला परिणामांची चिंता नाही. भारत स्वतंत्र होईल त्यावेळी कोण जिवंत राहील सांगता येत नाही. शहीदांच्या रक्तातून स्वातंत्र्याचा मार्ग तयार होतो. मातृभूमीतच मृत्यू यावा हे कोणाही राष्ट्रभक्ताचे स्वप्न असेल." याचवेळी गांधीजींना संदेश देताना नेताजी म्हणाले, "मातृभूचे स्वातंत्र्य हेच आमचे ध्येय आहे. सत्तेत, राजकारणात आम्हाला रुची नाही. म्हणून परकीय दास्यतेच्या शृंखला तुटल्यावर आझाद हिंद फौजेतील बहुतांश लोक राजकारण संन्यास घेतील." १९४४ मधे पाकिस्तान निर्मितीचा खूपच बोलबाला होता. त्यावर सुभाषबाबूंनी खडसावून बजाविले की, "मातृभूमीचे अंगविच्छेदन कदापिही मान्य होणार नाही. जिनांबद्दल वैयक्तिक आदर असला तरी त्यांच्या पाकिस्तान योजनेला आपला विरोध आहे." सुभाषचंद्र एवढ्यावरच थांबले नाहीत तर त्यांनी भारतातील लक्षावधी मुस्लिम युवकांना मातृभूमीचे विच्छेदन पसंत आहे काय ? असा सवाल केला. त्याचबरोबर ब्रिटिशांशी संघर्ष करा, पवित्र मातृभूमीचे तुकडे होऊ देऊ नका असे कळकळीचे आवाहनही केले. त्यांच्या विचारांनी मुस्लिम युवक प्रभावित झाले पण राजकारणी नेत्यांनी फाळणी केलीच. त्यामुळे सर्व प्रयत्नांवर पाणी फेरल्या गेले. द्वितीय महायुद्धात इटली पाठोपाठ जर्मनीने शरणागती पत्करली. त्याचवेळी नेताजींना पराभवाची चाहूल लागली आणि ते भावुक बनले. अपयशाचाही वीरतापूर्वक स्वीकार करा असा संदेश भारताच्या या महान सेनानीने देऊन त्यामागील महत्व विशद केले.

पूर्वजांच्या बलिदानातून भावी पिढीला यशाचा मार्ग दिसेल असे त्यांचे प्रतिपादन होते.

२४ जुलै १९४५ च्या भावविभोर पण ओजस्वी भाषणात सिंगापूर येथून सुभाषबाबू म्हणाले, "सर्व चित्र स्पष्ट होत आहे. तरीही हार मानणार नाही. इंग्रजांनी मंडालेवर अधिकार प्रस्थापित केला त्यावेळी 'जयहिंद' म्हणण्यावर बंदी घातली. पण लहान बालकांनी रस्त्यावर येऊन जयहिंद म्हटले." हे उदाहरण देऊन नेताजींनी लढा सुरू ठेवण्याचे, प्रतिकार करण्याचे आवाहन केले. सर्व काही संपत असताना, स्थिती पूर्णतः प्रतिकूल बनलेली असताना भारतमातेचा हा सुपुत्र आपल्या राष्ट्रमातेच्या मुक्ततेसाठी अजूनही गर्जना करीत होता.

• •

✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲

# नेताजी सुभाषचंद्र बोस : ग्रंथ सूची

**संकलक : प्रा. धनंजय जोग**

✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲

## कादंबरी

(१) **अस्मान :** फडके, ना. सी.; कॉन्टिनेंटल प्रकाशन; पुणे; तृ. आ. १९६१; ३०६; किं. ६ रु.
('अंजली' दीपावली अंक १९५६ मध्ये प्रथम प्रकाशित).

(२) **तुफान :** फडके, ना. सी.; कॉन्टिनेंटल प्रकाशन; पुणे; तृ. आ. १९६१; २७९; किं. ६ रु.
('अंजली' दीपावली अंक १९५६ मध्ये प्रथम प्रकाशित)

(३) **शोनान :** फडके, ना. सी.; कॉन्टिनेंटल प्रकाशन; पुणे; तृ. आ. १९६१; ३४४; किं. ६ रु.
('अंजली' दीपावली अंक १९५५ मध्ये प्रथम प्रकाशित)
(या सर्व कादंबऱ्या म्हणजे नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी स्वातंत्र्याप्रीत्यर्थ केलेल्या सशस्त्र चळवळीचा कादंबरीमय इतिहास आहे.)

## चरित्र / आठवणी

(४) **कहाणी सुभाषचंद्राची :** (नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या चरित्राचा पूर्वार्ध) : फडके, य. दि.; श्रीविद्या प्रकाशन; पुणे; प्र. आ. ऑगस्ट १९९४; ४८१; किं. ५०० रु.
('सांज लोकसत्ता' मध्ये प्रथम क्रमशः प्रकाशित)

(५) **कहाणी नेताजींची :** (नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या चरित्राचा उत्तरार्ध) : फडके, य. दि.; श्रीविद्या प्रकाशन; पुणे; प्र. आ. ऑगस्ट १९९५; ६ + ४२२; छायाचित्रे; किं. ५०० रु. ('सांज लोकसत्ता' मध्ये २० जून ते १७ ऑक्टोबर १९९४ या काळात प्रथम क्रमशः प्रकाशित)

(६) **गरुडझेप :** वाळिंबे, वि. स. : मोरया प्रकाशन; डोंबिवली; (प्र. आ. १९६८); दु. आ. १९९३; १७८ छायाचित्रे; किं. ५० रु.

(७) **जय हिंद : नेताजी सुभाष :** टिल्लू, पां. श्री. व रायकर, ग. का.; के. भि. ढवळे; मुंबई; १९४६; ४ + ९२; किं. १ रु. ४ आ.

(८) **नेताजी :** वाळिंबे, वि. स.; मेहता पब्लिशिंग हाऊस; पुणे; (प्र. आ. ऑगस्ट १९८९); दु. आ. जाने. १९९१; ५३६; किं. १५० रु.

(९) **नेताजी जीवनप्रसंग :** फडके, वि. के.; पुष्पक प्रकाशन; पुणे; (प्र. आ. १९७१); दु. आ. १९७५; किं. ३ रु.

(१०) **नेताजींच्या सहवासात :** ओक, पुरुषोत्तम नागेश; म. म. केळकर; पुणे; १९४७; ८ + १९०; किं. ३ रु.

(११) **नेताजी सुभाष :** अनुयायी; अहिल्याबाई गावकर; धुळे; १९४६; २ + ३ ते २४; किं. ६ आणे

(१२) **नेताजी सुभाषचंद्र बोस :** भिडे, रामकृष्ण गोपाळ; चित्रशाळा प्रकाशन; पुणे, (प्र. आ. १९५३); दु. आ. १९५९; ७९; किं. १ रु.

(१३) **मुलांचे नेताजी :** भागवत, दिनकर द.; लाखाणी बुक डेपो; मुंबई; १९४७; ४ + ३६; किं. ८ आणे

(१३) **(अ) याची देही याची डोळा :** नि. रा. फुले, सुनंदा प्रकाशन, मुंबई ४. २३-१-१९७७

(१४) **रणझुंजार नेताजी :** देसाई, ह. त्र्यं.; श्री प्रकाशन; पुणे; प्र. आ. फेब्रु. १९९४; १९६; किं. १०० रु.

(१५) **वंगवीर सुभाषचंद्र :** अमरेंद्र; मंगला अमरेंद्र गाडगीळ; पुणे; १९४६; ४ + ४ ते १२०; किं. २ रु. ८ आ.

(१६) **शृंखला खळखळा तुटल्या :** जोशी, वि. श्री.; मनोरमा प्रकाशन; मुंबई; प्र. आ. जाने. १९९१; ५८८; किं. २०० रु.

(१७) **सुभाष :** केळकर, भा. कृ.; कॉन्टिनेंटल प्रकाशन; पुणे; (प्र: आ. १९४६; दु. आ. १९६३) तृ. आ. १९७०; १७०; किं. ३ रु. ५० पै.

(१८) **सुभाष कथा :** अत्रे, प्र. के.; ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर; मुंबई; प्र. आ. १९६४; २९१; किं. १० रु.
(सुभाषचंद्र बोस यांच्या आयुष्यातील महत्त्वाच्या घटनांवर आधारित लेखांचा संग्रह.)

(१९) **हिंदच्या स्वातंत्र्याचे जनक : नेताजी सुभाषचंद्र बोस :** गोखले, वा. दा.; दे. श्री. जोशी व द. भ. लोखंडे; पुणे; १९४९; २ + २४; किं. ६ आणे. (सुभाषचंद्र बोस यांच्या जीवनातील प्रसंगांची शब्दचित्रे)

(२०) **हिंदच्या स्वातंत्र्याने जनक : नेताजी सुभाषचंद्र बोस :** गोखले, वा. दा.; दे. श्री. जोशी व द. भ. लोखंडे; पुणे; १९४९; २ + ३ ते ३२; किं. ६ आणे.)

**अनुवादित चरित्रे :**

(२१) **नेताजी सुभाषचंद्र बोस : महान कार्य आणि समर्पण :** अनु. पंडित, गौतम; मीनल प्रकांशन; कोल्हापूर; प्र. आ. १९७८; ८ + ; किं. २० रु. (टाटसो ह्याझिद यांच्या Netaji Subhshchandra Bose : His Struggle and Martyrdom या इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर)

(२२) **नेताजींचे सीमोल्लंघन :** अनु. जोशी, एस्. एम.; भारतीय साहित्य संघ अहमदाबाद; १९४५; ६ + १४ + १३८; किं. २ रु. ४ आ. (नेताजी काबूलमार्गे बर्लिनला कसे गेले याचा वृत्तांत उत्तमचंद मिलोतरा यांच्या पुस्तकाचे भाषांतर)

(२३) **सुभाषमय दिवस :** कामत, अशोक; नूतन प्रकाशन; पुणे; प्र. आ. मार्च १९७६; १३०; किं. १० रु.
("सुभाष पर्व" ही वि. स. वाळिंबे यांची प्रस्तावना; आशा सान (आताच्या सौ. भारती चौधरी) यांनी जपानीत लिहिलेल्या रोजनिशीचे भाषांतर.)

**चरित्रसंग्रह :**

(२४) **१०१ श्रेष्ठ मानव :** कानिटकर, रा. प्र.; उत्कर्ष प्रकाशन; पुणे; प्र. आ. १९७६; किं. ८ रु.
(सुभाषचंद्र बोसांचे संक्षिप्त चरित्र संग्रहात संग्रहित)

(२५) '**काँग्रेसचे अध्यक्ष :** देशपांडे, भीमराव गोपाळ; लेखक; खामगाव; १९३९; (काँग्रेसच्या सर्व अध्यक्षांच्या जीवनाची संक्षिप्त व साधी सरळ शब्दचित्रे)

(२६) **भारतीय स्वातंत्र्याचे रणझुंझार :** संपा. दाते, शंकर रामचंद्र

(२७) **माझे पुढारी :** वाबळे; ' शिवनेर 'कार विश्वनाथराव; प्र. आ. १९९२; किं. ७५ रु. (सुभाषचंद्र बोसांचे संक्षिप्त चरित्र संग्रहात संग्रहित)

## अनुवादित चरित्रसंग्रह

(२८) **स्वातंत्र्याचे अग्रदूत :** प्रकाशन विभाग; नवी दिल्ली; प्र. आ. १९६८; ८० छायाचित्रे; (आझाद हिंदच्या हंगामी सरकारच्या स्थापनेच्या रौप्य स्मृतिदिनानिमित्त प्रकाशित) (एस्. ए. अय्यर यांच्या Heralds of Freedom या पुस्तकाचे भाषांतर)

## इतिहास

(२९) **जयहिंद आझाद हिंद :** वाळिंबे, वि. स.; मेहता पब्लिशिंग हाऊस; पुणे; प्र. आ. ऑग. १९९४; पृ. २०८
(आझाद हिंद सेनेच्या कार्याचा इतिहास २४ लेखात दिलेला आहे, ही लेखमाला रविवार ' सकाळ ' मध्ये ९ जाने. ते १९ जून ९४ पर्यंत प्रथम क्रमशः प्रकाशित झाली.)

## अनुवादित इतिहास

(३०) **सुभाषचंद्र बोस आणि कम्युनिस्ट चळवळ :** अनु. कारखानीस सरला; लोकवाङ्मय गृह; मुंबई प्र. आ. १९७४; ४०; १ रु. ५० पै. (गौतम चट्टोपाध्याय यांच्या Subhashchandra Bose and Indian Communist Movement (१९७३) या पुस्तकाचे भाषांतर)

**चरित्र : आमचे नेताजी** - कुलकर्णी, दा. वि.; महाराष्ट्र ग्रंथ भांडार; कोल्हापूर किं. १२ रु. पृ. ११०

**इतिहास - स्वातंत्र्यसमर : सत्तावन ते सुभाष** - हरदास, बाळशास्त्री; शंकर रामचंद्र दाते; पुणे; १९५७; ५१३; किं. ८ रु.

**सत्तावन ते सत्तेचाळीस भाग १ व २** - वाळिंबे, वि. स.

**कादंबरी - निर्माल्य :** फडके ना. सी.

• •

✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲

# नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या जीवनातील ठळक घटना

✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲✲

१८९७ २३ जानेवारी रोजी कटक येथे जन्म.

१९११ रॉव्हेन्स कॉलेजिएट स्कूलमध्ये मित्रांबरोबर खुदीराम बोस स्मृतिदिनाचा कार्यक्रम

१९१३ शालांत परीक्षेत द्वितीय क्रमांक. कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी महाविद्यालयात प्रवेश

१९१६ प्रा. ओटेन यांच्यावर हल्ल्याच्या आरोपावरून महाविद्यालयातून काढले

१९१७ कलकत्ता विश्वविद्यालयाचे कुलगुरू आशुतोष मुखर्जी यांच्या शिफारसीने स्कॉटिश चर्च महाविद्यालयात प्रवेश

१९१८ बी. ए. (हॉनल) परीक्षेत प्रथम श्रेणीत उत्तीर्ण आय. सी. एस. साठी इंग्लंडला रवाना

१९२० आय. सी. एस. परीक्षेत चवथा क्रमांक

१९२१ आय. सी. एस. चा राजीनामा. भारतात आगमन. गांधीजींची भेट. देशबंधू चित्तरंजन दास यांच्या नेतृत्वाखाली असहयोग आंदोलनात सहभाग

१९२३ निखिल (अखिल) वंग युवासंमेलनाचे अध्यक्ष. देशबंधूंच्या 'फॉरवर्ड' वर्तमानपत्राचे संपादक.

१९२४ कलकत्ता महानगरपालिकेत निवडून आले. चीफ एक्झिक्युटिव्ह ऑफिसर म्हणून नियुक्ती. ऑक्टोबर मध्ये अटक

१९२५ ब्रह्मदेशातील (म्यानमार) तुरुंगात रवानगी. चित्तरंजन दास यांचा मृत्यु.

१९२७ तुरुंगात आजारी पडले. त्यामुळे मुक्तता. बंगाल काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवड.

१९२८ महाराष्ट्र काँग्रेसच्या अधिवेशनात अतिथी अध्यक्ष

१९३० असहयोग आंदोलनात सहभाग. अटक. मुक्तता. कलकत्ता महानगर पालिकेचे महापौर म्हणून निवड.

१९३१ अखिल भारतीय ट्रेड युनियन काँगेसच्या कलकत्ता अधिवेशनाचे अध्यक्ष. पुन्हा अटक. सुटका.

१९३२ अटक. प्रकृती बिघडली.

१९३३ सुटका. प्रकृती स्वास्थ्यासाठी युरोपला प्रयाण.

१९३४-३५ युरोपात प्रवास. मुसोलिनी, व्हॅलेटा, रोमारोला यांच्याशी भेट 'इंडियन स्ट्रगल' पुस्तकाचे लेखन प्रकाशन.

१९३६ मायदेशी परत. लगेच अटक

१९३७ काँग्रेस अध्यक्ष म्हणून निवड

१९३९ पुनश्च काँग्रेसअध्यक्ष म्हणून निवड. गांधीजींशी मतभेद झाल्यानंतर त्यागपत्र. काँग्रेसमधून तीन वर्षासाठी निष्कासन.

१९४० हॉलवेल पुतळा हटवण्यासाठी आंदोलन. अटक. घरात नजरकैद.

१९४१ कलकत्त्याहून गुप्तपणे प्रयाण. बर्लिनमध्ये 'फ्री इंडिया सेंटर'ची स्थापना.

१९४२ आझाद हिंद आकाशवाणी स्थापना.

१९४३ जर्मनीतून पाणबुडीने जपानला प्रयाण. पुढे सिंगापूर येथील भारतीयांच्या सभेत 'नेताजी' हे संबोधन प्राप्त. आझाद हिंद फौजेची स्थापना. 'जयहिंद' आणि 'चलो दिल्ली' या दोन घोषणा दिल्या. अंदमान आणि निकोबार बेटे स्वतंत्र. शहीद आणि स्वराज्य असे नामकरण

१९४४ आझाद हिंद फौजेचा संघर्ष. नेताजी टोकियोत

१९४५ जपानी आकाशवाणीने आपल्या २२ ऑगस्ट च्या नेताजी विमान अपघातात मृत झाल्याचे घोषित केले. अपघाताचा निश्चित दिनांक १७ ऑ. १९४५

• •

# काही महत्वाचे बंगाली संदर्भ ग्रंथ

(१) **सुभाषचंद्र, भारत ओ अक्षशक्ती**
सुधी प्रकाशन, पीपल्स बुक्स सोसायटी
१२, बंकिम चाटर्जी स्ट्रीट,
कलकत्ता

(२) **नेताजीके लाल किल्लाए हत्या**
लेखक : उषारंजन भट्टाचार्य,
इंटरनॅशनल बुक्स, ३५, चित्तरंजन एव्हेन्यू,
कलकत्ता ६.

(३) **गांधीजी ओ नेताजी**
लेखक : भवानीप्रसाद चट्टोपाध्याय,
प्रकाशक : साहित्य लोक,
३२/७, बीडन स्ट्रीट,
कलकत्ता ६.

**नेताजी गेलेल कुथाटा**
लेखक : जयंत चौधरी,
१६, शामाचरण, डे स्ट्रीट,
कलकत्ता ७३.

प्रिय सुभाष,

जे देशाचे स्वभावसिद्ध खरेखुरे प्रतिनिधी असतात ते कधीच एकटे नसतात. ते सार्वजनिक असतात आणि संपूर्ण काळावर त्यांचा अधिकार असतो. ते वर्तमानाच्या गिरिशिखरावर उभे राहून भविष्याच्या सूर्योदयाच्या किरणांना नतमस्तक होऊन प्रथम अर्घ्यदान करतात. ही गोष्ट मनात ठेवूनच मी आज तुला वंगदेशाचा राष्ट्रनेता म्हणून आवाहन करतो आहे आणि त्याबरोबरच तुझ्या पार्श्वभूमीवर समग्र देशालाही.

**रविन्द्रनाथ ठाकूर**

**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई**